ाशिया प्रकाशन २ रें.

# मोझी धर्म



लेखक :—

प्रो. ना. सी. फडके

जानेवारी सन १९४७



—: सोल एजंट्स :—

दि भारत बुकस्टॉल, कोल्हापूर.

किंमत ३। रुपये.

प्रकाशक :—

शंकर लक्ष्मण चिटणीस,

अेशिया पब्लिकेशन्स

कोल्हापूर—शाहूपुरी.



मुद्रक :

अनंत गणेश जोशी,

दि स्टार प्रिंटिंग प्रेस,

कोल्हापूर.



शिपाई आदबीनं जवळ आला व जस्टिस संपतरावांना म्हणाला, " आपला फोन आहे. "

जस्टिससाहेब ब्रिजचा डाव खेळण्यांत गुंतले होते. वाटलेलीं पानं त्यांनीं नुक्तीच उचललीं होतीं. गेल्या अर्ध्या तासांत त्यांना नशिबानं दगा दिला होता. विरुद्ध पक्षाचे मार्क चढत गेले होते. ब्रिज खेळण्यांत सर्वांत पटाईत म्हणून गाजलेले जस्टिससाहेब, पण पानांच्या हटवादापुढें त्यांच्या कसबाला सारखी हार खावी लागली होती. पण आतां एकदम दैव उघडलं होतं. त्यांनीं पानं उचलून पाहिलीं तों इस्पिकच्या भारी पानांची परेडच्या परेड त्यांच्या नजरेपुढून सरकलीं होती. सवाल बोलण्याच्या तयारीनं त्यांनीं आपल्या हातांतल्या पानांचा रंगीबेरंगी पंखा मिटला होता. शिपायाच्या निरोपाकडे त्यांचं लक्ष गेलं नाहीं.

त्यानं पुन्हां सांगितलं, " आपला फोन आहे. "

' फाइव्ह रॉयल्स ' असा सवाल सांगून ते शिपायाला म्हणाले, ' मी खेळण्यांत गुंतलों आहे म्हणून सांग. जा. '

‘ बाईसाहेबांचा फोन आहे. ’

‘ होय ? ’ असं उद्गारून जस्टिससाहेबांनीं टेबलावरच्या इतर तिघां खेळाडूंकडे वळून म्हटलं, ‘ काय, माझा call stand झाला काय ? Good, मी जरा फोनवर जाऊन येतो हं. Just a moment, Excuse me ’

ते फोनवर गेले.

भिंतीवरच्या मोठ्या घड्याळांत साडेआठचा ठोका पडला. जिमखान्याचे दोघे तिघे शिपाई प्रशस्त व्हरांड्यांत ब्रिज खेळणाऱ्या सभासदांची तैनात करण्यासाठीं उभे होते. त्यांनीं घड्याळाकडे पाहिलं. त्यांना माहीत होतं कीं आणखी एक तास—अन् एक तासच — जस्टिससाहेबांच्या टेबलावर खेळ चालेल. कॉलेजांतलीं पोरं, मिलिटरी अकाउंट्समधले कारकून, बिझिनेसवाले लोक बसतील साडेदहा अकरापर्यंत पत्ते कुटीत, अन् खेळण्यापेक्षां आरडाओरडा अधिक करीत, व चहाविड्यांचा फडशा उडवून सिगारेटचा धूर अधिक सोडीत. पण या टेबलावरचा खेळ बरोबर साडेनवाच्या ठोक्याला संपेल. बॅरिस्टर गोखलेसाहेब, मोघे डॉक्टरसाहेब, कॉंट्रॅक्टर आपटे रावबहादूर, अन् जस्टिस संपतरावसाहेब यांच्या मोटारी आठाला दहा मिनिटं उरलीं कीं जिमखान्याच्या आवारांत दाखल होऊं लागायच्या, आठाला पत्ते पिचले जायचे, साडेनवाचा ठोका पडला कीं चालू डाव तेवढा संपवून त्यांनीं उठायचं, अन् झोंपेंतून जागं होतांच डोळे उघडल्याप्रमाणें पुढचे दिवे एकदम लख्ख उजळून जस्टिससाहेबांची मोटर व्हरांड्याच्या पायऱ्यांलगत येऊन उभी राह्यची, हें सारं ठरलेलं होतं. या नित्यक्रमांत बदल सहसा व्हायचा नाहीं. डॉक्टरसाहेबांना एरव्ही एका मिनिटाची फुरसत मिळायची नाहीं. पण संध्याकाळचा त्यांचा हा दीड तास जिमखान्यांत या टेबलापाशीं नित्यनेमानं जायचा. संपतराव गायकवाडांसारख्या सेवानिवृत्त न्यायाधिशाशीं खेळण्यांत त्यांना भूषण वाटे हें तर थोडंसं खरंच; पण जस्टिससाहेब विलक्षण निष्णात खेळणारे होते व

त्यांच्याबरोबर खेळण्यांत कांहीं विशेष आनंद असे हें त्यांचं खरं कारण होतं. या टेबलावर जो खेळ चाले तो पाह्यला मिळावा ह्मणून चारसहा ब्रिजचे षोकीन भोंवतीं उभे राहिलेले नेहमीं दिसायाचे.

आजही ते उभे होतेच. आणि "Just a moment" म्हणून जस्टिससाहेब टेबलावरून उठून गेले तेव्हां त्यांनीं लवकर परत यावं अशा उत्सुकतेनं टेबलावर उरलेल्या तिघां खेळांडूप्रमाणेंच त्यांनीं सर्वांनींहि माना वळविलेल्या ठेवल्या.

जस्टिससाहेबांनीं यायला उशीर लावला नाहीं, पण परत टेबला-जवळ येतांच त्यांनीं पत्ते टाकले व इंग्रजींत म्हटलं, 'मित्रहो माफ करा, मला खेळतां येणार नाहीं. मला घरीं तावडतोब गेलं पाहिजे. छोकरा, गाडी बोलाव. डॉक्टर, आपण जरा माझ्याबरोबर याल तर मेहेरबानी होईल.'

मोघे डॉक्टरांनीं हातांतलीं पानं टाकलीं व विचारलं, 'काय झालंय् काय ?'

'मलाहि नीटशी कल्पना नाहीं. पण आमच्या मालीला अपघात झालाय् म्हणे.'

एव्हांना लगतच्या दोन तीन टेबलांवरचा खेळ थांबला होता व सर्वांच्या नजरा जस्टिससाहेबांकडे वळलेल्या होत्या.

खुर्चीवर काढून ठेवलेला कोट अंगांत चढवीत मोघे डॉक्टरांनीं विचारलं, 'अपघात ? तो कसा ?'

'सायकलवरून पडली बिडली कीं काय कुणास ठाऊक ? लष्करांत तिच्या एका पारशी मैत्रिणीकडे पार्टी होती म्हणून चार वाजतां ती तिकडे गेली. बाबूनं गाडी दुरुस्तीला नेली होती. ती येऊं दे अन् मग जा गाडींतनं म्हणून मीं बजावलं. पण गाडी वेळेवर आली नाहीं म्हणजे माझी फजिती होईल, मी आपली जातें सायकलवर असं म्हणून ती सायकलवर गेली. अलीकडच्या मुलींनीं बापाचं ऐकल्यावर मग काय पाहिजे ?'

तितक्यांत गाडी व्हरांड्यांच्या पायऱ्यांशीं येऊन लागली. जस्टिस-साहेब व मोघे डॉक्टर पायऱ्या उतरूं लागले. जस्टिससाहेब म्हणाले,

'मला फार चिंता वाटते.'

तुमची आपल्या लेकीवर ममता फार म्हणून तुम्ही असे घाबरतां असं म्हणावंसं मोघे डॉक्टरांना वाटलं पण ते कांहींच बोलल नाहींत. नामांकित डॉक्टर शब्दांची बचत करायला शिकलेले असतात. ते मुकाट्यानं जस्टिससाहेबांच्या बरोबर गाडींत बसले. गाडी चालूं झाली. जस्टिस संपतराव क्षणभर मागच्या गादीवर मान टाकून स्तब्ध राहिले, पण लगेच अंग उचलून चुळबुळ करीत ड्रायव्हरला म्हणाले, 'बाबू जरा लवकर जाऊं दे रे!' बाबूचा पाय पेट्रोलवर दाबला गेला; स्पीडो मीटरचा काटा पंचविसाच्या आंकड्यावरून सरकूं लागला, पंचेचाळिसावर पोचून तो मिनिट अर्धं मिनिट स्थिर झाला असेल नसेल तों गाडी बंग-ल्यांतच शिरली. पोर्चमध्यें गोपाळ माळी उभा होता त्याला संपतरावांनीं गाडींतून उतरल्याबरोबर विचारलं,

'काय गोपाळ?—'

'म्हातारा म्हणाला, 'घाबरायजोगं कांहीं नाहीं—'

'माली कुठें आहे?'

'त्येंच्या खोलींतच हायती. आतां चांगल्या सावध झाल्यात.'

'म्हणजे बेशुद्ध झाली होती कीं काय?...'

पण त्या प्रश्नाचं उत्तर गोपाळकडून मिळेपर्यंत ते थांबले नाहींत. डॉक्टरांना बरोबर घेऊन ते जिना चढले. गोपाळ डॉक्टरांची बॅग घेऊन लगबगीनं मागोमाग गेला.

मालतीच्या खोलींत शिरल्याबरोबर जस्टिससाहेबांची व मालतीच्या आईची दृष्टादृष्ट झाली. मालतीनंही तेवढ्यांत डोळे उघडले. त्यांनीं तिला

म्हटलं, " काय माले, काय गडबड आहे ? '

तिची आई म्हणाली, ' आतां सावध झाली आहे. पण मघाशीं घाबरवलंन मला. '

मालती डॉक्टरांच्याकडे बघून हंसत म्हणाली, ' आमच्या आईला घाबरायला किती क्षुल्लक कारण पुरतं तें माहीत आहेच तुम्हांला. '

' माझी थट्टा तूं करणार हें माहीत आहे मला. ' आईसाहेब म्हणाल्या, ' पण आलीस तेव्हां—म्हणजे त्या गृहस्थांनीं तुला आणली तेव्हां तुझी अवस्था कशी होती तें ऐकूं दे यांना म्हणजे—गोपाळदेखील घाबरून गेला होता. विचार कीं त्याला——'

' तो तुझ्यापैकींच. '

जस्टिससाहेबांनीं विचारलं, ' पण काय झालं काय तें कळूं दे कीं आम्हांला ? '

' मी व्हरांड्यांत वाचीत बसलें होतें. पहातें तों एक टॅक्सी बंगल्यात शिरली. आंतल्या माणसानं गोपाळला विचारलं जस्टिस गायकवाडांचा रामकृष्णनिवास हाच काय ? त्यानं हो म्हटल्यावर गाडी घर्रकन पोर्चमध्यें आली. गोपाळ धांवत मागोमाग आला. हिची सायकल गाडीच्या मागं बांधलेली दिसली. गोपाळनं गाडींत डोकावून पाहिलं अन् माझ्याकडे वळून तो ओरडला आईसाहेब धावा, ताईसाहेबांना कांहीं तरी झालंया. गाडींत एक तरुण गृहस्थ होता. मी जवळ गेल्यावर तो म्हणाला, नीट अलगद उतरवून घ्या यांना. गुडघे कोपरं खरचटलीं आहेत. डोक्यालाहि लागलं आहे. सारखी भोंवळ येते आहे त्यांना. आम्ही हिला गाडींतनं काढलीं तेव्हां हिनं एकदां क्षणभर डोळे उघडलेन् पण पुन्हां आईग असं विवळून मिटलेन् अन् मान टाकलीन्. ... '

गोपाळ मधेंच म्हणाला, ' चेहरा असा पांढरा फटफटीत झाला होता कीं— '

' अन् तरी माझं घाबरणं वेडेपणाचं म्हणते ही ! खरं ग बाई ! ' असं म्हणत आईसाहेबांनीं मालतीकडे रागानं पाहिलं.

डॉक्टरांनीं मालतीचीं कोपरं, गुडघे पाहिले अन् डोकं ठिकठिकाणीं दाबीत विचारलं, ' इथें दुखतं ? '

जस्टिससाहेबांनीं बायकोला विचारलं, ' पण ही पडली कुठें ? '

' कुणास ठाऊक ? तिला मी अजून विचारलं नाहीं. आत्तां कुठें ती जरा सावध झाली आहे. '

' पण ज्या तरुण गृहस्थानं तिला आणली त्यानं नाहीं कांहीं सांगितल ? '

' तो असा चमत्कारिक कीं त्याला कांहीं विचारण्याइतपत आमच्या जिवांत जीव येईपर्यंत तो टॅक्सींतून निघूनही गेला. जणूं पोचवली मुलीला तिच्या घरीं, संपलं आपलं काम असं त्याला वाटलं. मी खालीं गोपाळला धाडलं तर तो राह्यला होता कुठें जागेवर ? '

' होय ? हं: ! ' जस्टिससाहेबांनीं आश्चर्य दर्शविलं. ' माले, कोण ग तो ? '

' मला माहीत नाहीं. मीं मोठया प्रयत्नानें डोळे उघडले तेव्हां मी कुठें तरी वेगानं चाललें आहे अन् गार वारा माझ्या तोंडावर मारतो आहे येवढंच मला कळलं. कुणी तरी मला विचारीत होतं, तुम्ही कुठें राहतां सांगा. मी नजर वर केली तेव्हां अंधुक उजेडांत मला त्या गृहस्थांचा चेहरा दिसला. पण मला तेवढ्यांत पुन्हां भोंवळ आली. मी आपल्या बंगल्याचा पत्ता कसाबसा सांगितला तोंच माझ्या डोळ्यांपुढें पुन्हां गडद अंधार पसरला...'

' पण तूं सायकलवरून पडलीस कशी अन् कुठें ?

' पडलें कसची '

‘ मग ? ’

‘ ती एक हकीगतच आहे. ’

‘ ह्मणजे ? ’

मालती सांगणार होती. पण तिला गप्प राहण्याची खूण करून डॉक्टर संपतरावांना म्हणाले,

‘ नंतर कळली ती हकीगत तर चालणार नाहीं कां ? तिला बोलण्याचे श्रम नका देऊं. स्वस्थ पडूं द्या तिला. कुठें कांहीं विशेष लागलेलं दिसत नाहीं. त्यांतून शंका वाटलीच तर उद्यां किंवा परवां एक्स-रे फोटोग्राफ काढूं. ’

त्यांनीं सर्वांना बाहेर काढलं व ते निघून गेले. मालती खोलींत एकटी राहिली. तिचा थकवा अजून पुरता गेला नव्हता. तिनं डोळे मिटून घेतले. तिच्या मनांत आलं, तो तरुण गृहस्थ जर ऐन वेळेस मदतीला आला नसतां तर या वेळेस आपण कसल्या अवस्थेंत कुठें असतों, व आपल्या आईबापांना केवढं दुःख झालं असतं कोण जाणे ! खरं म्हणजे आपण आपल्या मैत्रिणीचं म्हणणं ऐकायला हवं होतं. तिन्हीसांजाच्या वेळीं त्या ओसाड रस्त्यानं सायकलवरून घरीं परत येण्याचा हट्ट आपण करायला नको होता....

तिची पारशी मैत्रिण पेरिन सेटना तिची फार आवडती होती. पार्टी आटोपल्यावर सर्‍याजणींना तिनं निरोप दिला होता, पण स्पेशल गप्पा मारण्यासाठीं मालतीला आग्रहानं मागं ठेवून घेतलं होतं. तिला घेऊन ती बंगल्याच्या छोट्या बगीचांत गेली होती व आपलं लग्न झाल्यावर आपल्या नवर्‍याबरोबर आपण कसा कसा संसार करणार आहोंत त्याबद्दलचे बेत तिनं मालतीला ऐकवले होते. बोलण्यांत ती अन् ऐकण्यांत मालती दोघीही वेळेचं भान विसरल्या होत्या, पेरिनच्या आईनं दोघींपुढे

आणून ठेवलेल्या स्पेशल ताज्या कॉफीचे कप तसेच निवून गेले होते. अखेर भोंवतालचा प्रकाश अगदींच कमी झाल्याचं एकदम लक्षांत येताच मालती झटकन् उठली होती व म्हणाली होती, ' ए पण आतां मला जायला हवं. किती वेळ झाला पाहिलंस काय ? '

पेरीननं तिला जायला परवानगी दिली होती पण तिचा हात धरून म्हटलं होतं, ' पांच मिनिटं बैस. तुझ्यासाठीं टांगा आणायला धाडतें मी नोकराला. '

' टांगा काय करायचा आहे ? माझी सायकल आहे कीं. '

' पण सायकलवरून जाऊं नकोस या वेळीं. मी नाहीं जाऊं देणार तुला. '

' जाऊं देणार नाहीं म्हणजे ? मी जाणार. '

' चावटपणा करूं नको माले. माझी अवज्ञा करायला मी कांहीं तुझी आई नाहीं. ' पेरीन हंसत म्हणाली.

' पण आई व्हायच्या वाटेला लागली आहेस ना. म्हणून हुकूम सोडायला लागली आहेस. ' मालती म्हणाली होती, ' अग सायकल चँपिअन आहे मी कॉलेजांतली, विसरलीस वाटतं ? चार मैल जायचं म्हणजे हातचा मळ आहे माझ्या. '

' हातचा नाहीं पायाचा म्हण. पण अंतर फार आहे म्हणून जाऊं नकोस असं नाहीं मी म्हणत. दिवस मावळला आहे. ही वेळ बरी नाहीं. म्हणून म्हणतें. पांच मिनिटांत आणवतें टांगा. माझं ऐक. '

' अंहं. मी भित्री नाहीं तुझ्यासारखी— '

' अगदीं झाशीची राणी आहेस. कबूल. पण टांग्यानं जा. '

' अंहं. गुड नाईट. '

असे उद्‌गार काढून मालती आपल्या सायकलवर चढली होती. पेरीन रुमाल उंचावून दाखवीत ओरडून म्हणाली होती, ' संभाळून जा ! '

वाऱ्यानं उडणारे केस डाव्या पंजानं दाबीत मान वळवून मालती हंसत ओरडली होती, ' तूं काळजी करूं नकोस बेबी ! '

घोड्याला इशारा देतांच त्यानं वेगानं निघावं त्याप्रमाणें तिची सायकल निघाली होती. पंधरा दिवसांपूर्वीच तिनं आपल्या जुन्या सायकलीविषयीं गाऱ्हाणं केल्याबरोबर संपतरावांनीं ही नवी कोरी गाडी तिला घेऊन दिली होती. तें मनांत येतांच सायकलच्या वेगाची मजा घेत मालती मनाशीं गुणुगुणूं लागली होती. ' बाबाने बात मेरी मान ली ' पश्चिमेचा वारा उलट होता, पण रस्ता उताराचा होता. धोबी घाट मागं पडला होता. आतां पुढें सिनेमाचे दोन स्टुडिओ लागणार होते. अन् त्यानंतर रहदारीचा रस्ता होता. दुतर्फाच्या शिंदीच्या रानांतून जाणारा तीन चार फर्लांगाचा रस्ताच तेवढा जरा—

उंः ! पण असेना कां तो निर्जन अन् ओसाड !—

समोरून तीनचार इसमांचं एक टोळकं येत होतं. जरा चमत्कारिकच वाटल्या त्या व्यक्ती मालतीला. पण तिनं तो विचार मनावेगळा केला होता अन् सायकलची घंटा मोठमोठ्यांदा वाजवली होती.

पण ते इसम दूर होण्याऐवजीं—

त्यांना टाळून निसटण्यासाठीं मालतीनं रस्त्याच्या कडेच्या धुळींतून सायकल काढली होती.

पण त्यांतला एक धटिंगण मुद्दामच तिच्या वाटेंत आला. त्याच्या-वर सायकल धाडकन् आदळली. मालती कोलमडून पडली. ते चारी धटिंगण तिच्याजवळ आले व त्यांपैकीं एकानं तिची मान धरून खसकन ओढून तिला बसती केली. त्या वेदनेनं अन् त्यांच्या दुष्ट चर्या दिसतांच वाटलेल्या भीतीनं मालतीनं मोठ्यांदा किंचाळी फोडली होती. आतां आपल्यावर जो प्रसंग ओढवणार असं तिला वाटलं त्याच्या नुसत्या कल्प-

नेनंच तिच्या उरांत धसका बसला, अन् डोळयापुढें अंधारी आली. हात-पाय लुळे पडले. घसा कोरडा झाला. पण खचणारी सारी शक्ति एकवटून तिनं पुन्हां एकदां मोठ्यांदा किंकाळी फोडली होती. दुसऱ्याच क्षणीं ती बेशुद्ध झाली होती...

या साऱ्या गोष्टींचीं तुटक चित्रं उलटसुलट अनुक्रमानें आतां मालतीच्या मिटलेल्या डोळ्यांपुढें येऊं लागलीं व तिच्या मनात वरचेवर येऊं लागलं, आपल्याला ज्यानं त्या संकटांतून सोडवलं त्याला आपण धड पाहिलंही नाहीं !...

डॉक्टरांनीं पाठविलेलं औषध गुंगीचं असावं. रात्रीचे पहिले दोन-प्रहर मालतीला अशी कांहीं गाढ झोंप लागली कीं घरांत निजानीज केव्हां झाली, संपतराव दोन वेळां येऊन तिच्या आईला कांहीं विचारून केव्हां गेले, त्याची तिला दादही लागली नाहीं. पण मग पहाटे तिला जाग आली. तिला खूपच हुशारी वाटूं लागली होती, अन् त्यामुळेच कीं काय तिला पुन्हां झोंप येईना. उठणं शक्य नव्हतं म्हणून ती पडून राहिली. संध्याकाळच्या साऱ्या गोष्टींच्या आठवणी सरमिसळीनं तिच्या मनांत आतां पुन्हां येऊं लागल्या...

तिनं त्याला तर पाहिलं नव्हतं याबद्दलचं असमाधान तिला प्रत्येक आठवणीबरोबर टोचत होतं. त्यामुळें शेवटीं जेवढं पाहिलं तेवढंच ती पुन्हां पुन्हां दृष्टीसमोर आणूं लागली, व त्या तुकड्यांचं चित्र जुळवितां येतं कां पाहूं लागली.

'तुम्ही कुठें राहतां तें सांगा म्हणजे मी तुम्हांला घरीं पोचवीन.'

त्याच्या शब्दांत जितकं माधुर्य तितकंच गांभीर्य असल्यासारखं तिला वाटलं होतं.

तिनं प्रयत्नानं डोळे उघडले होते.

त्याचे डोळे, नाक, कपाळ, जिव्हणी, केस एवढाच भाग चित्रपटां-तल्या निकट-दर्शनांत ( Close--up मध्ये ) दिसावा तसा तिला दिसला होता. पण अगदीं अंधुक प्रकाशांत.

त्याचा चेहरा सुंदर आहे कीं कसा हा विचार त्या वेळच्या बेभान स्थितींत मालतीला सुचणं शक्यच नव्हतं. पण आतां जेव्हां डोळे मिटण्या-ऐवजी चक्क उघडे ठेवून खोलींतल्या अंधाराच्या पडद्यावर ती त्याच्या चेहऱ्याचं रेखाचित्र उमटविण्याचा प्रयत्न करूं लागली तेव्हां त्याचं सौंदर्य तिला दिसलं, व तें चित्र शक्य तितकं स्पष्ट करण्यासाठीं तिचं अतृप्त मन धडपडूं लागलं. आणि मग फिल्मवर उठलेला ठसा योग्य रसायनांत धुतल्याबरोबर एकदम दिसूं लागावा त्याप्रमाणें एक गोष्ट तिच्या एकदम लक्षांत आली. तिन्हीसांजांच्या अंधुक प्रकाशांत अर्धवट बेशुद्धींत त्याच्याकडे बघतांना तिच्या ध्यानांत आलेली जी एक गोष्ट नंतर अंतर्मनाच्या खोल थरांत जाऊन इतका वेळ दडल्यासारखी राहिली होती, ती आतां एकाएकीं वर आली. खोल पाण्यांतून एकदम पृष्ठभागावर येऊन उडी घेणाऱ्या मासळीचं चंदेरी अंग उन्हांत चमकावं त्याप्रमाणें इतका वेळ अंतर्मनांत लपून राहिलेला एक संस्कार तिच्या दृष्टीपुढें एकदम लकाकला. तो गोरा होता याची तिला आठवण झाली. गोरा म्हणजे गोरीं माणसं तिनं पाहिलीं होतीं त्यांच्यासारखा नव्हे. कांहीं निराळाच ! लालसर ! मस्कती डाळिंबाच्या दाण्यांच्या रसाचा शिडकाव मारल्यासारखा ! असा गौरवर्ण तिनं पूर्वीं कधीं पाहिला नव्हता...

डोळयांपुढें उभ्या केलेल्या चित्रावर तो लालसर गोरा रंग चढवून ती उघड्या डोळयानीं त्याकडे बघत राहिली. आणि एकीकडे तें सुख अनु-भवतांना दुसरीकडे ती मनाशीं आश्चर्य करूं लागली कीं आपल्याला संकटां-तून वांचविणाऱ्या त्या गृहस्थानं आपल्याला घरीं सोडल्याबरोबर लगेच

निघून जावं हें काय आश्चर्य ! एवढ्या कसल्या घाईत होता तो ? आणि तो घाईत असला तरी आपल्या आईनं त्याला जाऊं कसं दिलं ? तिनं त्याची विचारपूस करायला नको होती का ? निदान त्याचे आभार तरी मानायला नको होते कां ? तो गृहस्थ काय म्हणेल ? या माणसांना साधी कृतज्ञता देखील कळत नाहीं असं नाहीं का तो म्हणणार ? छे ! ही मोठी चूक झाली ! आणि दुर्दैवाची गोष्ट होती ती अशी कीं ही चूक आतां दुरुस्त करतां येण्याजोगी नव्हती ! त्या गृहस्थाचं नांवसुद्धां माहीत नव्हतं तर पत्रानं कां होईना त्याचे आभार मानायचे कसे ? ... बरं आई घाबरून गेली अन् तिला कांहीं सुचलं नाहीं तर गोपाळ माळयानं तरी अक्कल वापरावी कीं नाहीं ? त्यानं त्या गृहस्थाला गांठून म्हणूं नये कां जरा थांबा वर आईसाहेबांना भेटून जा म्हणून ? निदान तो कोण कुठला हें विचारून घेऊं नये कां गोपाळनं ? या गोपाळचं नेहमींच असं आहे ! भारी प्रेमळ, पण नुसता सांगकाम्या ! स्वतःची म्हणून अक्कल कधीं वापरील तर शपथ ! आतां हा कसा घोटाळा केलान् पहा ना.! ...

तिला पुन्हां झोंप लागली तेव्हां तिच्या मनांतला अखेरचा विचार हा होता.

त्यामुळें दुसऱ्या दिवशीं सकाळीं तिच्या खोलींत ठेवण्यासाठीं ताज्या फुलांचा गुच्छ तयार करून गोपाळ आलेला तिला दिसल्याबरोबर ती त्याला म्हणाली,

‘ कायरे गोपाळ ?

‘ जी ? ’

‘ अरे तूं असं कसं वागतोस ? ’

‘ माझं कांहीं चुकलं व्हय ! ’

‘ अरे चुकलं म्हणजे काय, अगदीं ठार चुकलं ? ’

' ठार ? च ! '

' च्यक् काय करतोस ? अरे त्यांना तूं थांबवून घ्यायचं नाहींस ? खरं म्हणजे त्यांना चहा घ्यायला हवा होता. पण चहा राहिला, निदान तुम्ही कोण कुठले विचारायचं नाहींस कां तूं त्याना ? '

' त्येस्नी म्हंजी कुनास्नी ? त्ये म्हंजी कोन् '

' कोण ? तुझा सासरा ! अरे ज्यांनीं मला काल संध्याकाळीं मोटारीतून घरीं आणून पोचवलं त्यांना— '

' हां हां. त्यंची गोष्ट चाललिया व्हय ? '

' मेल्या, गोष्ट नाहीं सांगत मी तुला. तूं मूर्खपणा कसा केलास तें सांगतें आहे. अरे तूं त्यांना जाऊं कसं दिलंस ? '

' त्येनीं माझा निरोप घेतला म्हनतां काय ? मी खालीं धावत आलों तर त्येंची मोटार पार फाटकाच्या बाहेर पडून रस्त्याला लागली होती ! मी मनाशीं चरफडलो, अन् मग मुकाट्यानं पुन्हां वरती आलों. '

' चांगलं केलंस. आतां त्यांचा पत्ता कसा लागायचा कसा ? '

' पत्या ! तो कशासाठीं लागाया होवा ? '

' अरे ते कोण कुठले तें कळायला नकों कां आपल्याला ? '

' त्येच्यावाचून काय अडलया ? आपनास्नी साफ बरं वाटतया ना आतां ? मंग झालं तर ? '

' काय शहाणपण तुझं. अरे त्यांचे आभार मानायला नको कां ? तुमचे मोठे उपकार झाले असं त्यांना सांगायला नको कां ? त्यांची भेट राहूं दे, पण चार ओळीचं पत्र तर त्यांना धाडायला हवं कीं नाहीं ? '

' मंग धाडा कीं ! त्येला काय वांधा हये ? '

' गोपाळ, तूं शुद्ध माळी आहेस ! ' मालतीनं कपाळाला हात लावला.

‘ आपनास्नी थोडा चहा हवा कां इचारलंय् आईसाहेबांनीं. ’

‘ थोडा घेऊन ये. ’

गोपाळ निघून गेला. त्यानं फुलदाणींत ठेवलेल्या फुलांकडे मालती बघत राहिली. किती सुंदर टपोरी हसरी फुलं होती तीं ! गोपाळ कितीहि मतिमंद असला तरीं आपल्या कामांत वाकबगार होता खास. मालतीच्या मनांत आलं, उगीच आपण आत्ता त्याला लावून बोललों. तिला वाईट वाटलं. या गोपाळाच्या कडेवर ती लहानपणीं खेळली होती. वाफ्यांत घालायसाठीं ठेवलेल्या भुसभुशीत मातीच्या ढिगावर चढतांना ती पडली तर त्यानं तिला उचलून छातीशी धरलं होतं. वेलींवरची फुलं काढण्यासाठीं ती त्याच्या खांद्यावर बसून चटका घटका हिंडली होती. फुलझाडांना पाणी घालण्याची तिची हौस पुरविण्यासाठीं त्यानं मुद्दाम एक छोटी हलकी झारी बनविली होती. या गोष्टी एकदम आठवल्यामुळें मालतीला फारच वाईट वाटलं. आतां गोपाळ चहा घेऊन आला कीं फुलदाणींतल्या फुलाची तारीफ करून ‘ गोपाळ, तूं फार हुशार आहेस ’ असं म्हणायचं तिनं ठरविलं ....

तितक्यांत गोपाळ आला. पण तो चहा घेऊन आला नाहीं. तो तिच्याजवळ आला व ‘ ताईसाहेब, ही तुमची ब्याग बघा—’ असं म्हणून त्यानं ती पुढें केली. मग तो म्हणाला, ‘ टाक्सीवाल्यानं आणून दिली. ’ बॅग हातांत घेत मालती आश्चर्यानं म्हणाली,

‘ म्हणजे काय ? ’

‘ काल तुम्हांला आम्हीं उतरून घेतलं, पण ब्याग त्या गाडींत तशीच राहिली होती म्हनं. टाक्सीवाला लई चांगला म्हनून त्येनं आनूनशान दिली. येकादा लबाड असता तर त्येनं आनली असती म्हंता काय ? छट् ! खुशाल मारवाड्याच्या दुकानांत विकून — ’

मालतीच्या मनांत एकदम कल्पना आली.

ज्या टॅक्सीवाल्यानं बॅग आणून दिली त्याला त्या तरुणाची कांहीं तरी माहिती सांगतां येईल. आपल्याला पोचविल्यानंतर तो तरुण जर टॅक्सींतूनच घरीं गेला असेल तर तें या टॅक्सीवाल्याला ठाऊक झालं असेल ...

अरे गोपाळा ' ती एकदम उठून म्हणाली, ' ज्यानं ही बॅग आणून दिली त्याला म्हणावं तुला जरा वर बोलावलं आहे. जा, जा. त्याला घेऊन ये. अरे जा ना. उभा काय राहिलास माझ्याकडे असं बघत ? '

गोपाळ म्हणाला, ' त्येला कसा आनूं ? त्यो काय खाली थांबलाया म्हनता ? त्येन टॅक्सी पुरती उभीबी केली नाहीं. हॉरन वाजविला. मला जवळ ये म्हणून खून केली. माझ्या हातावर ब्याग ठ्येऊन म्हनाला, बाईची राहिली होती गाडींत, संभाळा. अन् फर्रकन हाकललीनं बघा गाडी परत. '

मालती त्याच्याकडे बघतच राहिली.

त्या तरुणाचा थोडा तरी पत्ता काढण्याची केवढी नामी संधि गोपाळनं जाऊं दिली होती !

तिला फार खेद झाला.

गोपाळनं आतां मात्र अगदीं अक्षम्य मूर्खपणा केला होता. पण ' तूं शुद्ध माळी आहेस ' असं ती त्याला म्हणाली नाहीं किंवा त्याचा रागही तिनं स्वतः:ला येऊं दिला नाहीं. त्यानं तिला लहानपणी कडेखांद्यावर हिंडविली होती. त्याचं तिच्यावर फार प्रेम आहे हें तिला माहीत होतं.

ती गोपाळला कांहीं बोलली नाहीं, उलट त्याच्याकडे बघून ती थोडीशी हंसलीसुद्धां, व म्हणाली, " असं होय ? बरं. "

मनांतल्या मनांत मात्र ती चरफडली. तिला खेद वाटला. आणि निराशेनं तिला जणूं कांहीं डंवचल्यासारखंच केलं म्हणून तिनं निश्चय केला—

त्याचे आभार मानायसाठीं त्याला भेटायचंच !

—०—

# २

जस्टिस संपतराव संध्याकाळीं आठ वाजल्यापासून साडेनऊ वाजेपर्यंत जिमखान्यावर सांपडायचे हें जसं ठरलेलं होतं त्याप्रमाणेंच त्यांच्या घरांतल्या पुष्कळ गोष्टी ठराविक शिस्तीनं होत असत. रविवारी सकाळीं मोटार मालतीच्या ताब्यांत असायची, तिनं दहा वाजतां शहरांतल्या मोठ्या वाचनालयांत जायचं, जाण्यापूर्वीं तिनं बापाच्या खोलीत जाऊन विचारायचं "साहेब, तुमचीं पुस्तकं परत करायची आहेत?" हा क्रम ठरलेला होता. साडेनऊ वाजले कीं जस्टिससाहेब परत करायचीं पुस्तकं टेबलावर रचून ठेवीत, आणि आणायच्या पुस्तकांची यादी छोट्या नोटपेपरवर करूं लागत.

ब्रिज खेळण्याचा त्यांचा छंद केवळ दोन घटका मजेंत घालविण्यासाठीं होता. जिमखान्याखेरीज इतर कुठेंही ते पत्ते खेळत नसत. घरीं तर केव्हांही नाहीं. पत्त्याचा जोड त्यांच्या घरांत सांपडला नसता. त्यांच्याकडे बोलायबसायला पुष्कळ मंडळी येत. चार आठ दिवस येऊन राहणाऱ्या पाहुण्याची वर्दळही कांहीं कमी नसे. पण पाहुण्यांशीं अगर मित्रमंडळीशीं पत्त्यांचा डाव मांडून बसलेले ते कधींही दिसले नसते. ही मंडळी

जमली कीं, त्यांच्या वादविवादासारख्या गप्पांना रंग चढत असे. आणि या गप्पांत जस्टिससाहेबांना ब्रिजप्रमाणेंच पण ब्रिजपेक्षांहि किती तरी पटींनीं अधिक ज्या दोन विषयांचा छंद होता तेच मुख्यत्वें चर्चिले जात. हिंदुधर्म हा त्यांतला एक विषय होता. हिंदुधर्माबद्दलचा जस्टिस संपतरावांचा अभिमान मोठा जाज्वल्य होता. त्या धर्माचं प्राचीनत्व, त्याची प्रगल्भ शिकवणूक, त्याच्या प्रसारार्थ जे झटले त्या संतांची उदात्त चरित्रं, इत्यादि गोष्टींची चर्चा कितीदांहि अन् कितीही झाली तरी जस्टिससाहेबांची तहान भागत नसे. हिंदुधर्माची महति वर्णन करणारे ग्रंथ त्यांना प्यार होते व असा ग्रंथ पाश्चात्यानं लिहिलेला असला कीं तो त्यांना विशेष प्रिय वाटे. हिंदु धर्माचं कुणी उणं काढलेलं त्यांना अगदीं खपत नसे, अन् अशा माणसाशीं वाद करतांना त्याला अज्ञ मूर्ख म्हणून त्याच्यावर तुटून पडायला ते कमी करीत नसत. हिंदुधर्माच्या पुरस्कारासाठीं होणाऱ्या प्रत्येक चळवळीला, सार्वजनिक समारंभाला, उत्सवाला ते सढळ हातानं मदत करीत. शास्त्री, पुराणिक, साधू, संन्यासी यांचं त्यांच्याकडे आदरातिथ्य होत असे. या बाबतींतलं त्यांचं दातृत्व म्हणजे त्यांच्यांत व मालतींत वारंवार उडणाऱ्या खटक्यांचा विषय होता. कुणाहि ब्राम्हणानं यावं, काशीहून आलों वाराणशीहून आलों म्हणून सांगावं, चार ऋचा हेल काढून डोक्याला हिसके देऊन उजवा पंजा वर खालीं हलवीत म्हणून दाखवाव्या, अन् भक्कम दक्षिणा घेऊन जावं, हा प्रकार मालतीला अगदीं पसंत नसे. ती बापाला म्हणे, ‘ कुपात्रीं दान आहे हें.’ संपतराव म्हणत, ‘ कुपात्रीं कसं ग ? चांगला पढीक ब्राम्हण आहे हा. ’ ती प्रतिपादी, ‘ त्या पढिकपणाची या दिवसांत काय थोरवी ? वेदविद्या मुखोद्गत करणं हा ती जतन करण्याचा जेव्हां एकच मार्ग होता तेव्हा ते कष्ट करणाऱ्या लोकांचं महत्व होतं. पण आतां सारे वेद छापून निघाले आहेत. त्यांचीं देशी परदेशी भाषांतून भाषांतरं झालीं

आहेत. आतां वेद नष्ट होण्याची यत्किंचित् तरी भीति उरली आहे कां? मग ते घोटून पाठ करण्यांत माणसानं आयुष्य वाया घालवावं, अन् अशा माणसाला तुमच्यासारख्यांनीं आदरून दक्षणा द्यावी हें हास्यास्पद नाहीं काय? ' तिच्या या प्रश्नाचं एकच उत्तर संपतरावांकडून मिळे. ते हंसत व म्हणत, ' माले, तूं बच्चा आहेस अझून ! ' यावर मालती गप्प रहात असे. पण आपल्या वडिलांच्या घरीं वाटेल त्या स्वामीनं, शास्त्र्यानं, साधूनं येऊन तळ द्यावा, धर्माच्या ठरीव गप्पा झोकाव्या, अन् संभावना उपटून जावं याबद्दलची तिची नापसंती कांहीं दूर होत नसे. तिच्या मनांत मग कधीं कधीं बापाबद्दल विकल्पसुद्धां येत असे. तिला वाटे माणूस एखाद्या बाबतींतला आपला मोठेपणा अथवा उत्साह मिरविण्यासाठीं भलत्या गोष्टी करतो. साधूंना अन् शास्त्र्यांना आपल्या वडिलाकडून संभावना मिळाली कीं, ते सांगत सुटतात, वा ! जस्टिस संपतराव ना, हिंदु धर्माबद्दलची अशी तीव्र निष्ठा बघायला मिळायची नाहीं ! एका सरदारांचं उदाहरण मालतीला माहीत होतं. त्यांना संगीताचं खरं मर्म फारच थोडं कळत होतं. पण बाहेर गांवाचा लहानमोठा गवयी आला कीं त्याची हजिरी त्यांच्याकडे लागायची. त्यामुळें संगीतावर ज्यांनीं अधिकारवाणीनं बोलावं अशा मंडळींत त्या सरदारसाहेबांची गणना होऊन बसली होती. त्यांच्या रसिकतेचा भलताच बोभाटा झाला होता. मालतीच्या मनांत येई, साहेबांची गोष्ट त्या सरदारसाहेबांपैकींच कीं काय? हिंदुधर्माबद्दलच्या आपल्या अभिमानाचं प्रदर्शन करण्याच्या आहारीं जाऊन साहेब...पण मग मालती आपल्या विचारांचा लगाम खेची. आपल्या बापाचं आपल्यावर अगदीं अमर्याद प्रेम आहे हें मालतीला पुरतं माहीत होतं. त्यांच्यावर आपण असे कांहीं गैरआरोप करावेत याची तिला मनांतल्या मनांत शरम वाटे. मग तो विषय ती मनांतून झटकन् काढून टाकी, व जस्टिससाहेबांना हिंदुधर्माप्रमाणेंच आणखीं ज्या एका विषयाची चर्चा फार प्रिय असे त्याचा विचार ती करूं लागे.

तो विषय म्हणजे गुन्हा व न्याय यांतील परस्पर संबंधाचा. न्यायाधिशाची नोकरी करण्यांत त्यांचं आयुष्य गेलं होतं, व तीस वर्षे केवळ निवाडे लिहिण्यांतच त्यांनीं घालविलीं नव्हतीं तर त्यांच्यापुढें आलेल्या गुन्हेगारांचं सूक्ष्म अवलोकन केलं होतं. जें पाहिलं त्यावर खोल विचार केला होता. आपल्या मनाशीं त्यांनीं कांहीं सिद्धान्त बांधले होते. आपल्या मित्रमंडळींत हे सिद्धान्त ते बोलून दाखवीत, व त्या सिद्धान्तांना आधार म्हणून आपणांपुढें आलेल्या कज्जांच्या हकीगती सांगत. त्यांची सांगण्याची शैली मोठी परिणामकारक असे. त्यामुळें ऐकणाराला वाटे त्या त्या खटल्यांतल्या सुष्ट दुष्ट व्यक्ती आपण पहात आहोंत व त्या रोमांचकारक घटना आपल्यापुढें प्रत्यक्ष घडत आहेत. कायदा ज्याला शिक्षा देतो तो खरा गुन्हेगार असतोच असं म्हणतां यायचं नाहीं हा विचार जस्टिससाहेब वारंवार बोलून दाखवीत, व याचीं उदाहरणं म्हणून ज्या कज्जांच्या हकीगती सांगत ते विलक्षण स्वरुपाचे असत. एकदा एका मुसलमान जमिनदाराच्या पोरावर आपल्या रखेलीचा खून केल्याचा आरोप ठेवण्यांत आला, तो त्याच्यावर शाबीतही झाला, अन् त्याला सदोष मनुष्यवधाबद्दल शिक्षाही त्यांनीं दिली. परंतु पुरावा जरी बीनतोड होता तरी वस्तुतः खून त्यानं केला नव्हता, त्याच्या बायकोनं केला होता ! तो पोऱ्या व्यसनी होता, दुष्ट होता, रखेलीचा जीव घ्यायला मागंपुढें पहाणार नाहीं असा होता हें सगळं खरं, पण तो खून त्यानं केला नव्हता ! सूक्ष्मदर्शक यंत्रांतून पाहणाऱ्या माणसाला जर सांगितलं कीं, त्या यंत्राखालीं जी वस्तु मांडली जाईल तेवढीच तूं बघायचीस, तर त्याची जी अवस्था होईल तिच्यासारखीच असते न्यायाधीशाची अवस्था. जो पुरावा पुढें येईल त्याचीं तो अगदीं सूक्ष्मबुद्धीनं छाननी करील हें खरं; पण सारा पुरावा त्याच्यापुढें मांडला जाईल याची कुठें खात्री असते ? सबंध सत्य त्याच्या दृष्टीस पडत नाहीं. जेवढं दिसेल तेवढ्यांतच सत्यासत्याचा निर्णय त्याला करावा लागतो

डोळयांवर ढापणं घालून घाण्याला जुंपलेल्या बैलाप्रमाणें असते न्याया-धिशाची स्थिति. कायदा गाढव आहे ह्मणतात तें बरोबर आहे. ज्याला आपण शिक्षा दिली तो खरोखर गुन्हेगार नसला तर, असा प्रश्न न्यायाधिशाच्या मनांत येत नाहीं असं नव्हे. निढावलेल्या न्यायाधिशाच्या मनांत फारसा नसेल येत. परंतु जो न्यायाधिशाच्या खुर्चीत नुकताच बसूं लागला आहे त्याच्या मनांत तो प्रश्न वारंवार येतो.

जस्टिस संपतराव म्हणत, ' माझ्या मनांत हा प्रश्न घोळत राही अन् मग माझ्या मनाचं स्वास्थ्य नाहींसं होई. पण हलकें हलकें मी त्या प्रश्नाचं निराकरण करायला शिकलों. ज्यांच्या हातून वस्तुतः गुन्हा घडलेला नाहीं अशी माणसं कायद्याच्या दृष्टीनं गुन्हेगार ठरावीत व त्यांना शिक्षा भोगायला लागावी, असं का व्हावं याचं उत्तर मला सांपडलं. त्यांचं प्राक्तन—त्यांचं कर्म ! त्यांच्या संचितानं देहदंड त्यांच्या वांट्याला आणि-लेला असतो. न्यायाधीश फक्त निमित्तमात्र असतो. हें उत्तर सापडल्या-पासून माझं मन स्थिर झालं. न्यायदानाचं कर्तव्य करतांना मी पापाचा धनी होत असेन ही शंका माझ्या मनाला त्रास देईनाशी झाली. पुढें आलेल्या पुराव्याची शाबितो झाली कीं नाहीं हें कसून पाह्यचं, संशयाचा फायदा आरोपीला द्यायचा, पूर्वग्रहापासून अलिप्त राहून अगदीं निर्मळ मनानं कायद्याचा अर्थ लावायचा, हें न्यायाधिशाचं काम. तें करतांना भल-ताच मनुष्य गुन्हेगार ठरला तर उपाय नाहीं. त्याचं कर्म उभं राहिलं हा एकच त्याचा खुलासा ! '

आपल्या वडिलांच्या तोंडून हें विवेचन मालतीनं वारंवार ऐकलं होतं, अन् एकदां ती आपल्या आईला विनोदानं ह्मणाली होती, ' आमच्या साहेबांना दोन शद्ब फार प्रिय आहेत. धर्म अन् कर्म. ' मात्र घरांत होणारी धर्माची चर्चा तिला निरर्थक व कंटाळवाणी वाटे, तर उलट आपल्यापुढें आलेल्या गुन्हेगारांचे एकेक नमुने जस्टिससाहेब सांगू लागले, निकालाच्या

तराजूला उलट सुलट हेलकावे देणारा पुरावा कसा पुढें आला त्याचं वर्णन करूं लागले, वकिलांचे डावपेंच कसे चालतात त्याचीं उदाहरणं देऊं लागले कीं त्यांत तिला विलक्षण गोडी वाटे. ती वारंवार बापाला म्हणे, ' साहेब, तुह्मी या हकीगती आम्हांला सांगतां तशा लिहून काढा. फार सुंदर पुस्तक होईल. असं पुस्तक मराठी भार्षेत नाहीं. ' ते म्हणत, ' लिहायचं मला कसं जमणार ग ? ' ती आग्रह करी ' लिहायला सुरवात करा ह्मणजे जमतंय् असं तुमचं तुह्मालाच वाटूं लागेल. ' ते ह्मणत ' छे ! उगीच भलत्या भरीला घालूं नकोस मला. '

परंतु मालतीनं आपला आग्रह चालूं ठेवला होता, व अखेर जस्टिस-साहेबांनीं पुस्तक लिहायला घेतलं होतं. पुस्तकाची भाषा चांगली उतरावी यासाठीं सध्यां त्यांनीं उत्तमोत्तम मराठी पुस्तकं वाचण्याचा सपाटा लावला होता. दर रविवारी चार पांच पुस्तकं लायब्ररींत परत करावयास ते मालती-जवळ देत असत व नवीं चारपांच आणायला सांगत. या नव्या क्रमाला अनुसरून आजही त्यांनीं लायब्ररींत परत धाडायचीं पुस्तकं टेबलावर मांडून ठेवलीं, व ते मालतीची वाट पहात बसले.

दहा वाजून दहा मिनिटं झालीं तरी मालती आली नाहीं तेव्हां ते विचार करूं लागले कीं गोपाळाला हांक मारून त्याला पाह्यला सांगावं माली केव्हां लायब्ररींत जायसाठीं निघते आहे तें. पण तितक्यांत गोपाळच त्यांच्या खोलींत आला व ह्मणाला,

' ताईसाहेबांनीं इच्यारलंय पुस्तकं न्यायचीत कां कांहीं '

' हो, न्यायचीं आहेत. हीं उचल. अन् ताईला ह्मणावं या यादीं-तलीं मिळतील तीं पुस्तकं घेऊन ये. ' संपतरावांनीं यादी त्याच्याकडे दिली.

गोपाळ पुस्तकं उचलून निघाला तेव्हां ते म्हणाले, ' आणखी ताईला म्हणावं, परत येतांना आपस्त्यांच्या बंगल्यावरनं गाडी घे;

त्यांच्या घरीं स्वामी श्रद्धानंदांची मोठी तसबीर आहे ती आजच्या समारंभासाठीं हवी आहे. '

गोपाळ म्हणाला, ' पन ताईसाहेब गाडींत जात न्हाईत, त्या आपल्या सायकलवर निघाल्याती. '

' होय ? '

' मी इच्चारलं गाडी काढाया सांगूं कां ? तर माझ्यावर येवढाले डोळं करून रागानं म्हनाल्या मला काय करायची हये तुझी गाडी ! मीं म्हटलं माझी कुठली गाडी ताईसाहेब, गाडी तुमची. तर म्हनाल्या माझी नाहीं, साहेबांची आहे गाडी. माझी सायकल आहे ती पुरे मला. गाडी हवी आहे कुणाला ? '

' म्हणजे काय ? '

' मला तरी काय ठावं जी ! '

जस्टिससाहेब समोरच्या खिडकींतून बागेंतल्या पसरट ठेंगण्या सुरुच्या झाडाकडे पहात राहिले. मग गोपाळाकडे मान वळवून ते म्हणाले ' ताईला सांग मी इकडे बोलावलंय तिला. माझं काम आहे म्हणावं. '

गोपाळ गेला. मालतीशीं कसं बोलायचं याबद्दल ते विचार करूं लागले. लाडक्या लेकीचं वागणं एखादे वेळीं नापसंत असलं कीं तिला तिची चूक दाखवितांना प्रेमळ बापाला मोठी पंचाईत पडते. त्यांच्यांत व मालतींत लहानसा कां होईना पण खटका उडाला होता, अन् तो पहिलाच असल्यामुळें त्यावर झटकन् समेटाचं पांघरूण घालण्याची इच्छा मालतीपेक्षां त्यांना अधिक होती. खटक्याचा प्रसंग उद्भवला होता तो अकस्मातच.

एका ख्रिस्ती जोडप्याला हिंदुधर्मांत घेण्याचा शुद्धिसमारंभ जस्टिससाहेब घडवून आणणार होते. असे समारंभ ते अनेक वेळीं करीत, व दर वेळीं मुंबईच्या अभेदानंद नांवाच्या शुद्धि-चळवळीच्या पुढाऱ्याला घेऊन

येत. या वेळींहि त्यांना आणायसाठी जस्टिस संपतराव मुंबईला गेले. जातांना ते मालतीला सांगून गेले कीं रात्रीं स्टेशनवर मोटर घेऊन ये. ती बरं म्हणाली. पण दुपारीं बाबू ड्रायव्हरची आई परगांवीं अत्यवस्थ असल्याची तार आली. मालती त्याला म्हणाली जा, पण बदली ड्रायव्हर देऊन जा. तो देतो म्हणाला, पण तसाच गेला. रात्रीं स्टेशनवर गाडी घेऊन जाणं तर मालतीला भाग होतं. साहेब अभेदानंदांना घेऊन येणार होते. मालतीनं शेजारच्या बंगल्यांतल्या सिनेमा थिएटरवाल्यांच्या ड्रायव्हरला गांठून म्हटलं होतं, चार आठ दिवसांपुरता एक ड्रायव्हर दे बाबा पाहून. तो म्हणाला होता, फर्स्ट क्लास ड्रायव्हर देतों, अन् खरंच त्यानं पांच वाजतां एक ड्रायव्हर धाडून दिला होता. मालती निश्चित मनानं स्टेशनवर गेली होती. अभेदानंदांसह गाडींत बसल्याबरोबर जस्टिससाहेब म्हणाले होते, ‘ बाबू, गाडी सावकाश जाऊं दे हं. स्वामीजींना वारं लागलेलं सोसायचं नाहीं ! ’ मालतीनं म्हटलं होतं, ‘ साहेब गाडीवर आपला बाबू नाहीं. या ड्रायव्हरचं नांव हुसेन आहे. ’ संपतरावांनीं एकदम आश्चर्याचा उद्गार काढला होता, ‘ काय म्हणालीस ? हुसेन ? ’ मग ते एकदम गप्प झाले. पण बंगल्यावर आल्याबरोबर त्यांनीं हुसेनला त्याचे पैसे चुकते करून रजा दिली होती. मुसलमान ड्रायव्हर त्यांना नको होता. दुसऱ्या दिवशीं त्यांनीं एक हिंदू ड्रायव्हर मिळविला होता.

त्यामुळें मालतीच्या रागाचं कारण त्यांना ओळखतां येत होतं. गाडी हवी आहे कुणाला असं ती म्हणाल्याचं गोपाळनं सांगितल्यावर ‘ म्हणजे ? ’ असा उद्गार त्यांनीं काढला तो गोपाळनं त्याचं उत्तर द्यावं म्हणून नव्हे, तर ‘ अरेच्या ! हिचा राग इतक्या थराला गेला आहे कां ? ’ अशा अर्थानं. म्हणूनच त्यांनीं तिला बोलावणं पाठविलं, व ती आल्यावर तिच्याशीं कसं बोलावं याचा ते विचार करीत राहिले.

मालती खोलीच्या दाराशींच उभी राहिली व म्हणाली, ‘काय साहेब ? ’

ते म्हणाले, ' आंत येऊन बैस तर खरी, मग सांगतों. '

ती आंत आली पण बसली नाहीं.

ते हळूच म्हणाले, ' माझ्यावर फार रागावली आहेस होय ? '

ती खोटं हंसून म्हणाली, ' कोण मी ? पहा बाई ! '

' मग गाडींत कां जात नाहींस ? '

' चार बुकं परत करायचीं अन् आणायचीं त्याला मोटार काय करायची '

' नेहमी चार बुकंच असतात — '

मालती निरुत्तर होऊन गप्प राहिली.

ते म्हणाले, ' उगीच लपवून कां ठेवतेस ? तूं रागावली आहेस माझ्यावर. कां रागावली आहेस तेंही माहीत आहे मला— '

' मग झालं तर ! '

' झालं तर काय ? असं रागावणं शोभतं का तुला ? '

' माणसाला मान अपमान कळूं लागला कीं वाईटच तें. मग दुःख होतं, राग येतो— '

' पण ड्रायव्हर कामावर घेतांना तूं कां बरं विचार केला नाहींस मुसलमान ड्रायव्हर आपल्याला कसा चालेल याचा ? '

' ज्याला गाडी चांगली चालवितां येते तो चांगला ड्रायव्हर अशी माझी समजूत आहे म्हणून. धर्म, जात, शेंडी, दाढी. याकडे पाहून ड्रायव्हर कामावर घ्यायचा हें मला माहीत नव्हतं. ड्रायव्हर हिंदु असला कीं पेट्रोल कमी लागतं अन् मुसलमान असला कीं ज्यास्त लागतं अशांतला तर कांहीं भाग नाहीं ना ? '

' पण मी मुसलमान नोकर ठेवला तर तें माझ्या हिंदु धर्माच्या अभिमानाशीं विसंगत नाहीं कां दिसणार ? स्वामीजी काल काय

म्हणाले असतील मला ? माझी गाडी हाकणारा मुसलमान आहे हें पाहून त्यांना खात्रीनं आश्चर्य वाटलं असेल. '

मालती एकदम म्हणाली, ' कां आश्चर्य वाटावं स्वामीजींना ? सर्वभूतीं परमेश्वर आहे अशी हिंदुधर्माची शिकवण असल्याबद्दल ते प्रवचनं करतात. मीं आपल्या या बंगल्यांतच त्यांचीं दोन प्रवचनं ऐकलीं आहेत. अन् त्यांचं नांव तर अभेदानंद आहे ! '

' माले, तूं अजून बच्चा आहेस. '

' साहेब, वादांत मला निरुत्तर करण्यासाठीं आणखी किती दिवस मला तुम्ही बच्चा ठेवणार आहांत ? आई रोज मला म्हणते माले, तूं मोठी झालीस, आतां तुझ्या लग्नाचं आम्हांला पाहिलं पाहिजे; अन् तुम्ही म्हणतां मी अजून बच्चा आहे ! मग खरी गोष्ट कोणती समजायची मी ? मी मोठी आहे कीं लहान आहे ?

' तुला मी बच्चा म्हटलं तें अशा अर्थानं कीं धर्मांतलीं उंच तत्त्वं व्यवहारांत आणतांना त्यांना थोडी मुरड घालावी लागते हें तुला अजून कळूं लागलेलं नाहीं. तूं मोठी झालीस कीं तुला तें समजूं लागेल. '

' तें समजूं लागेल त्या दिवशीं मला फार दुःख होईल. कारण मी मोठी झालें असं नाहीं त्या दिवशीं मला वाटायचं. माझं मोठेपण नष्ट झालं असं वाटेल मला ! धर्माचीं तत्त्वं व्यवहारांत आणण्यासारखीं नसलीं तर तीं जशींच्या तशीं लोकांना सांगूच नयेत. सर्वांच्या ठिकाणीं एकच परमेश्वर आहे, सारीं माणसं सारखीं आहेत, असं शिकवूंच नये लोकांना. त्यांना स्वच्छ सांगावं कीं हिंदुधर्मांत सहिष्णुतेला स्थान नाहीं, त्या धर्माची दृष्टि व्यापक नसून संकुचित आहे, ईश्वराची मेहेरबानी फक्त हिंदुधर्मावर आहे, त्यानं स्वर्गाची दारं फक्त हिंदूंसाठीं उघडीं ठेवलेलीं आहेत, बाकी कोणी त्या दारावर थाप मारली तर तीं उघडलीं जाणार नाहींत. हिंदु धर्माचं खरं स्वरूप जर हें असेल हेंच स्वामी, साधू, संत, महंत

सर्वांनीं आम्हांला सांगावं. बोलायसाठीं एक तत्त्व अन् वागायसाठीं दुसरं अशा खोटेपणा कशासाठीं ? अशानं नाहीं त्या आशा निर्माण होतात, अन् त्या खोट्या ठरून चुरडल्या जायच्या एवढाच परिणाम शिल्लक राहतो. ... '

मालती कदाचित् अशाच प्रकारें आणखी बराच वेळ बोलत राहिली असती. पण तितक्यांत तिच्या मनांत आलं, किती गंभीरपणानं आपण आपल्या बापाशी बोलत आहोंत ! ... ती संपतरावाशीं खूप बोलत असे खरी, पण त्यांचं संभाषण इतक्या गंभीरपणानं कधींच होत नसे. गप्पा-विनोदाच्या एखादे वेळीं वादाचं स्वरूप येई, पण त्या वादांतही खेळकर-पणा असे. एकमेकाच्या मतांचे आग्रह आपटून खणाणले असं कधीं झालं नव्हतं ... आज तें प्रथमच झालं. कल्पना नसतांना एकदम झालं. जणूं त्याची तयारी खूप दिवस होत होती तिकडे तिनं विशेष लक्ष दिलं नव्हतं, पण ती तिच्या मनांत होत होती, आणि आज ती एकदम उफाळून बाहेर आली असं झालं होतं. ती गंभीरपणानं बोलत होती. बापाशीं अशा प्रकारें ती आजपर्यंत कधीं बोलली नव्हती. तिचं तिलाच तें जरा चम-त्कारिक वाटलं. तिच्या मनांत आलं आपण बोललों तेवढं पुरे झालं ... ती एकदम हंसून म्हणाली,

' तुमची यादी घेतली आहे मी बरोबर. त्यांतलीं मिळतील तीं पुस्तकं घेऊन येईन. '

ती जायसाठीं वळली तेव्हां जस्टिससाहेब झटकन म्हणाले,

' गाडींतून जातेस ना ? '

' अंहं. '

' उगीच काय रुसतेस ? '

' मी बच्चा आहे तुम्हीच म्हणतां ना ? '

' हं, म्हणूनच तूं माझं ऐकलं पाहिजेस. गाडी घेऊन जा. '

‘ बरं, पाहतें ’ असं म्हणून मालती गेली.

संपतराव खिडकीकडे तोंड वळवून उभे राहिले. थोड्या वेळानं मालती आपल्या सायकलवरून गेलेली त्यांना दिसली. त्यांच्या कपाळाला आठ्या पडल्या. चर्या चिंतातुर झाली. मालीशीं त्यांचं असं भांडण आज प्रथमच झालं होतं. त्यायोगानं उत्पन्न झालेलं असमाधान त्यांना लवकर मनावेगळं करतां येईना.

मोटारींत जाण्याऐवजीं सायकलवरून जाण्याचा हट्ट आपण केला यांत आपलं कांहीं चुकलं नाहीं असं एकीकडे मालतीला वाटत होतं, परंतु राहून राहून तिच्या मनांत असंही येत होतं, कीं आपण साहेबांना वाजवी-पेक्षां अधिक तर दुखविलं नाहीं ? जस्टिससाहेबांची ती एकुलती एक मुलगी होती. बरींच वर्षे तिच्या आईला मूल झालं नव्हतं. तें कधींच होणार नाहीं अशी समजूत तिच्या आईनं अखेर जवळजवळ पत्करली होती. वरकरणीं ती कांहीं दाखवीत नसे, परंतु मनांतल्या मनांत ती कष्टी असे. जस्टिस-साहेब तत्त्वज्ञान सांगून मुलावांचून देखील संसारांत आनंद मानणं शक्य आहे असा तिला उपदेश करीत. आपण तसा आनंद खरोखर मानतों अशी बतावणीहि ते करीत असत. परंतु आपल्याला मूल नाहीं या जाणी-वेनं त्यांच्यादेखील मनांत एक प्रकारची सूक्ष्म निराशा अन् अप्रसन्नता आहे हें ओळखूं येई. पतिपत्नी एकमेकांशीं लपंडावाचा खेळ खेळत. परंतु कांहीं झालं तरी तो एक प्रकारचा उघडा लपंडाव होता. आपल्या नशिबांत मूल नाहीं त्याला काय करायचं, बाकीच्या बाबतींत आपण पुष्कळ भाग्य-वान् आहोंत ना, हा विचार दोघांनींहि आपापल्या मनांत स्थिर केला होता. अशा वेळीं मालतीचा जन्म झाला होता, व तिनं आपल्या आगम-नानं जस्टिससाहेबांचं घर आनंदानं भरून टाकलं होतं. मुलीऐवजी मुलगा झाला असता तर अधिक बरं झालं असतं असं मालतीच्या आईला अगर वडिलांना वाटणंच शक्य नव्हतं. मूल झालं याबद्दलचा त्यांचा आनंद

इतका मोठा आणि असामान्य होता कीं, मुलगा आणि मुलगी यांच्या तुलनेला जागाच नव्हती. मालतीच्या पाठीवरही तिच्या आईला मूल झालं नाहीं त्यामुळें आईबापांचं सारं प्रेम तिच्या वांट्याला आलं होतं. ती त्यांचं सर्वस्व बनली. श्रीमंत अधिकाऱ्याची लाडकी मुलगी म्हणून मालती लहानाची मोठी झाली होती. तिचा स्वभाव जात्याच असा सात्त्विक व निर्मळ होता कीं आपले आईबाप आपल्यावर फार प्रम करतात हें कळूं लागण्याइतपत ती मोठी झाल्यावर आपणही त्यांच्यावर फार ममता केली पाहिजे, त्यांना सुख दिलं पाहिजे, आपल्याबद्दल त्यांना अभिमान वाटेल असं आपण वागलं पाहिजे हें धोरण ती संभाळूं लागली. आईबाप कितीहि सुधारक असले तरी ज्यांत त्यांचं व मुलांचं पटणार नाहीं अशा गोष्टी उत्पन्न होणं अपरिहार्य असतं. प्रत्येक पिढी मागच्या पिढीच्या पुढें जाऊं पहाते; आणि माणसं बदलतात व प्रश्न बदलतात, परंतु दोन पिढ्यांतलं अंतर कायमच राहतं. हा प्रकार जस्टिससाहेबांच्या घरांतही घडत होता. परंतु त्याला कडू स्वरूप कधीं आलं नव्हतं. बापानं मुलीला स्वातंत्र्य दिलं होतं, परंतु त्यांची मर्जी मोडेल अशा प्रकारें त्या स्वातंत्र्याचा उपयोग मालतीनं कधीं केला नाहीं. किंवा असं म्हणायला हवं कीं तशी वेळच कधीं आली नाहीं. एकवीस वर्षांच्या अवधींत आपण बापावर कधीं मनापासून रागावल्याचं मालतीला आठवत नव्हतं...।

गांवांत जाणाऱ्या मोठ्या डांबरी रस्त्यावर सायकल हांकतां हांकतां या गोष्टी मालतीच्या मनांत येत होत्या. आणि तिला पुनः पुन्हां वाटत होतं, आपल्या आजच्या वागण्यानं साहेबांना फार वाईट वाटलं असेल काय ? मघाशीं त्यांच्या समक्ष बोलतांना ती मोठ्या आवेशानं बोलली होती. आतांसुद्धां आपलं मत चुकीचं आहे असं तिला मुळींच वाटत नव्हतं. परंतु तिच्या मनांत येत होतं, साहेबांच्या अन् आपल्या मतांत विरोध उत्पन्न व्हावा, अन् तो टाळणं आपल्या हातीं नसावं ही किती चमत्कारिक गोष्ट

आहे. 'माणसाला अधिक समजायला लागलं कीं जें समजूं लागलं तें सोडायची तयारी तरी ठेवली पाहिजे, किंवा जें समजतं त्याच्या आग्रहासाठीं कुणाला दुःख द्यावं लागलं तरी हरकत नाहीं असा निर्धार तरी केला पाहिजे.' असं का असावं याचा तिला चमत्कार वाटत होता, राग येत होता. आपण बापांशीं जें भांडण केलं तें लहानसं खरं, पण तें व्हायला नको होतं असं ती स्वतःशीं पुनः पुन्हा म्हणत होती. तो प्रसंगच मनांतून काढून टाकण्याचा ती प्रयत्न करीत होती. आणि ' जाऊं द्या, दुसऱ्या कशाचा तरी विचार करूं या ' असं जेव्हां जेव्हां ती मनाशीं म्हणत होती तेव्हां तेव्हां ज्या तरुण गृहस्थानं तिला संकटांतून वांचवून तिच्या बंगल्यावर पोंचविलं त्याची आठवण तिला होत होती...

त्या गोष्टीला आतां दहा बारा दिवस झाले होते. परंतु तो कोण, कुठला, त्याचं नांव काय इत्यादि गोष्टी तिला सर्वस्वी अज्ञात राहिलेल्या होत्या. त्याचे आभार मानायसाठीं त्याला भेटायचंच असा निश्चय त्या दिवशीं सकाळीं तिनं मनाशीं केला होता खरा; परंतु त्याचा कांहीं एक उपयोग नव्हता. कांहीं दिवसांनीं आपल्याला तो निश्चय सोडून द्यावा लागेल अशी भीति तिला वाटूं लागली होती. तिला संकटांतून वाचवून घरीं आणल्यावर तो सगळ्यांना भेटला सवरला असता, तिनं व तिच्या आईबापानीं त्याचे नीट आभार मानले असते तर कदाचित् त्याच्याबद्दल तिनं नंतरच्या दिवसांत फार थोडा विचार केला असता. ती त्याला विसरूनही गेली असती. पण तिला तो धड दृष्टीसही पडला नव्हता त्यामुळें त्याला पाहतां यावं अशी तिच्या मनाला ओढ लागली होती. अपूर्णत्वानं माणसाची जिज्ञासा उचलली जाते. त्याचे आभार मानायचें राहिले ही गोष्ट चुकली हा जो विचार तिच्या मनांत येत होता तो अप्रामाणिकपणाचा नव्हता. परंतु कसंही करून त्याची गांठ घेतलीच पाहिजे असं जें तिला वाटत होतं ते केवळ या विचारानं नव्हे. अंधुक प्रकाशांत त्याची चर्या

तिला दिसली होती. तो मोठा उमदा व देखणा असला पाहिजे असं तिला वाटत होतं. आणि त्याला ती पुरतेपणीं पाहूं शकली नव्हती याबद्दल तिच्या मनाला रुखरुख लागली होती. स्त्रीस्वभावाला अनुसरून हें खरं कारण ती स्वतःपासून लपवीत होती. तिचं एक मन तिला म्हणे, तो तरुण तुझ्या सुदैवानें तुला भेटला तर काय केवळ त्याचे आभार मानून नमस्कार करून त्याचा कायमचा निरोप घेणार आहेस वाटतं ? दुसरं मन म्हणे, अर्थातच. त्यानं मला कृतघ्न ठरवूं नये येवढीच माझी इच्छा. ती पुरी झाली कीं मग मला काय त्या तरुणाशीं करावयाचं आहे ? दुसरं म्हणे पहा तरी ! तो भेटूं दे म्हणजे दिसेलच ! पहिलं म्हणे, आज ना उद्यां केव्हां तरी तो भेटेलच, आणि मग तूंहि आहेस अन् मीही आहे. वाद इतक्यावर आला, कीं तिसरंच एक मन मध्यें पडून म्हणे अरे, पण उगीच वाद हवा आहे कशाला ? तो भेटण्याचं कांहीं चिन्ह दिसत नाहीं. दोन मनांचं भांडण मालतीला एकप्रकारें सुखाचं वाटे; परंतु या तिसऱ्या मनानं मध्येंच तोंड घालून तो तिला भेटण्याचा संभव किती कमी आहे याचं स्मरण करून दिलं कीं तिला वाईट वाटे...

रस्त्यानं सायकलवरून जातां जातां वडिलांशीं केलेल्या छोट्याशा भांडणाचा विचार तिनं दूर केला तेव्हां त्यानंतर त्या तरुणाबद्दलच्या विचारांचीं चक्रं आतां ठरून गेलेल्या उलटसुलट क्रमानं तिच्या मनांत फिरलीं. वाचनमंदिराच्या आवारांत शिरून तिनं सायकल स्टँडला लावली व व्हरांड्यांत उभ्या असलेल्या एका गृहस्थांनीं तिला पहातांच विचारलं, ' काय मालतीबाई, जस्टिससाहेब ठीक आहेत ? ' तेव्हां मात्र एखाद्या आगबोटीच्या तळमजल्यांतल्या यंत्रांतली धडधड बोट धक्याला लागतांच शांत व्हावी, त्याप्रमाणें त्या तरुणाबद्दलचे तिच्या मनांतले विचार दूर झाले. ' होय. ठीक आहेत कीं ! ' असं वडिलांच्या त्या स्नेह्यांना तिनं हंसत उत्तर दिलं व ती इमारतींत शिरली.

परत करायचीं पुस्तकं तिनं कारकुनाजवळ दिलीं, यादींतलीं मिळालीं तेवढीं पुस्तकं शिपायाकडून काढून घेतलीं, व कारकून तीं रजिस्टरमध्यें नोंदवूं लागला तेव्हां ती त्याच्या टेबलापाशीं उभी राहिली. तितक्यांत मागं कुणी तरी येऊन उभं राहिलं असं तिला वाटलं. परंतु ती वळून कशाला पाहील ?

‘ अहो जोशी, विवेकानंदांच्या व्याख्यानांची इंग्रजी एडिशन मागविली होतीत ती आली कीं नाहीं ? ’

कारकुनानं लिहितां लिहितां मान वर केली, मालतीच्या खांद्यावरून पलीकडं पाहिलं व हंसत म्हटलं, ‘ होय साहेब, कालच आली. सगळे व्हॉल्यूम्स् आले आहेत. ’

‘ मग त्यांतला तिसरा व्हॉल्यूम द्या मला. ’

‘ तिकडे लायब्रेरियनजवळ आहेत सगळे, आणून देतों हं ’ असं म्हणून जोशी कारकून आपल्या खुर्चीवरून उठूं लागला.

मालती किंचित् रागानं त्याला म्हणाली, ‘ अहो, माझी पुस्तकं द्या मला, अन् मग करा काय तें. तुमचं हें नेहमीचं असं आहे. मी आधीं आलें ना ? मग आधीं माझं काम करा अन् नंतर— ’

‘ अहो, पण पांच मिनिटांनीं काय होतंय् ? इतका वेळ थांबलांत तशा— ’

‘ इतका वेळ थांबलें म्हणूनच म्हणतें कीं माझी पुस्तकं द्या आधीं आणि मग— ’

‘ पण त्यांना उगीच खोळंबत ठेवायचं ? ’

‘ ते म्हणजे कोण लागून गेले आहेत ? इंग्लंडचे मुख्य प्रधान कीं बादशहा ? ’

‘ हें काय तुमचं विचारणं ? आज बरेच दिवस ते वाट पहात आहेत या पुस्तकाची, तेव्हां म्हटलं— ’

' अहो हा वाद घातला नसतात तर एव्हांना माझं काम झालं असतं, अन् मी गेलें असतें. '

मालतीच्या मागं उभी राहिलेली व्यक्ति म्हणाली, ' जोशीबुवा, त्यांचं म्हणणं खरं आहे. त्याच डचेस ऑफ विंड्सर किंवा व्हिक्टोरिया राणी आहेत. त्याचं काम करून टाका आधी ! '

त्या बोलण्याचा राग येऊन मालतीनं झणकाऱ्यानं मान वळवून पहिलं. परंतु ती व्यक्ति दृष्टीस पडल्याबरोबर ती चपापली. तिची चर्या पालटली. आणि ' तुम्ही ! ' असा उद्‌गार तिच्या तोंडून बाहेर पडला.

परंतु त्या तरुण गृहस्थानं तिला मुळींच ओळखलं नाहीं. तिला तें फार चमत्कारिक वाटलं. आपण कदाचित् चूक करीत असूं असं तिच्या मनांत आलं, व तिला अगदीं शरमल्यासारखं झालं. पण पुन्हा तिला वाटलं, नाहीं, नाहीं, आपली चूक होत नाहीं. ती आपली पुस्तकं घेऊन तेथून दूर झाली. पण बाहेर व्हरांड्यांत बोर्डावरच्या नोटीसा पहाण्याच्या निमित्तानं ती मुद्दाम रेंगाळत राहिली.

तिच्या अदमासाप्रमाणें तो तरुण आपलं काम आटपून निघाला तेव्हां तिच्या अंगावरून जाऊं लागला. तो अगदीं जवळ आला तेव्हां तिनं एकदम तोंड फिरविलें व म्हटलं,

' मला वाटतं आपले आभार मानणं हें माझं कर्तव्य आहे. '

तो तरुण थबकला. परंतु चेहऱ्यावर आश्चर्य दाखवून म्हणाला, ' माझे आभार ! ते कशाबद्दल ? '

तिनं त्याच्याकडे निरखून पाहिलं. तिच्या मनांत आलं, छे ! माझी चूक होत आहे असं मला नाहीं वाटत ! किंचित् हंसून तिनं विचारलं,

' तुम्हींच ना ते ? '

' ते म्हणजे ? '

'ज्यांनीं त्या दिवशीं संध्याकाळीं मला-तुम्ही ओळखलं नाहीं मला ?'

'पूर्वी कधीं आपल्याला पाहिल्याचं मला नाहीं आठवत !'

मालती अतिशय गोंधळून गेली. परंतु आपली चूक होत आहे असं तिला मुळीच वाटेना. तिनं पुन्हां हंसून विचारलं, 'त्या दिवशीं तुम्हीं मला संकटांतून सोडवून मोटारींतून घरीं नाहीं पोंचवलंत ?'

'कुणी ? मी ? चांगलं !'

आतां मालतीच्या लक्षांत आलं, कीं हें सारं मुद्दाम चाललं आहे. ती म्हणाली,

'असं का ? बरं बरं ! पण ज्यांनीं मला सोडविलं ते तुमच्या चांगलेच ओळखीचे असले पाहिजेत असं मला वाटतं. तेव्हां ते तुम्हांला भेटले म्हणजे त्यांना सांगा, कीं मी आणि माझ्या आईबापांनीं त्यांचे फार आभार मानले आहेत ! सांगाल ना ? थँक यू !'

फणकाऱ्यानें दूर होऊन तिनं चार पावलं टाकलीं. पण नंतर पुन्हा मागं वळून ती म्हणाली, 'अहो त्यांना आणखी असंही सांगा कीं माणसाच्या अंगीं जरा चालरीत असावी. आभार मानणं माझं कर्तव्य वाटलं मला, म्हणून ओळख काढली. नको असली तर माझी कांहीं वर आली नाहीं. दुसऱ्यांनाहि अभिमान असतो. सांगा एवढं त्यांना हं ! गुड बाय !'

तिच्या त्या बोलण्याचा त्या तरुणाच्या मनावर कांहीं परिणाम झालेला दिसला नाहीं. त्यानं फक्त तिच्याकडे एक कटाक्ष टाकला. नंतर भराभर पावलं टाकीत तो तिच्या अंगावरून गेला व पायऱ्या उतरूं लागला.

आपण भलताच घोंटाळा तर केला नाहीं अशा शंकेनं मालती बावरून जाऊन क्षणभर त्या तरुणाकडे बघत जागच्या जागीं उभी राहिली. तिला संकटांतून वांचविणाऱ्या तरुणाचा चेहरा तिनं स्पष्टपणें पाहिला नव्हता. माणसासारखीं माणसं पुष्कळदां आढळतात. तिची चूक होणं अगदीं

संभवनीय होतं. हा तरुण जर तो नसेल तर याला तिचं पहिलं बोलणं चमत्कारिक आणि नंतरचं बोलणं उद्दामपणाचं वाटण्यासारखं होतं ... झट्दिशीं पुढें होऊन त्या माणसाची माफी मागून टाकावी असं मालतीच्या मनांत आलं. परंतु तितक्यांत जेव्हां तिनं त्या तरुणाकडे पुन्हां नजर फिरविली तेव्हां विद्युत्प्रकाशाच्या झोतांत रंगभूमीवरच्या पात्राचा चेहरा दिसावा त्याप्रमाणें तळपणाऱ्या उन्हांत त्याचा चेहरा तिला स्पष्ट दिसला व तिच्यां मनांतली शंका पार नाहींशी झाली. तो तोच होता याबद्दल तिनं वाटेल तेवढ्याची पैज मारली असती.

एखादी नवी कल्पना मनांत आल्याप्रमाणें ती परत वळली, झपाझप पावलं टाकीत पुस्तकं देणाऱ्या कारकुनाच्या टेबलाजवळ गेली, व त्याला म्हणाली, ‘ अहो जोशी, माझं एक काम करतां का ? ’

‘ सांगा ! ’

‘ ज्या गृहस्थांनीं विवेकानंदाच्या व्याख्यानांचा व्हॉल्यूम तुमच्याकडून घेतला ते कोण ? ’

‘ कां ? ’

‘ त्यांचं नांव, गांव राहण्याचा पत्ता मिळाला तर पाहिजे आहे. ’

‘ हात्तिच्या ! मग त्यांत काय अवघड. वर्गणीदारांचं रजिस्टरच तुह्मांला दाखवितों ह्मणचे झालं. ’

त्यानं रजिस्टरचं लठ्ठ पुस्तक जवळ घेतलं, टेबलावर ठेवून उघडलं आणि ‘ भोंसले भोसले ’ असं हलक्या आवाजांत पुटपुटून पानं उलटलीं. अखेर एका पानावर तो थांबला व मालतीला सुलट दिसेल अशा प्रकारें रजिस्टर फिरवून तो ह्मणाला,

‘ हां ! हें बघा. नांव गांव पत्ता सर्व कांहीं आहे. ’

मालतीनं लक्षपूर्वक वाचलं. ‘ श्रीरंग अमृत भोसले; बी. ई.; हिंदु; कॉन्ट्रॅक्टर; ‘ प्रसाद ’, नंबर १९०, लष्कर. ’

मालतीनं त्या मजकुरावरून नजर फिरविली. ती आभार मानीत असतां त्यानं ओळख नसल्याचा बहाणा करावा याचा तिला मघाशीं चांगलाच राग आला होता. परंतु आतां जेव्हां मनांतल्या मनांत ती त्याचं नांव वाचूं लागली तेव्हां तिचं मन तिला सांगूं लागलं, तूं उगीच रागावत आहेस त्याच्यावर. तो वाईट असणं शक्य नाहीं.

पण तो जर वाईट नव्हता तर अशा चमत्कारिक रीतीनं कां वागला ? त्याच्या वागण्याचा अपमान मानायचा नाहीं असं तिनं मनानं ठरविलं खरं परंतु त्याचं तें वागणं कांहीं म्हटलं तरी चमत्कारिक होतं येवढं खास; आणि तसं तो कां वागला याचं उत्तर शोधलंच पाहिजे होतं. थोड्या वेळां-पूर्वीं मालती घरीं निघाली होती ती त्या तरुणानं आपला अपमान केला अशा कल्पनेनं रागावून. आतां तिच्या मनांत राग उरला नव्हता. तिचा राग नाहींसा व्हावा याला बाह्यतः कांहींच कारण घडलं नव्हतं, आणि तो कां नाहींसा व्हावा हें तिचं तिला तरी सांगतां आलं असतं कीं नाहीं कुणास ठाऊक ? त्या तरुणाचं नांव काय असेल, तो कोण असेल, कुठें रहात असेल इत्यादि जे प्रश्न तिच्या मनाला गेल्या दहा बारा दिवसांत पुनः पुन्हा अस्वस्थ करीत होते त्या सर्वांची उत्तरं तिला एकदम सांपडलीं होतीं हें कदाचित् कारण असेल. एक अवघड उदाहरण सुटावं, आणि दुसरं सोडवायसाठीं घ्यावं तसं तिला वाटत होतं. तो कोण, कुठला, या प्रश्नांऐवजीं तो आपल्याशीं असं कां वागला हा प्रश्न तिला आतां सोड-वायचा होता. त्याला तिनं आतां नीट निरखुन पाहिलं होतं. त्याच्या चर्ये-वरून तो उमद्या मनाचा, मोकळ्या अंतःकरणाचा, आणि प्रेमळ असला पाहिजे याबद्दल तिची खात्री पटली होती. तो उगीचच्या उगीच कुणाचा उपमर्द करील ही कल्पना तिला पटेना. त्याच्या त्या चमत्कारिक वागण्याच्या बुडाशीं दुसरं कांहीं तरी कारण असलं पाहिजे. त्याला प्रत्यक्ष न पाहतां त्याचं नुसतं नांव जरी तिला कळलं असतं तरी ती ह्मणाली असती, छे !

छे ! या नांवाचा मनुष्य विनाकारण कुणाला दुखवील, कुणाचा अपमान करील हें शक्य नाहीं. श्रीरंग ! किती सुंदर नांव ! तिनं हें नांव पूर्वी कधीं ऐकलं नव्हतं. श्रीरंग ! ...

तें नांव स्वतःशीं पुनः पुन्हां उच्चारीत मालती वाचन-मंदिरांतून बाहेर पडली, आणि मोठया रस्त्याला लागल्यावर भर वेगानं सायकलवरून घराकडे परत निघाली.

———



श्रीरंगाला आपल्या लहानपणाची पहिली आठवण होती ती हीच कीं त्याचं नांव ऐकल्याबरोबर प्रत्येकजण म्हणे, किती गोड आणखी सुंदर नांव ! प्रथम किती दिवस त्याला आपलं सबंध नांव सांगतां येत नसे. कुणी विचारलं कीं तो आपला पंजा छातीवर आपटल्यासारखं करून म्हणे 'लंग !' ऐकणाराला त्याचा तो बोबडा शब्द तर मधुर वाटेच, परंतु वयाच्या मानानं मोठाड दिसणाऱ्या त्याच्या गुलाबी कोंवळ्या लुसलुशीत हाताची ती हालचाल अतिशय गोड वाटत असे. त्याचा असामान्य तेजःपुंज गौरवर्ण म्हणजे प्रत्येकाच्या कौतुकाचा विषय होता. असा गोरापान सुंदर देखणा मुलगा रखमाबाईच्या पोटीं आल्याबद्दल शेजारणीपाजारणींना मनांतून थोडासा हेवादेखील वाटत असे. श्रीरंगाच्या मिटलेल्या मुठींचे, गालांचे, किंचित् सोनेरी छटेच्या कुरळ्या केसांचे मुके घेताना एकीकडे त्या बायांना मायेचा पान्हा फुटून श्रीरंगाला शक्य तितकं आपल्या वक्षस्थलाशीं घट्ट धरण्याच्या सुखाची त्या हळूच चोरी करीत, आणि दुसरीकडे त्याच्या आईचा मनांतल्या मनांत हेवा करीत. श्रीरंगाच्या आईला ही गोष्ट सहज ओळखतां येतँ असे. बसायला आलेल्या शेजारणी परत गेल्या, कीं ती त्याची दृष्ट काढी. त्याच्या असामान्य रूपाचं कुणी फारच कौतुक केलं कीं ती म्हणे, "आमचं नशीब फार थोर म्हणून आमच्या पोटीं हा आला.

पांडुरंगाचा प्रसाद आहे हा. याला जिवापाड जपलं पाहिजे." हें बोलणं रुक्मिणीबाई आपल्या नवऱ्यापासून शिकली होती. कारण अमृतराव ज्याला त्याला सांगे, 'बघा, माझ्या पांडुरंगानं माझ्या गरिबाच्या घरांत ही केवढी अमोल दौलत आणून सोडली. विठ्ठलाचं वेडंवाकडं नामसंकीर्तन मी करतों, एकनाथ, नामदेव, तुकाराम अशा संतांचीं चरित्रं गातों, तेव्हां माझ्या देवानं मला विचारलं, अमृता, तुला काय देऊं ? मी ह्मटलं, पांडुरंगा, तुझ्या कृपेनं मला संपत्ति पुष्कळ मिळाली आहे, पण मुलांवाचून घर रिकामं वाटतं. माझं गाऱ्हाणं देवानं ऐकलं आणि हा प्रसाद दिला !' अमृतराव असं बोलूं लागले, कीं त्यांचा कंठ सद्गदित होत असे. त्यांचे डोळे पाण्यानं भरून येत असत. ते एक कर्तबगार कॉन्ट्रॅक्टर ह्मणून कराची शहरांतील लोकांच्या परिचयाचे झाले होते. परंतु त्यांच्या धंद्यातील कर्तबगारीपेक्षां अगर त्यांच्या श्रीमंतीपेक्षां त्यांच्या अतिशय सालस अन् अतियय पापभीरू स्वभावाबद्दल, एखाद्या भगवत्‌भक्ताला शोभेल अशा त्यांच्या आचरणाबद्दल, आणि संतवाङ्मयाच्या त्यांच्या पाठांतराबद्दल त्यांची ख्याति अधिक होती. पहिल्या महायुद्धाच्या काळांत त्यांनीं मोठमोठ्या मिलीटरी कंत्राटांवर खूप पैसा मिळविला होता. सरहद्दीवरच्या मुलखांत त्यांनीं तीन चार वर्षें काढलीं होतीं. मूळचे जरी ते महाराष्ट्रीय होते तरी ते कराचीस येउन राहिले होते. ते कराचीस प्रथम आले तेव्हां श्रीरंग पुरता दोन वर्षांचासुद्धां नव्हता. त्याला आपलं संबंध नांवसुद्धां धड सांगतां येत नव्हतं. परंतु अमृतरावांच्याकडे येणाऱ्या स्नेह्यांनीं आणि रुक्मिणीबाईकडे येणाऱ्या बायकांनीं त्याला जवळ ओढून घ्यावं व विचारावं, 'तुझं नांव काय ?' आणि त्यानं आपला पंजा छातीवर आपटीत 'लंग !' असं उत्तर दिलं कीं 'ओहो ! किती सुंदर अन् गोड नांव' असं ह्मणून त्याचे पटापट मुके घ्यावेत...

श्रीरंग आपल्या लहानपणाच्या गोष्टी आठवूं लागला, कीं अगदी

सगळयांत पाहिली आठवण म्हणून त्याला हे उद्गार व त्या वेळचे मुके आठवत असत.

तो थोडा मोठा झाला तेव्हां आपल्या नांवाची तिन्ही अक्षरं त्याला उच्चारतां येऊं लागलीं. तुझं नांव काय असं कुणी विचारलं कीं ' श्ली-लंग ' असं उत्तर तो देऊं लागला. ते ऐकलं कीं बायका म्हणत, ' अगबाई, सबंध नांव यायला लागलं कीं गुलामाला ' आणि आपले ओठ त्या त्याच्या तोंडाजवळ नेत. पण शब्दोच्चाराच्या बाबतींत श्रीरंगाची तयारी ज्या प्रमाणांत वाढली होती त्या प्रमणांत लोकांना मुके घेऊं देण्याची त्याची तयारी झपाट्यानं कमी झाली होती. आईबापाखेरीज इतरांना मुके देण्यास तो आतां अगदीं तयार नसे. बायकांनीं आपल्याला जवळ घेतलं कीं त्या हटकून मुके घेतात हें माहीत झाल्यामुळें तो त्यांच्याजवळ जायलाच सहसा तयार होत नसे, आणि एखाद्या बाईनं त्याला जर जबरदस्तीनं ओढून घेतलं तर आपल्या गालांचा बचाव करण्याच्या तयारींत असल्याप्रमाणें तो मोठ्या सावधपणानं तिच्याजवळ राही व शक्य तितक्या लवकर आपल्या आईची मांडी गांठी. त्याच्या आईकडे सिंधी बायका येत त्यां दिसायला गोऱ्यागोमट्या दिसत. पण त्यांच्याजवळ तर श्रीरंग मुळींच जात नसे. जणूं त्या त्याला अधिकच घाणेरड्या वाटत असत. त्याच्या या चमत्कारिक हट्टाला उद्देशून अमृतरावांच्या एका मित्रानं हंसत एकदां कोटि केली, ' अमृतराव, तुम्ही तुकारामबोवांचा अभंग म्हणता ना ' परनारीस्पर्श, नरकाचें साधन ' तो लक्षांत ठेवला आहे आपल्या छोट्या श्रीरंगानं, आणि एव्हांपासून त्या उपदेशाप्रमाणें वागतो आहे गुलाम ! '

अमृतराव मनापासून हंसले होते, पण म्हणाले होते, ' छे छे ! तसं नाहीं ! महाराष्ट्राचा फार अभिमान आहे आमच्या श्रीरंगाला ! '

अमृतरावांनीं केवळ विनोदाखातर हें बोलणं केलं होतं. परंतु श्रीरंग

जसजसा मोठा झाला होता तसतसं तो आपल्या वागण्यानं त्यांचं हें गंमतीचं बोलणं खरं करून दाखवूं लागला होता. त्याचा जन्म महाराष्ट्रापासून हजारों मैल दूर अशा सरहद्द प्रांतांतल्या एका गांवीं झाला होता, परंतु त्याच्या अगदीं बालपणापासून त्याला घरांत महाराष्ट्राची ओळख झाली होती. अमृतरावांच्या बंगल्यांच्या आवारांत भव्य तुलसीवृंदावन असे, त्याची सकाळसंध्याकाळ पूजा होत असे; घरांत देवघर होतं, त्यांत पंचायतन होतं; तेथें सदैव नंदादीप तेवत असे. तुळशी, बिल्पत्रं आणि त्या त्या ऋतूंत मिळणारीं सर्व प्रकारचीं फुलं यांचा सुगंध दरवळलेला असे; रोज रात्रीं दोन दोन घटका अमृतराव एकतारी आणि चिपळ्या घेऊन तुकारामाचे अभंग म्हणत बसत. लहानगा श्रीरंग त्यांचं हें भजन ऐकत आपल्या आईच्या मांडीवर बसत असे. चवथ्या पांचव्या वर्षींच किती तरी तुटके तुटके चरण त्याला पाठ झाले होते. लहर लागली तर आपल्या बोबड्या गोड शब्दांत तो ते म्हणून दाखवीत असे. ‘ आम्ही हरींचे हरीचे, शूर कळीकाळा यमाचे ॥ नामघोष बाण साचे, भाले तुळशीमंजिरीचे ॥ ’ हा त्याचा विशेष आवडता अभंग होता. त्याचं पालुपद तो आपल्या बोबड्या भाषेंत ‘ हलीचे हलीचे ’ असं करून म्हणे तेव्हां अमृतरावांना मोठीं धन्यता वाटे.

तो आठ दहा वर्षांचा झाला तेव्हां त्याची कल्पना--शक्ति बरीच जागृत झाली. अमृततरावांचं भजन ऐकताना तो ती चालवून पहात असे. ‘ वेढा वेढा रे पंढरी, मोर्चे लावा भींमातीरीं-- ’ हा अभंग अमृतराव म्हणूं लागले कीं श्रीरंग आपली कल्पना स्वैर सोडून महाराष्ट्रांतल्या त्या क्षेत्राचं चित्र शक्य तितक्या स्पष्टपणें आपल्या नजरेसमोर आणीत असे. तुकारामानं ‘ धन्य देहू गांव पुण्यभूमि ठाव ’ असा आरंभ करून आपल्या एका अभंगांत देहू गांवाचं, तिथल्या इंद्रायणी नदीचं, देवालयाचं, अश्वत्थ वृक्षाचं एखाद्या कुशल कादंबरीकाराप्रमाणं वर्णन केलेलं आहे.

तो अभंग अमृतराव म्हणूं लागले कीं महाराष्ट्राची जमीन, तिथलं पाणी, तिथलीं झाडं आपल्याला जणूं स्पष्ट दिसत आहेत असं श्रीरंगाला वाटूं लागे. त्याच्या मनांत येई, माझा जन्म जरी दूर परक्या प्रांतांत झाला असला तरी माझी खरी भूमि या ठिकाणीं आहे. माझे बाबा, त्यांचे बाबा, आणखी त्यांचे बाबा, या साऱ्यांचे पिंड महाराष्ट्राच्या जमिनींतल्या अन्नावर आणि चंद्रभागा इंद्रायणी अशा नद्यांच्या पाण्यावर पोसले गेले आहेत. त्यांचं रक्त माझ्यात खेळतं आहे. मी महाराष्ट्रीय हिंदु आहे. मराठी भाषेचं आणि संतांच्या वाणीनं गायिलेल्या हिंदु धर्माचं दूध मी माझ्या आईच्या स्तनांतून शोषून घेतलेलं आहे. .... '

तो आणखी मोठा झाला, इंग्रजी शाळेंत जाऊं लागला, सिंधी मुलांत मिसळूं लागला, तेव्हां एकीकडे हिंदु धर्माच्या कक्षेत किती भिन्न भिन्न प्रकारचे लोक सामावलेले आहेत याबद्दल त्याला आदरयुक्त विस्मय वाटूं लागला, पण दुसरीकडे महाराष्ट्र हीच आपली खरी भूमि आणि मराठी संत कवी हेच आपले धर्मशिक्षक ही त्याच्या मतांतली निष्ठा बळावत गेली. सैलसर लेहेंगे घातलेले; उघड्या माथ्यानं वावरणारे सिंधी लोक सगळेच मुसलमान असले पाहिजेत अशी त्याची लहानपणची कल्पना होती. त्यांच्यांत कांहीं मुसलमान आहेत पण कांहीं हिंदुहि आहेत असं जेव्हा त्याला प्रथम अमृतरावांकडून कळलं तेव्हां त्याला मोठं आश्चर्य वाटलं. आपल्या देशाच्या प्रांताप्रांतातल्या लोकांचे पोषाख भिन्न असले, शरीराची व तोंडाची ठेवण निराळी असलीं, अंगाचा वर्ण भिन्न असला तरी सगळ्या प्रांतांत हिंदु आहेत हें जेव्हां त्याला प्रथम समजलं तेव्हां आपल्या देशाची भव्यता त्याच्या लक्षांत आली, आणि हिंदुधर्माच्या निशाणाखालीं किती वेगवेगळे लोक एकत्र नांदत आहेत हें मनांत येऊन त्याचं अंतःकरण गंभीर झालं. मात्र आपल्या सिंधी मित्रांचा व आपला धर्म एकच आहे हें जरी त्याला समजलं तरी त्यांच्यापेक्षां आपण निराळे आहोत इतकंच नव्हे तर एक

प्रकारें श्रेष्ठ आहोंत ही त्याची भावना कमी झाली नाहीं. तो आपल्या सिंधी मित्रांना ह्मणे, ' अरे, आमच्या महाराष्ट्राची सर तुमच्या प्रांताला यायची नाहीं. तुमच्या भूमींत पांच पन्नास फूट उंचीचा उंचवटा दिसला कीं त्याला तुह्मी पहाड ह्मणतां. महाराष्ट्रांत सध्याद्रि, विंध्याद्रि अशा चार चार हजार फुटांच्या उंचीच्या पर्वतांच्या रांगा आहेत. माझी मराठी भाषा जितकी संपन्न आहे तितकी तुमची भाषा कुठें आहे ? महाराष्ट्रांत असे एक एक संतकवी होऊन गेले आहेत-- ' आणि मग तो त्यांना तुकारामाचे अभंग ह्मणून दाखवीत असे, आणि त्यांचें इंग्रजी भाषांतर करून सांगण्यासाठीं धडपडत असे.

शाळेंत जाण्याच्या या वयांत इतर मुलांपेक्षां श्रीरंग अधिक विचारशील व कल्पनेच्या खेळांत रमण्याची आवड बाळगणारा ठरला असतां हें जरी खरं तरी त्या वयांतला त्याचा प्रमुख स्वभावधर्म हा नव्हता, दुसराच होता. त्याचं हाडपेर जात्याच दांडगं होतं, प्रकृति विलक्षण निकोप होती. आणि कोणत्या तरी निमित्तानं सारखी शारीरिक धडपड करायची, चढायचं, धांवायचं आणि दंगामस्ती करायची असा त्याचा चाळा सतत चाललेला असे. त्याच्या देखणेपणामुळें व शरीरसंपदेमुळें लहान मुलांच्या घोळक्यांत त्याला नेतेपणा हक्कानं मिळाल्यासारखा मिळे; आणि तो ती टोळी अशी तयार करी कीं, तिचा दरारा आसपासच्या टापूंतल्या मुलांच्या साऱ्या टोळ्यांना वाटावा. जन्माष्टमीचा उत्सव अमृतरावांच्या परवानगीनं श्रीरंग आपल्या बालगोपालांच्या मंडळामार्फत करीत असे. त्या उत्सवासाठीं आजुबाजूच्या सहा रस्त्यांवरच्या दुकानदारांकडून त्यांनीं मुबलक वर्गणी मिळवावी व तिच्या जोरावर आपला उत्सव साऱ्या शहरांत गाजेल असा करावा. सेवकराम मंच्छाराम नांवाच्या मिठाईच्या मोठ्या दुकानदारानं प्रथम वर्गणी देत नाहीं जा म्हणून श्रीरंगाच्यां सौंगड्यांना वाटेला लावलं. तेव्हां पहाटेच्या वेळेस

मिठाईची ताटं दुकानांतून पळविण्यापासून तों दुकानाच्या कांचा फोडण्यापर्यंत सारे उपाय अंमलांत आणून त्यानीं सेवकरामाला अल्पावधींत असं कांहीं जर्जर केलं, कीं अखेर सगळ्यांत मोठा वर्गणीचा आंकडा त्याला टाकावा लागला. श्रीरंग हायस्कूलमध्यें जाऊं लागला तेव्हां त्याचे सोबती बदलले, खोडरकरपणाचे प्रकार बदलले, परंतु दांडगाईची व मस्तीची हौस कायमच राहिली. क्रिकेट, हॉकी, फुटबॉल इत्यादि खेळ त्याला फार प्रिय असत. त्या खेळांच्या निमित्तानं जे विद्यार्थी त्याच्या सहवासांत येत त्यांचं एक स्वतंत्र टोळकं बनत असे, व त्याचं नायकत्व त्याच्याकडे येत असे. श्रीरंगाच्या शाळेचा एखाद्या सामन्यांत पराभव झाला तरी जय मिळविणाऱ्या शाळेंतील विद्यार्थ्यांची वाजवीपेक्षां फाजील प्रमाणांत टाळ्या शिट्या वाजवून अगर आरडाओरडा करून आपला आनंद व्यक्त करण्याची काय प्राज्ञा होती? श्रीरंग आणि त्याचे सोबती मैदानावर आहेत हें त्यांना माहित असे, त्यामुळें जय मिळवून जातांनासुद्धां त्या मुलांना गुपचीप खालीं माना घालून जावं लागत असे. सारांश श्रीरंग कॉलेजांत जाऊं लागेपर्यंत कराची शहरांतील लोक त्याला ओळखीत होते ते अमृतराव कॉन्ट्रॅक्टरांचा अतिशय देखणा हुशार परंतु भारी दंगेखोर मुलगा म्हणून. कुणी त्याच्या तोंडावर त्याच्या मस्तीबद्दल किंचित् टीकेच्या दृष्टीनं कांहीं बोललं की तो म्हणे, 'महाराष्ट्राचं रक्त माझ्यांत आहे. हिंदुस्थानवर राज्य स्थापूं पहाणाऱ्या इंग्रजांना मद्रास, बंगाल हे प्रांत सहज गिळतां आले. पंजाबांतले लोक एवढे धिप्पाड आणि कडवे पण त्यांनींसुद्धां इंग्रजी सत्ता थोपविण्याऐवजीं सैन्यांत नोकऱ्या धरून तिचीं पाळमुळं घट्ट केली. शेवटपर्यंत लढाई दिली फक्त महाराष्ट्रानं. आणि या परकी सत्तेबद्दल लोकांत असंतोष वाढावा यासाठीं आपली सबंध हयात कुणी खर्च केली असेल तर ती एका महाराष्ट्रीयानंच. लोकमान्य टिळकांच्या महाराष्ट्राचं पाणी माझे आईबाप प्यालेले आहेत.'

कॉलेजातलं पाहिलं वर्ष संपेपर्यंत श्रीरंगाच्या स्वभावांतला हा विशेष कायम राहिला. पण नंतर त्याच्या स्वभावाला एकदम निराळं वळण मिळाल्याप्रमाणें दिसू लागलं. त्याच्या स्वभावांतील दंगामस्तीची आवड आतांपर्यंत वरच्या थरावर होती ती एकदम खालीं गेल्यासारखं झालं, आणि स्वतःच्या बुद्धीची व कल्पनाशक्तीची भूक भागविण्याची हौस मध्यंतरी खालच्या थरावर राहिली होती ती पृष्ठभागावर आली. तिचा पगडा त्याच्या वागण्यावर अधिकाधिक दिसू लागला. गंभीर विषयाच्या वाचनाकडे त्याचं मन जोरानं वळूं लागलं. पूर्वी त्याच्या खोलींत पुस्तकांपेक्षां खेळण्याचं सामान आणि व्यायामाचं साहित्य अधिक दिसत असे. आतां टेबलावर, कपाटांत पुस्तकंच पुस्तकं दिसूं लागलीं, आणि त्यांतसुद्धां विज्ञानशास्त्र, धर्म अशा विषयांवरच्या ग्रंथांचा भरणा अधिक असे. माणसाच्या आयुष्यांत निरनिराळ्या अवस्था येऊन जातात व त्या त्या अवस्थेंत त्याची आदरस्थानं व दैवतं वेगवेगळीं असतात. श्रीरंगाच्या मनाची ओढ शारीरिक पराक्रमाऐवजीं ज्ञानाकडे वळली तेव्हां त्याच्या खोलींतल्या जुन्या तसबिरी जाऊन नव्या दिसूं लागल्या. या नव्या तसबिरींत स्वामी विवेकानंदांची तसबीर सगळ्यांत प्रमुख जागीं होती. हिंदु धर्माचं उदात्त तत्वज्ञान व त्याचं व्यापक सर्वसंग्राहक स्वरूप पाश्चात्य देशांना विशद करून सांगणारा आधुनिक काळांतला सर्वांत प्रभावी प्रचारक पंडित या नात्यानं स्वामी विवेकानंदांची योग्यता श्रीरंगाला फार मोठी वाटूं लागली. पूर्वी ज्याप्रमाणें संतकवींनीं रचलेल्या ओंव्या आणि अभंग तो पाठ करून लोकांना म्हणून दाखवीत असे त्याप्रमाणें आतां स्वामीजींच्या व्याख्यानांतले उतारेच्या उतारे तो मुखोद्गत करूं लागला. घर सोडावं आणि रामकृष्ण-मिशनमध्यें दाखल होऊन आपलं सबंध आयुष्य लोकांना हिंदुधर्माचं खरं स्वरूप सांगण्यात घालवावं अशी फार प्रबल इच्छा त्याच्या मनांत या सुमारास उद्भवली होती. आपल्या आईबापांचं आपल्यावर

पराकाष्ठेचं प्रेम आहे, व आपण घरांतून निघून गेलों तर त्यांना असह्य दुःख होईल असं वाटल्यामुळेंच केवळ त्यानं ती इच्छा मनांतून मोठ्या प्रयत्नानं काढून टाकली होती. त्यानं जें वाचन केलं होतं त्यामुळें त्याची खात्री होत गेली होती कीं विज्ञानशास्त्र व धर्म यांत विरोध आहे असं लोक समजतात, पण तसा तो मुळींच नाहीं. उलट शास्त्राचा खोल अभ्यास धर्मतत्वाच्या अंतिम समजुतीला पोषकच ठरावयास हवा. त्यामुळें शास्त्रीय शाखेची पदवी संपादन करण्याचं, व कॉलेजांतून बाहेर पडल्यावर शास्त्रीय संशोधन करीत राहाण्याचं त्याच्या मनानं ठरविलं होतं. परंतु अमृतराव त्याला म्हणाले, ' माझ्या धंद्याचा ऐवढा मोठा पसारा मीं मांडला. एवढी मिळकत जोडली. तूं मोठा झालास कीं हा उद्योग तूं हातीं घेशील, प्रपंच वाढविशील आणि पांडुरंगाचं भजन चोवीस तास करायला मला मोकळा करशील अशी आशा फार दिवस मी मनांत ठेविली आहे. तूं कर्ता सवरतां झालास कीं हा परदेश सोडून जन्मभूमीकडे मला धाव घेता येईल, माझ्या महाराष्ट्रांत एखादी छोटी बंगली बांधून मला राहतां येईल, आणि अखेरची झोंप माझ्या भूमींत मला घेतां येईल या आशेवर मी इतकीं वर्षे काढलीं आहेत. ती माझी आशा खोटी ठरवूं नकोस. ' श्रीरंगानं म्हटलं होतं, ' महाराष्ट्रांत जाण्याचीं इच्छा तुमच्याहिपेक्षां मला अधिक आहे. तुम्ही तिकडे परत जाणार आहांत, पण मी प्रथमच जाणार आहे. तुमच्या तोंडचीं वर्णनं ऐकून जिथें भागवत धर्माचा उदय झाला ती माझी भूमि केव्हां एकदां डोळे भरून पाहीन असं मला झालं आहे. तुम्ही म्हणत असाल तर या घटकेला तिकडे जाण्याची माझी तयारी आहे. माझं शिक्षण तिकडेही होईल--कदाचित् जास्ती चांगल्या प्रकारें होईल. ' परंतु अमृतरावांनीं आपल्या मनाशीं हिशोब पक्का ठरविलेला होता, त्या हिशोबाप्रमाणें आणखी चार सहा वर्षे कराचींतच राहून आणखी पैसा त्यांना मिळवायाचा होता, नंतर ते महाराष्ट्रांत जाऊन राहणार होते,

आणि आपल्या मुलानं आपलाच धंदा पुढें चालवावा अशी त्यांची फार इच्छा होती. ते वारंवार म्हणत, 'केवळ दैवयोगानं आणि पांडुरंगाच्या कृपेनं या धंद्यांत माझं पाऊल पडलं, कल्पनातीत पैसा मिळाला. या धंद्यांत फार मोठी बरकत आहे. हा धंदा माझ्या घरांतून नाहींसा झाला तर मला वाईट वाटेल. तो तूं पुढें चालविलास तर मला आनंद होईल.' अशा कोणत्या दैवयोगानें त्यांचं पाऊल या धंद्यांत पडलं त्याचा खुलासा ते कधीं करीत नसत. परंतु श्रीरंगानं दुसरा कोणताही धंदा करण्यापेक्षां या धंद्यांत पडावं अशी त्यांची दृढ इच्छा होती एवढं खरं.

म्हणून श्रीरंग एंजिनिअरिंग कॉलेजांत दाखल झाला होता. तिथला अभ्यासक्रम पूर्ण केल्यानंतर धंद्याला प्रारंभ करण्यासाठीं म्हणून तो मुंबईस जाऊन राहिला होता, आणि पुण्याच्या लष्कर भागांत एक लहानसा टुमदार बंगला बांधून अमृतराव तिथें राहूं लागले होते. त्यांनीं आपल्या बंगल्याला 'प्रसाद' असं नांव दिलं होतं. इथें येऊन राहूं लागल्यापासून त्यांनीं गृहस्थाश्रम जवळजवळ सोडल्यासारखं केलं होतं. सढळ हातानं दानधर्म करावा, भागवतधर्माच्या चाहत्यांना गोळा करून त्यांच्याशीं चर्चा करावी, अधिकारी माणसांकडून धर्मचर्चा आणि परमार्थज्ञान ऐकावं, आणि स्वतः भजनी कीर्तनाला उभं राहून नामसंकीर्तनाचा आनंद लुटावा अशा क्रमांत आयुष्यांचीं उरलेलीं वर्षं ते घालविणार होते.

श्रीरंग मधून मधून घरीं येऊन चार सहा दिवस रहात असे, परंतु त्याचे बाकीचे दिवस मुंबईतच जात. हातीं पैसा मुबलक असल्यामुळें त्याच्या धंद्याचा जम बसायला फारसा वेळ लागला नाहीं. ओळखीनं ओळखी वाढत गेल्या, त्याची कर्तबगारी आणि सचोटी लोकांना पटूं लागली, व त्याला मोठमोठीं कामं मिळूं लागलीं. रस्ते तयार करणं, पूल उभे करणं अशीं कंत्राटं त्यानं प्रारंभीं घेतलीं, परंतु नंतर नंतर फक्त मोठ-मोठ्या बंगल्यांच्या बांधकामाचीं कंत्राटं तो घेऊं लागला. त्यासाठीं चांगले

निष्णात एंजिनिअर्स आणि कसबी आर्किटेक्ट त्यानं नोकरीला ठेवले. त्याची ' प्रसाद ॲण्ड को. ' ही कंपनी अल्पावधींत नांवारूपाला आली, आणि मुंबईबाहेरच्या संपन्न लोकांच्या बंगल्यांचीं कामं त्याला झपाट्यानं मिळूं लागली

एकदां सुरतेस एका मोठया बंगल्याचं काम त्यानं सुरू केलं होतं. तें काम फारच मोटं आणि जबाबदारीचं असल्यामुळें आठवड्यांतले तीन चार दिवस तो तिकडे जाऊन राहूं लागला. ज्या जागीं बंगल्याचं काम चालूं होतं तिथेंच एका मोठया राहुटींत त्याचा मुक्काम असे. कामावर देखरेख करायचे श्रम दिवसभर करावे, रात्रीं गुजराथी थाटाचं साधं जेवण जेवावं आणि मग कॉटवर अंग टाकून आपल्या आवडत्या शास्त्रीय अगर धार्मिक ग्रंथांचं वाचन करतां करतां अखेर झोंपी जावं असा त्याचा क्रम असे. तें वाचन करतांना त्याचं मन समाधानानं भरलेलं आणि शांत असे. महाराष्ट्रांत येऊन राहण्याची त्याची इच्छा पूर्ण झाली होती. वडिलांचा धंदा पुढें चालवून त्यांना त्यानं सुखी केलं होतं. न्याय–नीति आणि धर्माचं पालन करून त्याच्या वडिलांनीं गृहस्थाश्रम यशस्वीपणानं पार पाडला होता. आतां भगवंताचं चिंतन हें एकच काम त्यांना राहिलं होतं. कृतकृत्य झालेला माणुस ज्या आनंदांत असतो त्या आनंदांत अमृतराव असलेले श्रीरंग पहात होता या जीवितापासून आणखी कोणतं सुख मागण्यासारखं आहे, असं त्याला वाटत होतं. त्याच्या स्वतःच्या आयुष्याचं पाणी संथ, स्थिर, निर्मळ वहात होतं. तें कधीं बदलेल अशी त्याला शंका देखील नव्हती.

परंतु त्याच्या आयुष्याचा संथ प्रवाह जिच्यायोगें बदलावा अशी एक गोष्ट याच सुमारास घडली. ती घडली तेव्हां तिचा त्याच्या आयुष्या-वर कायमचा परिणाम व्हावा असं तिचं स्वरूप मुळींच नव्हतं. त्याच्या बंगल्याच्या कामावर एक मोठा अपघात झाल्याची बातमी त्याला कळली एवढाच त्या घटनेचा प्रारंभ होता.

जिथं मोठाली बांधकामं चालतात तिथं अधूनमधून अपघात हे व्हायचेच. ज्यांच्या आयुष्याचा हा उद्योग असतो अशा एंजिनिअर लोकांना अगर कंत्राटदारांना असल्यां बातम्या वारंवार ऐकाव्या लागतात. पण श्रीरंगानं कंत्राटदाराचा धंदा सुरूं केल्यापासून त्याच्या कामावर अपघात प्रथमच झाला होता. बातमी आली तेव्हां श्रीरंग आपल्या राहुटींत दुपारची डाळरोटी खात बसला होता. तो ताबडतोब कामाच्या जागेकडे धावला. दुसऱ्या मजल्यावर बसविण्यासाठीं एक मोठी लोखंडी तुळई चढविली जात असतांना खाली पडली, व त्याखालीं एक ऐन पंचविशींतला ॲसिस्टंट एंजिनियर सांपडला होता. त्याच्या डोक्याला जोराचा मार बसला होता आणि तो तात्काळ बेशुद्ध झाला होता. श्रीरंगानं ताबडतोब त्याला मोटारींत घातलं आणि शहरांतल्या मोठ्या इस्पितळांत नेलं. या तरुणाला मुद्दाम कामावर घेतल्याची गोष्ट अवघ्या दोन दिवसांपूर्वींच कामावरच्या मुख्य एंजिनिअरनं श्रीरंगाला सांगितली होती. तो श्रीरंगाला म्हणाला होता, ' माझ्या भावाबरोबर हा मुलगा एंजिनिअरिंग कॉलेजांत होता. सबंध ' करीअर ' फर्स्टक्लास आहे त्याची. येवढंच कीं तो हिंदू नाहीं, मुसलमान आहे. '

श्रीरंग हंसून म्हणाला होता, ' असेना का ! आपण कांहीं त्याला वेद शिकवायसाठीं घेत नाहीं ना ! आपण बंगला बांधतों आहोंत, आणि या कामांत त्याचा किती उपयोग होईल एवढंच आपल्याला पाह्यचं आहे.'

' उपयोग म्हणजे काय, फारच उपयोग होईल ! अतिशय डोकेबाज मुलगा आहे. पदवी मिळविल्यानंतर दोन वर्षे एका मोठ्या युरपिअन कंपनींत त्यानं उत्तम काम केलं आहे. '

' होय ? मग तो आपल्या या लहानशा कामावर येतो आहे हें आश्चर्यच आहे म्हणायचं ? '

' हो, माझ्या भावाचं पत्र घेऊन तो माझ्याकडे नोकरी मागायला

आला तेव्हां मलासुद्धां फार आश्चर्य वाटलं. तूं इकडे कां येऊं इच्छितोस असं मी त्याला विचारलं. पण त्या प्रश्नाचं उत्तर देण्याची त्याची इच्छा दिसली नाहीं.'

"'हरकत नाहीं. त्याचीं काय कारणं असतील त्यांच्याशीं आपल्याला काय करायचं आहे? आपल्याला एक उत्तम माणूस मिळतो आहे ना? ठेवून घ्या! त्याचा पगार बिगार तुम्हींच ठरवा. तुम्हीं कराल तें मला मान्य आहे!'

हॉस्पिटलमध्यें त्याला घेऊन गेल्यानंतर डॉक्टर जेव्हां त्याची तपासणी करूं लागले तेव्हां श्रीरंगानं रशीदकडे प्रथमच नीट निरखून पाहिलं. बांध्यानं तो किरकोळच होता. त्याची उंची फार तर पांच फूट पांच इंच असेल. त्याचा वर्ण सांवळा होता. त्याच्याकडे पाहतांना जर कशाकडे श्रीरंगाचं लक्ष वेधलं असेल तर त्याच्या डोळ्यांकडे. ते मिटलेले होते. पण अगदीं कोरल्यासारख्या वाटणाऱ्या दाट भुवया, डोळ्यांचीं टपोरीं झांकणं, आणि लांबसडक दाट काळ्याभोर पापण्या यांमुळें ते मिटलेले डोळे कदाचित् उघडे असतांना दिसले नसते इतकें मोहक दिसत होते. त्याच्या नाकाच्या व तोंडाच्या ठेवणीकडे श्रीरंगाचं लक्ष गेलं, पण त्याची नजर खिळून राहिली ती रशीदच्या डोळ्यांवर. त्या बेशुद्ध अवस्थेंत त्याच्या दोन भुवयांच्या मधोमध एक उभी अढी पडली होती. तिच्याकडे बघतां बघतां श्रीरंगाच्या मनांत येत होतं, बेशुद्ध होण्यापूर्वीं याच्या मनातला अखेरचा विचार सुखदायक नसावा. कदाचित् मार बसल्याबरोबर बिचाऱ्याला मृत्यूची कल्पना झटकन् आली असेल. कदाचित् शुद्धींतल्या अखेरच्या क्षणीं बिचाऱ्याला आपल्या आईबापांची आठवण झाली असेल. कदाचित् बायकोची झाली असेल. याच्या घरीं कोण असेल कोण जाणे. याचं घर आणि याचीं माणसं कुठें असतील तें तरी कुणास ठाऊक! त्यांना कल्पना तरी असेल काय, कीं या वेळेस हा अशा अवस्थेंत इकडे

इस्पितळांत पडलेला आहे. आणि ज्या क्षणीं वरच्या मजल्यावरून लोखंडी तुळई सुटली, आणि ' समालो समालो ' ह्मणून कामावरच्या लोकांनीं एकच ओरडा केला त्यावेळीं या रशीदला तरी कल्पना असेल काय, कीं त्या तुळईचा तडाखा आपल्याला लागून आपण या आयुष्यापासून पार दूर ओढले जाणार आहोंत... हे विचार करतां करतां श्रीरंगाला रशीद-विषयीं नुसती अनुकंपाच नव्हे तर फार तीव्र जिज्ञासा वाटूं लागली. माणसं एकत्र आलीं तरी एकमेकांशीं बेफिकीरीनं वागतात, एकमेकाची नीट ओळख करून घेण्याचा प्रयत्न करीत नाहींत, मृत्यु अकस्मात् झडप घाल-णार आहे व आपल्यापैकीं एकाला नेणार आहे असं जर कुणी आधीं सांगितलं तर मात्र माणसं असं वागायचीं नाहींत, एकमेकांशीं जास्तीत जास्त सहानुभूति ठेवतील, अधिक प्रेम करतील, जिव्हाळा दाखवितील, हें माझं, तें तुझं, अशा प्रकारें क्षुल्लक भांडणं करणार नाहींत...महाराष्ट्रीय संत कवींच्या वाङ्मयांत लोकांना एकच इषारा पुन: पुन्हां दिलेला आहे, ' बाबानो, आपल्या सर्वांच्या भोंवतीं मृत्यु घोटाळतो आहे, विसरूं नका.'

श्रीरंग स्वत:शींच दचकला. रशीदच्या सुंदर डोळ्यांकडे आणि भुवयांमधल्या अढीकडे पहाता पहातां आपण आपले विचार कुठल्या कुठें भडकूं दिले याचं त्याला आश्चर्य वाटलं. अलीकडे त्याचं त्यालाच वाटूं लागलं होतं, कीं आपल्या मनाची ठेवण वाजवीपेक्षां जास्त गंभीर तर व्हायला लागली नाहीं ? त्याच्या बरोबरीची तरुण माणसं फार निराळ्या तऱ्हेनं वागतांना त्याला दिसत. त्यांचा रंगेलपणा, त्यांच्या आवडीनिवडी, त्यांचे छंद निराळ्या प्रकारचे असत. तो स्वत: अगदीं सुखांत व आनंदांत होता. पण अधुन मधून त्याच्या मनांत येई, माझ्या वयाला न शोभेल असं गांभीर्य माझ्या ठिकाणी आलं आहे का ? हें गांभीर्य चांगलं कीं वाईट ? इतरांच्यासारखं रंगेल होणं मला सुचतच नाहीं, असं कां ? त्याच्या मित्रांपैकीं कांहींचीं लग्नं झालीं होतीं, कांहीं प्रेमांत सांपडले होते...

तितक्यांत डॉक्टरांची तपासणी पुरी झाली व ते म्हणाले, ‘ लक्षण ठीक नाहीं. मेंदूच्या आंत रक्तस्राव होतो आहे ! ’

श्रीरंग उद्गारला, “ अरेरे ! ’

रशीदचे डोळे उघडे असतांना कसे दिसत असतील ? क्षणमात्र का होईना परंतु तसे ते पहावयास मिळावेत अशी श्रीरंगाला तीव्र इच्छा झाली. रशीदच्या ज्या आयुष्यावर त्याच्या डोळ्यांदेखत आतां कदाचित् अखेरचा पडदा पडणार होता तें आयुष्य कशा प्रकारचं असेल याविषयीं विलक्षण कुतूहल श्रीरंगाला वाटलं. त्याच्या मनांत आलं, दोन चार मिनिटां-पुरता तरी रशीद शुद्धीवर येईल काय व चार शब्द तरी तो आपल्याशीं बोलेल काय ?

तो रशीदच्या अंथरुणापासून क्षणभरदेखील दूर झाला नाहीं. डॉक्टरांच्या बरोबरच तोही सारखा बसून राहीला होता.

पहांटे डॉक्टर त्याला हलकेच म्हणाले, ‘ दैव आपल्याला मदत करणार असं चिन्ह दिसतयं्, पेशंट शुद्धीवर येतो आहे असं वाटतं. ’

वाऱ्याच्या झोतान विझूं लागलेल्या दिव्याची ज्योत स्थिर होणार असं वाटल्याबरोबर आपण हाताचा आडोसा तिच्या भोंवतीं धरून तिला जपण्याचा प्रयत्न विशेष कसोशीनं करतों. रशीदच्या बाबतींत डॉक्टरनीं तशीच धडपड घाईघाईनं सुरूं केली.

रशीदनं हलकेच डोळे उघडले. डोळ्यांत जिवंतपणा अगदीं उरला नव्हता, ते उघडे असूनही त्यांत नजर नव्हती. त्या नजरेमागं जो जीव होता तो येवढंच सांगत होता, कीं मी शिणलों आहे, थकलों आहे, माझा तोल सुटला आहे, तो मला सांवरतां येणं शक्य नाहीं, तेव्हां आतां जाऊं दे तो तोल. श्रीरंगाला वाटलं, रशीदचे उघडे डोळे आपल्याला दिसले नसते तर बरं झालं असतं. त्याचे मिटलेले डोळेच फार सुंदर होते. या उघड्या

डोळयांची थकलेली केविलवाणी नजर आतां जन्मभर श्रीरंगाला वरचेवर आठवणार होती. तिचा त्याला कधीं विसर पडणं शक्य नव्हतं.

रशीद कांहीं तरी बोलण्याचा प्रयत्न करूं लागला. त्यानं ते श्रम करूं नयेत अशा बुद्धीनं डॉक्टरांनीं त्याला खूण केली. उलट त्याच्या तोंडून कांहीं शब्द निघाला तर तो आपल्याला ऐकूं यावा अशा बुद्धीनं श्रीरंगानं त्याच्या तोंडाशीं आपलं तोंड नेलं. डॉक्टरांची गप्प बसण्याची खूण समजण्याइतपत रशीद भानावर नव्हता असं असेल, किंवा त्याला बोलण्याची जबरदस्त इच्छा झाली होती असं असेल. त्याच्या ओठांची जोरानं हालचाल झाली. परंतु त्याची इच्छा अन् त्याच्या शरीराची शक्ति यांत आतां भलतं अंतर पडलं होतं.

' मी पोलिसांच्या हातीं सांपडलों नाहीं ... त्यांच्या छळाला मी बळी पडलों असं समजूं नकोस ... माझं स्वातंत्र्य शाबूत असतांना मी मेलों ... असं तिला सांगा ... ' अशा अर्थाचे तुटक शब्द त्यानं पुनः पुन्हा मोठ्या प्रयत्नानं काढले.

' तिला म्हणजे कुणाला ? — ' श्रीरंगानं वरचेवर विचारलं.

' माझी बहीण ... माझी लाडकी गुलशन. — ' अधिकाधिक खोल होत जाणाऱ्या आवाजांतले शब्द श्रीरंगाला ऐकूं आले. किंवा खरं म्हणजे त्याला ते शब्द स्वच्छपणें ऐकूं आले नाहींत, तर जें अस्पष्ट क्षीण आवाजांत त्याला ऐकूं आलं त्यावरून त्यानं ते बनविले.

रशीदची शुद्ध कायम टिकावी म्हणून डॉक्टरांनीं आटोकाट प्रयत्न केले, परंतु ते व्यर्थ गेले. त्यानं पुन्हां डोळे मिटले ते उघडले नाहींत. 'माझी बहीण ... लाडकी गुलशन!' हा त्याचा उद्‌गार अखेरचा ठरला.

—o—

# ४

श्रीरंगाला पडलेला पेंच मोठा चमत्कारिक होता. रशीदच्या मृत देहाची व्यवस्था शक्य तो त्याचे जे कोणी नातलग असतील त्याजकडून व्हावी अशी व्यवस्था करणं त्याला आपलं कर्तव्य वाटत होतं; आणि तें कर्तव्य बजावण्याचा मार्ग तर त्याला मुळींच दिसत नव्हता. रशीदचं घर कुठें आहे व तिथें त्याची कोण कोण माणसं आहेत हें ज्या एंजिनिअरनीं त्याला कामावर घेतलं त्यांनाहि माहीत नव्हतं. त्यांच्या भावाला कदाचित् ही माहिती असेल अशा कल्पनेनं श्रीरंगानं त्याला तातडीची तार केली, कीं, ‘ रशीद दुर्दैवानं अपघातांत सांपडून मेला. तुम्हांला शक्य असेल तर त्याच्या घरीं जा, अन् त्याच्या मंडळींना घेऊन ताबडतोब इकडे या सगळा प्रवासखर्च मी देईन. काय करतां ते उलट तारेनं कळवा.’ दुसऱ्या दिवशीं या तारेचा जबाब आला कीं, ‘ तुमची तार वाचून फार दुःख झालं. रशीदचं घर कुठें आहे त्याची मला यत्किंचित्सुध्दां कल्पना नाहीं याबद्दल वाईट वाटतं. मी कॉलेजांत त्याच्याबरोबर होतों खरा; परंतु बोलण्यांत एखादे वेळेस त्याच्या बहिणीचा उल्लेख येई तेवढाच. आमच्या कुणाशीच त्याचा स्नेह नव्हता. घरच्या गोष्टी तो कुणालाच सांगत नसे. तो अतिशय हुशार होता, परंतु आम्हां सर्वांना तो एखाद्या रहस्यमय

गूढासारखा वाटे. तुमच्या तारेप्रमाणें मला व्यवस्था करतां येत नाहीं याबद्दल अतिशय वाईट वाटतं.'

रशीदच्या मृत देहाची व्यवस्था त्याच्या नातलगांकडून होण्याची शक्यता अशा प्रकारें बंद झाल्यवर ती जबाबदारी स्वत:- पत्करणं श्रीरंगाला भागच होतं. हॉस्पिटलमधील अधिकाऱ्यांच्या सहाय्यानं त्यानं ती पार पाडली.

परंतु रशीदचा विसर त्याला कांही केल्या पडेना. तो कुठून आला होता, त्याचं घर कुठं होतं, त्यानं अखेरच्या क्षणीं फक्त आपल्या बहिणी-चीच आठवण कां केली, त्याचे आईबाप जिवंत नव्हतेच कीं काय, इत्यादि प्रश्न त्याच्या मनांत वरचेवर येत. त्यांचीं उत्तरं मिळविल्याशिवाय आपल्या मनाचं गेलेलं स्वास्थ्य मिळणार नाहीं असं त्याला उत्तरोत्तर अधिकाधिक वाटूं लागलं. एकदां त्याच्या मनांत आलं, अरे आपल्याला हवी ती माहिती मिळविणं सोपं आहे. अमक्या नांवाचा मनुष्य अमक्या ठिकाणीं कामावर असतांना अपघातांत सांपडून मेला, त्याचे जे कोणी ऋणानुबंधी असतील त्यांनीं कृपा करून खालील पत्त्यावर पत्रव्यवहार करावा अशी जाहिरात वृत्तपत्रांत दिली म्हणजे झालं. ही कल्पना येतांच त्यानं अंथरुणांतून एकदम उडी मारून जाहिरात लिहायला सुरुवात देखील केली. पण तितक्यांत त्याला रशीदचे उद्गार आठवले. 'मी पोलिसांना सांपडलो नाहीं...त्यांच्या छळाला मी बळी पडलों असं समजूं नकोस.' ही आठवण झाल्याबरोबर पुढें घेतलेला कागद आणि उघडलेलं फाउंटन पेन श्रीरंगानं दूर सारलं. तो मनाशीं आश्चर्य करूं लागला, 'मी पोलि-सांना सांपडलों नाहीं' ही काय भानगड आहे? रशीदनं कांहीं गुन्हा केला होता कीं काय? आणि तो इतर कुणालाहि नसला तरी त्याची बहिण गुलशन हिला माहित होता! आणि कुठें तरी लपून दिवस काढण्या-साठींच रशीद इकडे सुरतेस आपल्या या बंगल्याच्या कामावर नोकरीला

राहिला होता म्हणावयाचा ?...रशीदचं हें प्रकरण अधिकच रहस्यमय व्हायला लागलं होतं ! आणि त्या रहस्याला ज्यायोगानं उलगडा होईल असा धागा कुठें कसा मिळवावा तें तर श्रीरंगाला मुळींच समजेना. रशीदच्या उघड्या डोळयांची ती केविलवाणी नजर श्रीरंगाच्या दृष्टीला पुनः पुन्हां स्पष्ट दिसे. त्याचे मिटलेले डोळे किती विलक्षण मोहक होते त्याची श्रीरंगाला आठवण होई. आणि ‘ माझी बहीग . . . . लाडकी गुलशन ! ’ असे शब्द स्पष्ट ऐकल्याचा भास होऊन तो झोपेंतून दचकून जागा होत असे. . .

रशीदच्या चरित्रांतला एकच दुवा श्रीरंगाला माहीत झाला होता. तो म्हणजे त्याचीं बहीग गुलशन. तिच्यावर त्याचं विलक्षण प्रेम असलं पाहिजे हें उघड होतं. परंतु या एका दुव्यापलिकडे श्रीरंगाला जातां येईना, नव्हे, या दुव्यापर्यंत तरी कसं पोचावं हेंही त्याला समजेन . दहा बारा दिवस अंधारांत आणि आश्चर्यांत तो तसाच चाचपडत धडपडत राहिला.

पण मग एके दिवशीं रात्रीं जेवण आटपून तो आपल्या कॉटवर वाचीत पडला असतांना त्याच्या मनांतला कुठला सांधा कसा सरकला कोण जाणे, पण हातांतलं पुस्तक टाकून देऊन तो एकदम बसला व स्वतःशींच मोठ्यांदा म्हणाला, ‘ अरे, ही साधी गोष्ट माझ्या लक्षांत अजून आली नव्हती. किती मूर्ख मी ! छे छे ! डिटेक्टिव्हच्या धंद्यांत मी अगदीं नालायख ठरलों असतों खास ! ’

त्यानं तावडतोब एक छोटीशीं जाहिरात लिहून काढली.

गुलशनच्या लाडक्या भावाचा एक स्नेही तिला भेटूं इच्छितो. अमुक पत्त्यावर ती मेहेरबानी करून पत्र पाठवील काय ?

दुसऱ्या दिवशीं त्या जाहिरातीच्या दहा बारा प्रती काढून त्यानं निरनिराळ्या इंग्रजी व उर्दू पत्रांकडे पाठवून दिल्या.

त्याला फार आशा होती कीं हा आपला तोडगा यशस्वी ठरेल. रोज टपाल आलं कीं कंपनीच्या कामाचीं सारीं पत्रं तो भराभर दूर करी व आपल्या जाहिरातीचं उत्तर आलं आहे की नाहीं ते अधाशीपणानं पाहूं लागे. पण त्याला हवं तें पत्र दिसत नसे. आणि मग निराशेचा एक श्वास सोडून तो कांहीं वेळ सचिंत होऊन आपल्या जागीं बसून राही. त्याच्या मनाची उत्तरोत्तर जास्तच दृढ भावना होऊं लागली होती, कीं गुलशनची गांठ घेणं हें दुर्दैवी रशीदविषयींचं आपलं पवित्र कर्तव्य आहे. बिचारीला कल्पनाहि नसेल, कीं तिचा लाडका भाऊ या जगाचा कायमचा निरोप घेऊन गेला आहे, आणि तो तिला आतां पुन्हां कधींहि दिसणार नाहीं ! त्याच्या प्रयत्नाला कधी काळीं यश आलं व गुलशन त्याला भेटली तर तिच्या भावाच्या मृत्यूची बातमी तिला सागणं आणि तिचं सांत्वन करणं या फार कठीण गोष्टी होत्या. पण त्या करायला हव्या होत्या. तें एक त्याचं अत्यंत पवित्र कर्तव्य होतं. त्याचं कुटुंब कदाचित् फार गरीब असलं तर पैशाची मदत करणं देखील त्याचं कर्तव्य होतं. ती करतांना त्यांचा स्वाभिमान दुखविला जाणार नाहीं असं वागणं आवश्यक होतं. तें त्याला कसं काय साधणार होतं कुणाला ठाऊक ! फार कठीण होत्या या साऱ्या गोष्टी ! परंतु त्या केल्यावाचून गत्यंतर नव्हतं. तें त्याचं एक पवित्र कर्तव्य होतं. गुलशन भेटली कीं तो म्हणणार होता, ‘ हें पहा, मी जें तुम्हांला सांगणार आहे तें तुम्ही फार धीरानं ऐकलं पाहिजे. तुमचा भाऊ रशीद— ’ परंतु या काल्पनिक संवादाचा सराव करून ठेवण्याचा काय उपयोग होता ? दिवसामागून दिवस जात होते. त्याच्या जाहिरातीचं उत्तर त्याच्या टपालांत त्याला सांपडत नव्हतं. ती त्याला भेटेल ही आशा दुरावत चालली होती. आणि त्यामुळें तो एक भलताच विचार करूं लागला होता. रशीदची माहिती पोलिसांना होती. समजा आपण सांगितलं, कीं रशीद माझ्याकडे कामावर होता व तो

अपघातानं वारला, तर पोलीस आपल्याला कोणता त्रास देऊं शकतील? रशीदनं एखाद्या गंभीर स्वरुपाचा गुन्हा केला होता असं गृहीत धरलं तरी त्या गुन्ह्याशीं आपला अर्थाअर्थी कांहीं संबंध नव्हता असं आपण सांगू शकूं. तें पोलिसांना पटायला काय हरकत होती? आणि समजा पोलिस आपल्याला त्रास देऊं लागले तरी काय बिघडलं? यांतून गुलशनची भेट घेण्याचं कांहीं तरी साधन निष्पन्न होऊन आपल्या हातीं येईल खास. आपल्याला गुलशन भेटेल! त्यासाठीं येवढा त्रास सहन करावा लागला तरी कांहीं हरकत नाहीं...

ही कल्पना इतकी बळावत गेली कीं, त्या योजनेंतला भयाचा भाग त्याला दिसेनासाच झाला. त्या कल्पनेकडे तो जास्त जास्त ओढला जाऊं लागला. स्वतःच्या मनाच्या अनिश्चयाचा त्याला राग येऊं लागला. शेवटीं एके दिवशीं ही कल्पना अंमलांत आणायचं त्यानं ठरविलं. पोलिस खात्यांतले एक इन्स्पेक्टर त्याच्या परिचयाचे होते. त्यांना टेलिफोन करण्यासाठीं त्यानं डायलवरचे आंकडे फिरविले. तो नंबर गुंतलेला होता. ठीक आहे, पांच मिनिटांनीं पुन्हां फोन करूं असं मनाशीं म्हणून श्रीरंगानं रिसीव्हर परत ठेवला. पण टेबलावरच्या कागदांकडे तो वळला न वळला तोंच टेलिफोन वाजला. त्यानं रिसीव्हर कानाला लावून म्हटलं, 'हॅलो!'

'प्रसाद ॲन्ड को.चं ऑफीस काय?'

प्रश्न इंग्रजींत केला गेला होता. आवाज स्त्रीचा होता!

श्रीरंगानं उत्तर दिलं. 'होय, प्रसाद ॲन्ड को.चं ऑफिस!'

'श्रीरंग अमृत भोसले आहेत काय?' अतिशय आदबीनं प्रश्न विचारला गेला.

श्रीरंग म्हणाला, 'आहेत. तेच बोलताहेत'

'Oh!' असा उद्गार काढून तिकडून बोलणारी स्त्री क्षणभर स्तब्ध राहिली व नंतर ती म्हणाली, 'मी विचारतें त्याबद्दल आपण मला

क्षमा करा, पण आपण ज्या जागीं बोलतां आहां त्या जागीं आपण एक-टेच आहांत काय ?'

'होय. मी अगदीं एकटा आहे !'

मग ती एकदम म्हणाली, 'माझं नांव गुलशन !'

अगदा कानाला तोंड लावून बोलल्याप्रमाणें ती अतिशय हलक्या आवाजांत बोलत होती.

श्रीरंग म्हणाला, 'तुमची भेट घेण्याची माझी फार इच्छा आहे.'

ती इंग्रजींत म्हणाली, 'समजलें'

'तुम्ही इकडे येऊं शकाल ?'

'माफ करा, पण मला तिकडे येणं शक्य नाहीं. किंबहुना तुमची गांठ मला उघडपणानं घेतां यायची नाहीं.'

'ही मोठी पंचाईत आहे म्हणायची. मग तुमची माझी भेट व्हायची कशी ?'

'मी सांगतें त्या ठिकाणीं तुम्ही येण्याचं कबूल कराल तर होईल !'

'येईन.'

'येण्यात धोका आहे असं मी सांगितलं तरी याल ?'

'येईन.'

'थँक यू'

'कुठें येऊं सांगा ?'

तिनं भायखळ्याकडील एका रस्त्याचं नांव सांगितलं आणि कोपऱ्यावरच्या एका लहानशा इराणी हॉटेलचं वर्णन करून ती म्हणाली, 'हें दुकान पहाटे पांच वाजतां उघडतं त्या वेळेस तुम्ही त्या हॉटेलांत आलांत तर अगदीं कोपऱ्यांतल्या एका टेबलावर बसलेली मी तुम्हाला दिसेन.'

'ठीक आहे. मी येईन. केव्हां येऊं ?'

'उद्यां पहाटे या.'

' उद्यां ! ' असं विचारतांना श्रीरंग मनाशी म्हणत होता, हें कसं जमायचं ? आतां संध्याकाळच्या मेलनं मी पुण्याला जाणार आहे; बाबा माझी वाट पहातील; आज वीस दिवस झाले मी घरीं गेलों नाहीं.

तिनं विचारलं, ' कां ? कांहीं अडचण आहे काय ?

श्रीरंगानं उत्तर दिलं, ' नाहीं, कांहीं अडचण नाहीं. मी उद्या पहाटे येईन. नक्की. '

' तुम्ही दुकानांत आलांत कीं मधोमधच्या टेबलाशीं बसा. आणि चहा न मागविता ' कॉफी ' असं मोठ्यानं म्हणा. म्हणजे मी तुम्हाला ओळखेन. मी काळी साडी नेसलेली असेन. तुमची कॉफी पिऊन झाली कीं मी उठेन. तुम्ही माझ्या मागोमाग बाहेर पडा. मग आपण भेटूं. '

' ठीक आहे. ' असं उत्तर देतांना श्रीरंगाच्या मनांत येत होतं, हा इतका चोरटा गुपचुप प्रकार कशासाठीं ? मी एखाद्या भलत्या भानगडींत तर पडत नाहीं ? '

ती म्हणाली, ' थँक यू ! '

' थँक यू ! ' असं म्हणून तो रिसीव्हर खालीं ठेवणार होता, इतक्यांत तिनं विचारलं.

' तो सुखरूप आहे ना ? '

श्रीरंगाच्या अंगावर एकदम झर्रकन कांटा उभा राहिला. ' होय ' असं म्हणून त्यानं टेलिफोन बंद केला.

नंतर त्यानं पहिली गोष्ट केली ती ही, कीं ऑफिसच्या शिपायाला बोलावून सांगितलं, कीं ' अरे, मी पुण्याला जात नाहीं. माझं तिकिट काढून आणूं नकोस.

घरीं जाण्याचा ठरलेला बेत तो आज प्रथमच बदलीत होता. त्याच्या बाबांनीं त्याची वाट पाहिली, आणि त्यानं

त्यांची निराशा केली असं कधीं झालं नव्हतं. या गुलशन-मुळें तो आज प्रथमच आपल्या वडिलांच्या निराशेकडे दुर्लक्ष करणार होता. त्याला मनांतल्या मनांत तिचा राग आला. आपल्या आयुष्याच्या संथ प्रवाहांत एखादा लहानसा खडा पडून नवीनच तरंग उठत आहेत असं त्याला वाटलं. आपण गुलशनला उद्यां पहाटे भेटण्याचं वचन दिलं हें कांहीं बरं केलं नाहीं असं त्याच्या मनांत येऊं लागलं ...

दुसऱ्या दिवशीं पहाटे तिनं सांगितलेल्या ठिकाणी प्रत्यक्ष जाऊन पोचेपर्यंत त्याचीही भावना कायम होती. जोंपर्यंत गुलशनचा पत्ता लागत नव्हता तोपर्यंत तिची गांठ घेण्याची त्याला अतिशय तीव्र इच्छा वाटत होती. ती भेटण्याची आशा कमी कमी होत गेली त्या प्रमाणांत त्याच्या मनांतील हट्ट कमी होण्याऐवजी वाढत गेला. दैव अनुकूल नाहीं असं दिसलं कीं ज्याची इच्छा धरली त्याची किंमत माणसाला अधिकच वाटूं लागते, आणि माणसाच्या मनांत आग्रह निर्माण होतो. गुलशनच्या बाबतींत श्रीरंगाची मनोवृत्ति कांहींशी अशीच झाली होती. तिची गांठ घेणं हें आपलं पवित्र कर्तव्य आहे हें वाक्य त्याला एकदां केव्हां तरी सुचलं व मग तें घट्ट धरून तो घोकीत राहिला. परंतु कर्तव्य आहे म्हणजे कोणत्या कारणासाठीं आहे, असं कांहीं त्यानं कधीं आपल्या मनाला हटकून विचारलं नव्हतं. मुख्य गोष्ट अशी होती, कीं गुलशनची भेट घेणं जवळ जवळ अशक्य आहे हें पाहिल्यावर त्या भेटीचं आकर्षण त्याला विशेष वाटलं होतं. त्याच्या मनानं एक प्रकारचं आव्हान स्वीकारलं होतं. तो इरेस पेटला होता. कोणत्याही उपायानं कां होईना व कुठेंहि अन् केव्हांहि कां होईना तो तिला भेटायासाठीं उत्सुक होता. कर्तव्याची भाषा केवळ त्या उत्सुकतेचं समर्थन करण्यासाठीं होती.

आतां गुलशनच्या भेटीचा मार्ग त्याला उपलब्ध झाला होता, पण त्याच्या मनांतली उत्सुकता लटपटत होती. तिच्या भेटीसाठीं आपण

पुण्यास जाण्याचा बेत रद्द करून आपल्या बाबांना थोडं कां होईना दुःख दिलं ही गोष्ट त्याच्या मनांत खोल कुठें तरी सलत राहिली होती. त्याला वाटत होतं, हा शकुन कांहीं चांगला नाहीं. शिवाय गुलशन ज्या तऱ्हेनं अन् ज्या ठिकाणीं त्याला भेटणार होती त्यावरून ती कांहीं साधी स्त्री नव्हती हें स्पष्ट दिसत होतं. रशीदच्या आयुष्यांत रहस्य होतं त्याप्रमाणें या मुलीच्याहि आयुष्यांत असावं. अशा स्त्रीच्या संपर्कात जाण्यावांचून आपलं काय अडलेलं आहे? आपण भेटण्याचं वचन दिलं असलं म्हणून काय झालं? तें पाळलंच पाहिजे असं कोणतं बंधन आपल्यावर आहे? ती येईल, वाट पाहील, निघून जाईल. फार तर आपण वचन पाळलं नाहीं म्हणून आपल्याला शिव्या देईल. आणखी पुढें अशीही कल्पना करूं कीं कदाचित् आपल्याला ती टेलीफोन करील. पण तिनं तो केला तर तिचा आवाज ओळखल्याबरोबर, सॉरी ' म्हणून तो बंद करणं अवघड होतं कीं काय!...

पहाटेच्या वेळचा गार वारा अंगावरून घेत घेत गुलशनच्या भेटीला जात असतांनादेखील श्रीरंगाच्या मनांत अशा प्रकारचे विचार येत होते. ज्या रस्त्यानं तो हलके हलके, मनांतल्या उलट सुलट विचारांमुळें रेंगाळत पावलं टाकीत होता तो रस्ता एका रेल्वेच्या पुलाला लागून गेलेला होता. त्याच्या आजुबाजूस वस्ती अगदींच तुरळक होती. शेजारी कुठें तरी तबेले असावेत. कारण घोड्यांच्या मलमूत्राचा दर्प हवेंत दरवळला होता. डाव्या बाजूला एका चंद्रमौळी घरापुढच्या लहानशा मोकळ्या जागेंत चार पांच पठाण एका खाटेवर बसून हुक्का पीत होते, व त्यांच्यांतला एकजण एक जुनाट बुलबुलतरंग मांडीवर घेऊन तारांवर पहाडी गीत वाजवीत होता. भोंवतालच्या धुळींत गलिच्छ पण गलेलठ्ठ अशी पिवळी पांढरी मांजरं पहुडलीं होतीं. रस्ता अगदीं अरुंद होता, परंतु त्याच्या दोन्ही बाजूंस झाडं पुष्कळ होतीं. त्यांवर पक्ष्यांची किलबिल

चाललेली होती. पावरोटीच्या एका लहानशा भटारखान्यांत भट्टया पेटल्या होत्या, त्यांचा लालसर उजेड रस्त्यावर पडला होता. गुलशननं सांगितलेलं वर्णन श्रीरंगाला आठवलं. या भटारखान्याच्या जरा पुढें गेलं, कीं रस्त्याच्या कोंपऱ्यावर—

श्रीरंगानं नजर लांबवून पाहिलं तों त्याला कोपऱ्यावर हॉटेल दिसलं. तेंच तें हॉटेल असलं पाहिजे. तो जवळ गेला, व हॉटेलच्या दारावरची मळकट पाटी त्यानं वाचून पाहिली. 'याझदानी हॉटेल.' बरोबर आहे ! पायरीपाशीं त्याचा पाय पुन्हां घोंटाळला. अजून परत फिरणं याला शक्य होतं !... परंतु विचाराचा हा तरंग स्थिर होण्यापूर्वीच त्याला न कळत त्यानं आंत पाय टाकलासुद्धां होता, त्याची नजर कोपऱ्याकडे धांवलीसुद्धां होती, आणि तो मनाशी म्हणत होता, 'तीच !'

ती त्याला पाठमोरी दिसली. परंतु काळया साडीवरून त्यानं तिला चटकन् ओळखलं.

तो दुकानांतल्या मधोमधच्या टेबलापाशीं गेला, व नोकर त्याच्या जवळ आला तेव्हां त्यानं मोठ्यानं म्हटलं, "कॉफी !'

तिच्याकडे आपली नजर वळूं न देण्याचा निश्चय त्यानं मोठ्या प्रयत्नानं पार पाडला. तिची पाठ त्याच्याकडे वळलेली होती तरी त्याची प्रत्येक हालचाल तिला समजत असावी. कारण कॉफी संपवून त्यानं कप बशींत ठेवल्याबरोबर ती आपल्या जागेवरून उठली, त्याच्याकडे यत्किंचितूही लक्ष न देतां त्याच्या अंगावरून जाऊन दारापाशीं बसलेल्या मालकापुढें तिनं पैसे टाकले, व ती बाहेर पडली. श्रीरंग क्षणभर तिच्याकडे पहात राहिला. तिची भेट न घेणं अजून शक्य होतं ...

परंतु दुसऱ्याच क्षणीं तो उठला. तिच्यांत व आपल्यांत फार अंतर पडूं नये म्हणून तो घाईनं दाराकडे गेला. त्यानं मालकापुढें पैसे टाकले व तो बाहेर पडला.

ती अगदीं सावकाश चाललेली त्याला दिसली. झपाझप पावलं टाकून त्यानं तिला गांठली, व थोडसं अंतर ठेवून परंतु तिच्याबरोबर तो चालूं लागला.

त्याच्याकडे पाहाण्याचा मुळींसुद्धां प्रयत्न न करतां जणूं स्वतःशीं बोलल्याप्रमाणें ती म्हणाली, 'तुम्ही आलांत याबद्दल मी फार आभारी आहे.'

टेलिफोनवर बोलतांना ती इंग्रजींत बोलली होती पण आतां ती स्वच्छ मराठींत बोलली होती.

श्रीरंग कांहीं बोलला नाहीं. ती आपल्याकडे पहात नाहीं अशी त्याची खात्री असल्यामुळें त्यानं किंचित् खालीं केलेल्या तिरप्या नजरेनं तिला पाहून घेतलं. रशीदसारखाच तिचा बांधा किरकोळच होता. उंचीनं ती रशीदपेक्षां ठेंगणी असावी. तिचा चेहरा अगदीं त्याच्या सारखा होता. नाक तसंच. ओठांची ठेवण तीच. भुवया तशाच. आणि दाट काळ्याभोर पापण्या—

तितक्यांत ती मान वर करून आपल्याकडे पहाणार असं श्रीरंगाला वाटल्यामुळें त्यानं झटकन नजर फिरविली व तो डाव्या बाजूला पाहूं लागला.

तिनं त्याच्याकडे पाहिलं कीं नाहीं तें श्रीरंगाला कळलं नाहीं, पण तिनं प्रश्न केला तो त्याला ऐकूं आला.

'तुम्हांला कशासाठीं भेटायचं होतं मला ?'

रस्त्यानं सहज चालतां चालतां हिच्या या प्रश्नाचं कसं उत्तर द्यायचं ? . . . श्रीरंग कांहींच बोलला नाहीं.

दोन चार पावलं पुढं गेल्यावर तिनं पुन्हां विचारलं,

'तुम्ही माझ्याकडे कां आलांत ?'

तरी श्रीरंग गप्प राहिला.

तिनं विचारलं, ' त्याची तुमची गांठ पडली होती ? '

' हो ! '

' मग ? '

रस्त्यांतला हा संवाद फार चमत्कारिक आहे असं श्रीरंगाच्या मनांत एकदम तीव्रतेनं आलं, व तो तिला म्हणाला, 'हें पहा, मला तुम्हाला जें कांहीं सागायच आहे तें असं रस्त्यांत सांगण्यासारखं नाहीं. कुठें तरी निवांतपणें बसून तुमच्याशीं पांच मिनिट बोलतां आलं तर मला जें सांगायचं आहे तें सांगतां येईल. '

' असं ? ' तिनं आपल्या पावलांची गति जरा मंद केली. ' पलीकडच्या रस्त्यावर एक लहानसं चर्च आहे, आणि त्याला लागून एक लहानसा बगीचा आहे. तिथें एका मोठ्या झाडाखालीं एक बाक आहे. आपण तिकडे जाऊन त्या बाकावर बसूं. तूमची कांहीं हरकत नाहीं ना ? '

त्याची हरकत ? हा चांगला न्याय ! आतांपर्यंत तिनंच हजार हरकती काढल्या होत्या आणि चोरटेपणानं कधीं नव्हे त्या ठिकाणीं येऊन तिची गांठ घ्यायला आणि रस्त्यांतून अशा विचित्र तऱ्हेनं चालायला तिनं त्याला भाग पाडलं होतं. आणि आतां ती त्याला विचारीत होती, ' तुमची कांहीं हरकत नाहीं ना ? ' तिच्या प्रश्नाचा त्याला चमत्कार वाटला, आणि रागसुद्धां आला. त्याच्या मनांत आलं कीं तिला म्हणावं ' अर्थात् माझी हरकत आहे. तूं उघडपणानं माझ्या ऑफिसांत कां आली नाहींस ? अशा पहाटेच्या वेळीं या विचित्र भागांत मला कशासाठीं यायला लावलंस ? मी काय तुझ्या हुकमाचा ताबेदार आहे होय ? तूं आहेस तरी कोण ? कुणी कां असेनास, मला तुला इतकंच सांगायचं आहे कीं तुझा भाऊ रशीद माझ्याकडे कामावर होता, आणि दुर्दैवानं अपघातांत सांपडून तो मेला. ही गोष्ट तुला कळविणं माझं कर्तव्य आहे असं

गला वाटलं म्हणून मी आलों. ती तुला सांगितली. माझं कर्तव्य संपलं. आतां माझं तुझ्याशीं कांहीं काम नाहीं. जातों मी. '

परंतु हा कठोरपणा त्याला साधला नाहीं. तो तिला म्हणाला, माझी मुळींच हरकत नाहीं. जाऊं. ' आणि तो तिच्याबरोबर पावलं टाकीत राहिला.

बागेत एकही माणूस नव्हतं. अगदीं पूर्ण स्तब्धता होती. झाडांच्या पानांचा आणि गवताचा वास हवेंत भरला होता. पायाखालचं गवत दंवानं ओलं चिंब झालं होतं. अरुणोदयाचा कोंवळा प्रकाश हलके हलके पसरूं लागला होता.

झाडाखालीं गेल्यावर ' इथें बसूं या ' असं म्हणून त्याची वाट न पाहतां ती झटकन् बसली. बाकापुढच्या दाट ओल्या गवतावर तो तसाच उभा राहिला. वर मान करून त्याच्याकडे पाहून ती म्हणाली, ' बसा ना. ' तिचा चेहरा अंधुक लालसर प्रकाशांत उजळलेला त्याला स्पष्ट दिसला. त्याची व तिची ही पहिली दृष्टादृष्ट होती !

---



मनाला फारच त्रास होऊं लागला कीं श्रीरंग आपल्या खोलींत येरझारा घालूं लागे, व दोन्ही हातांचे तळवे कानशिलापासच्या केसांवरून फिरवीत तो चिडून स्वतःला विचारी, मला काय हवं आहे तरी काय? वास्तविक त्या प्रश्नाचं उत्तर अगदीं सरळ आणि उघड होतं. तें स्वतःशीं कबूल करण्याची त्याची तयारी नव्हती इतकंच. त्याला गुलशन हवी होती. तिच्यावर त्याचं प्रेम जडलं होतं. त्या प्रेमापासून स्वतःला परावृत्त करण्यासाठीं तो धडपडत होता, आणि त्याची ती धडपड उत्तरोत्तर अधिकाधिक व्यर्थ ठरत होती. तिचंही आपल्यावर प्रेम जडलं आहे हें त्याला दिसत होतं. परंतु ती स्वतःला तर सांवरीत होतीच, परंतु श्रीरंगानंही आपल्या नादाला लागूं नये असा प्रयत्न करीत होती ही गोष्टही त्याला अधिक स्पष्टपणें दिसत होती.

प्रथम प्रथम ती त्याच्याशीं इतक्या तुटकपणानं वागली होती, कीं कुणाही पुरुषाला वाटावं ही आपला उपमर्द करीत आहे. अमुक ठिकाणी भेटण्याचं तिनं आश्वासन द्यावं आणि तिथें मुळींच येऊं नये. नंतर भेट झाली तरी मागच्या वेळीं श्रीरंगाला निराश केल्याबद्दल तिनं किंचित्‌ही खेद दर्शवूं नये. ‘ आतां पुन्हां केव्हां भेट ? ’ असं तिनं आपण होऊन

तर कधींच विचारूं नये आणि त्यानं प्रश्न केला तर तिनं भुवया चढवून म्हणावं, ' पुन्हां कशासाठीं भेट हवी तुम्हांला ? '

खरं म्हणजे तिचा तो प्रश्न चुकीचा नव्हता. दोन चार वेळां तिला भेटल्यावर श्रीरंगाचं तिच्याजवळ काय काम उरलं होतं ?

चर्चपासच्या त्या बगीच्यांत बाकावर तिच्याजवळ बसल्यानंतर त्यानं तिच्या भावाच्या अपमृत्यूची बातमी जेव्हां तिला सांगितली तेव्हां ती अशा कांहीं धैर्यानं वागली होती, कीं श्रीरंग चकितच झाला होता. तिच्या सौन्दर्याप्रमाणेंच तिच्या धैर्याबद्दलही त्याच्या मनांत आदरयुक्त आकर्षण उत्पन्न झालं होतं. रशीद मेला हें त्याच्या तोंडून ऐकल्याबरोबर तिनं चमकून मान वळवून त्याच्याकडे बघितलं होतं. तिचे डोळे विस्तारले गेले होते. ओठ विलग होऊन तसेच राहिले होते. मग रशीदच्या भुवयांच्या मधोमध श्रीरंगाला दिसली होती तशीच हुबेहुब अढी तिच्या कपाळावर उठली होती. खालचा ओंठ तिनं हलकेच दाबला होता. आणि रशीदच्या दुर्दैवी अंताची हकीकत जेव्हां श्रीरंग सांगूं लागला होता तेव्हां तिनं दोन्ही हातांनीं बाकाची ओली फळी घट्ट दाबून धरली होती आणि ईश्वराची प्रार्थना ऐकत राहिल्याप्रमाणें मान खालीं करून डोळे मिटून धरले होते. तिच्या डोळ्यांतून अश्रू ओघळले नव्हते. तिनं हुंदका दिला नव्हता. श्रीरंगाचं बोलणं संपलं तरी कांहीं वेळ ती तशीच बसली होती; मग तिनं मान वर करून विचारलं होतं, ' मरणापूर्वीचे त्याचे अखेरचे शब्द कोणते होते ? '

श्रीरंगानं म्हटलं होतं, ' माझी बहीण ! माझी लाडकी गुलशन ! '

आवंडा गिळल्याप्रमाणें तिच्या गळ्याची हालचाल झाली होती, आणि बाकाच्या फळीची कड अधिकच घट्ट धरल्याप्रमाणें तिचीं बोटं वळलीं होतीं.

श्रीरंग अगदीं गोंधळून गेला होता. तिचं सांत्वन कसं करावं तें

त्याला समजेना. ती रडली असती तर त्याला म्हणतां आलं असतं, ' तुम्ही शोक आंवरला पाहिजे. आतां कितीहि रडलं तरी रशीद परत येणार आहे काय ? ' मृत्यूची बातमी ऐकून रडणाऱ्या माणसाला सांगण्याच्या व्यावहारिक शहाणपणाच्या अगर वेदांताच्या गोष्टी त्याला ऐकून माहित होत्या. त्या त्यानं तिला सांगितल्या असत्या. परंतु ती मुळींच रडली नव्हती त्यामुळें काय बोलावं तें त्याला सुचेना...तो स्तब्ध बसून राहिला होता.

मग जरा वेळानं तीच बोलूं लागली. ती म्हणाली, ' आतां तुम्हीं जाल तर बरं होईल. ! '

ती असं म्हणेल अशी त्याची अगदी कल्पना नव्हती. त्याचं आश्चर्य ओळखून ती म्हणाली होती, ' रागावूं नका. गैरसमज करून घेऊं नका. पण मला आतां एकटं बसूं द्या. या क्षणीं माझ्याजवळ अगदीं कुणी कुणीदेखील नको असं मला वाटतं आहे. मी इथेंच बसून रहातें, तुम्हीं जा. '

तिच्या नजरेंत त्या वेळेस किती तरी भाव होते. भावाच्या आठवणी, त्याच्या मरणाचं दुःख, एकटेपणा, असहायता, चीड, वैराग्य, आणि श्रीरंगानं रागावूं नये अशीं आर्जवी इच्छा ! तिची ही नजर आपण आपल्या जन्मांत कधीं विसणार नाहीं असं श्रीरंगाला वाटलं.

तो तिच्या जवळून उठला. पण त्याचं पाऊल घोटाळूं लागलं.

ती हलकेच म्हणाली, ' कांहीं झालं तरी तुमचे आभार मला मानले पाहिजेत. '

श्रीरंग म्हणाला, ' मला तुम्हाला, पुन्हां भेटतां येईल का ?

' कशाला ?

' मला भेटावंसं फार वाटतं म्हणून. '

तिनं फक्त किंचित् मान हालवून त्याच्या इच्छेला संमति दिली होती.

त्यानं विचारलं होतं, ' कुठें भेटूं ?

तिनं आपल्या बिऱ्हाडाचा पत्ता सांगितला होता, व मग लगेच ती म्हणाली होती, ' आतां जातां ना तुह्मी ? '

त्यानं मान हालविली होती, व मग झटकन् पाठ फिरवून झपांझप पावलं टाकीत तो निघाला होता. बागेच्या तोंडाचं धाकटं फाटक ओढून परत ढकलतांना त्यानं गुलशनकडे पुन्हां दृष्टि टाकली होती. डोकं खाली करून दोन्ही तळव्यांनीं झांकून घेऊन बसलेली ती त्याला दिसली होती.

नंतरच्या गांठीभेटींत प्रथम तिनं त्याच्याविषयीं पूर्ण अविश्वास दाखविला होता. त्यानं एखादा प्रश्न विचारावा व तिनं अगदीं बेतासबात उत्तर द्यावं अशा प्रकारें त्यांचं बोलणं चाले. तिच्या या वृत्तीवर मनांतल्या मनांत चिडून परंतु वरकांति विनोद केल्याप्रमाणें दाखवून श्रीरंग तिला म्हणाला होता,

' मी वकील आहे, आणि तूं माझ्यापुढें कोर्टांत उभी आहेस असं समजतेस कीं काय तूं ? ही काय तुझी बोलण्याची तऱ्हा ? माझ्याशीं अशा तऱ्हेनं बोलण्याचं काय कारण ? '

ती म्हणाली होती, ' कोण कसं भेटतं, कोणत्या हेतुनं बोलतं त्याचा काय नेम ? तुह्मी कंत्राटाचा धंदा करणारे एक संपन्न गृहस्थ आहांत, माझा भाऊ तुमच्याकडे कामावर असतांना मरण पावला, आणि ती गोष्ट मला कळवायची तसदी तुह्मी घेतलीत यापलीकडे तुमची काय माहिती आहे मला ? कुणी नवीन माणूस भेटलं की प्रथम त्याच्याविषयीं पूर्ण अविश्वास बाळगायचा असंच धोरण ठेवणं आम्हांला भाग असतं.

आम्हांला ? तिचा तो शब्द त्याला आश्चर्यकारक वाटला. त्यानं लगेच विचारलं होतं, ' आम्हांला ? म्हणजे कुणाला ? '

आपल्या तोंडून असावधपणें भलताच शब्द गेला हें गुलशनच्याहि

लक्षांत आलं होतं. परंतु गोंधळून जाण्याऐवजी ती चमत्कारिक हास्य करून म्हणाली होती,

' मी आत्तांच सांगितलं ना ? नवं माणूस भेटलं, की त्याच्याविषयीं बिलकूल अविश्वास बाळगणं, तो वाईट आहे, आपला घात करावसाठीं आपला सहवास जोडतो आहे अशा धोरणानं वागणं हिताचं असतं म्हणून ? मग तुमच्या प्रश्नाचं उत्तर मी देईन अशी अपेक्षा तुम्ही कां करतां ? '

हंसत हंसत हा प्रश्न करतांना तिनं त्याच्याकडे अगदीं रोखून नजर लावली होती. जणू आपल्या शोधक बुद्धीचा पूर्ण झोत टाकून ती त्याला तपासून घेत होती. तिच्या त्या तसल्या नजरेला भिण्याचं श्रीरंगाला कांहींच कारण नव्हतं. तो हंसला व म्हणाला,

' खुशाल पारखून घे मला. परंतु पास झालों तर तसं उघड कबूल कर. मनाशीं उगीच लपवून ठेवूं नकोस. '

त्याच्या बोलण्याचं तिला हंसू आल्यावांचून राहिलं नव्हतं. ती म्हणाली होती, ' कोण आहांत तरी कोण तुम्ही ? ' आणि त्या शब्दांत प्रश्नाचा ध्वनि नव्हता, किंचित् कौतुकाचा होता.

मग श्रीरंगानं आपण कोण, कुठले तें पुष्कळ विस्तारानं तिला सांगितलं होतं, व अखेर विचारलं होतं,

' इतकं समजल्यावर तरी माझ्याबद्दलचा अविश्वास आतां सोडशील कीं नाहीं ? '

नकारार्थी मान हालवीत ती म्हणाली होती,

' असं घाईनं उत्तर देता यायचं नाहीं मला. '

' असं होय ? ' असं ह्मणून तो तिच्याकडे हंसत बघत राहिला होता.

तिनं एकदम विचारलं होतं, ' विश्वास पटविण्यासाठीं तुम्ही काय कराल ? '

तिच्या त्या प्रश्नाचा अर्थ क्षणभर श्रीरंगाला नीटसा कळला नाहीं. पण तें कळल्याबरोबर तो चटकन् म्हणाला होता, ' वाटेल तें. '

ती डोळे आपली मोठाले करून म्हणाली ' बघा हं !

तो म्हणाला होता, ' बघतोंच आहे की ! '

' चेष्टा नका करूं ! '

' बरं चेष्टा नाहीं. बघितलं '

' मी मागेन तें द्याल मला ?'

' आधींच घेऊन बसली आहेस ! '

तिचा चेहरा एकदम गंभीर झाला. चर्येवरचं मोकळं शुद्ध हास्य एकदम नाहींसं झालं. ती त्याच्या जवळून उठून दूर झाली नाहीं. परंतु बसल्या जागींच तिनं ज्या रीतीनं शरीर चाळविलं त्यात दूर सरकण्याचा अभिप्राय स्पष्ट होता. ती त्याला म्हणाली होती,

' हें पहा, काव्यनाटकांतल्या प्रेमिकांच्या भाषेचा माझ्याशीं वागण्यात कांहीं उपयोग नाहीं हें लक्षात ठेवा. माझ्यावर तुमचं मन जडल्यामुळें जर तुम्ही माझ्याजवळ येऊं पहात असाल तर त्यांत अर्थ नाहीं. प्रेम म्हणजे निरुद्योगी लोकांनीं मनाच्या करमणुकीसाठीं करण्याचा एक खर्चिक षोक आहे असं मी मानतें. तें दिव्य असतं, स्वर्गीय असतं, इत्यादि गोष्टी म्हणजे एकमेकाला फसविण्यासाठीं वापरून वापरून टरून गेलेली एक अर्थशून्य बडबड आहे. निदान आतां या क्षणापर्यंत नाटक–कादंबऱ्यांत ज्याचं वर्णन केलेलं असतं तें प्रेम मला भेटलेलं नाहीं. भेटावं अशी इच्छाहि मला नाहीं. तुम्ही म्हणाल मुलखावेगळींच दिसते आहे ही मुलगी. हो, तशीच आहे मी. अन् म्हणून माझ्यावर प्रेम करायसाठीं जर तुम्ही माझ्याजवळ येत असाल तर वेळींच तुम्हीं दूर व्हावं हें चांगलं... '

तशाच प्रकारचं आणखी बोलणं ती करीत रहाणार असं वाटल्यामुळें श्रीरंग तिला अडवून म्हणाला, ' माझा विश्वास पटविण्यासाठीं मी काय करावं तें तूं मला सांगणार होतीस. '

ती म्हणाली, ' सांगणार नाहीं. मागणार आहे.

' माग ! '

' मागेन तें द्याल ? '

' मागून पहा ना ! '

' पाचशे रुपये मला हवे आहेत.

श्रीरंगानं खिशांतून चेकबुक काढलं.

तें पाहून ती म्हणाली, ' अंहं ! चेक नको. तुमची सही गुंतणं बरं नव्हे. रोख पाहिजेत. उद्यां दिलेत तरी चालतील. '

दुसऱ्या दिवशीं श्रीरंगानं तिला पैसे नेऊन दिले होते.

आणि तिसऱ्या दिवशीं ती मुंबईहून नाहीशीं झाली होती.

ती कुठें गेली, कशासाठीं गेली, किती दिवसांसाठीं गेली याची श्रीरंगाला कांहींच कल्पना करतां येईना. तिनं त्याच्यासाठीं बोटभर चिठ्ठीसुद्धां ठेवली नव्हती ! ती नाहींशी झाली होती इतकंच !

तिच्या घरीं तिची आई होती. श्रीरंगानं लागोपाठ दोन हेलपाटे घातले तेव्हां दुसऱ्या खेपेस तिनं त्याला थांबवून घेतलं व ती त्याच्याशी बोलत बसली. ती म्हणाली, ' मला प्रथम वाटलं तिच्या आणि रशीदच्या टोळक्यांतलेच तुम्ही आहांत. म्हणून मी फक्त ती घरीं नाहीं इतकंच सांगितलं आणखी दार बंद केलं. परंतु गुलशन कुठे आहे किंवा रशीद कुठें आहे असं विचारायला तीं माणसं येत नाहींत. तीं कुठें नाहींशी होतात तें त्यांना माहीत असतं. त्यांच्या टोळक्यांत तें आधींच ठरलेलं असतं. तुम्ही दर वेळेस आलांत आणि ती कुठें गेली असं मला विचारलंत. यावरून तुम्ही त्या टोळक्यांतले नाहीं हें आतां माझ्या लक्षांत आलं. '

स्वभावानं ती भावडी आणि बडबडी दिसली. तिच्या बोलण्यावरून असं दिसलं, कीं रशीद जिवंत आहे असंच ती समजत होती. तें लक्षांत येतांच श्रीरंगाला विलक्षण आश्चर्य वाटलं. परतु तिच्या बोलण्याच्या

ओघांतल्या उल्लेखावरून तिचा नवरा म्हणजे गुलशनचा बाप आंधळा व आजारी असल्याचं जेव्हां श्रीरंगाला समजलं तेव्हां त्याचं आश्चर्य नाहींसं झालं. आपला अंथरुणाला खिळलेला आंधळा नवरा म्हणजे मायेने आणखी हळुवारपणानं संभाळण्यासारखी एक जोखीम आहे असं ती मानीत असल्याप्रमाणं ती बोलली. तेव्हां श्रीरंगानं ओळखलं कीं, बापाला व आईला दुःखाचा धक्का बसूं नये म्हणून रशीदच्या मृत्यूची बातमी गुलशननं लपवून ठेवली असावी.

गुलशनच्या आईच्या बोलण्यावरून त्याला कळून आलं, कीं तें कुटुंब मूळचं लखनौकडलं होतं. गुलशनच्या व रशीदच्या लहानपणीं हीं मंडळी मुंबईस येऊन राहिली होती. गुलशनचा बाप विश्वविद्यालयाचा पदवीधर होता, आणि औषधी रसायन करणाऱ्या एका युरोपियन कंपनींत रसायन-तज्ज्ञ ह्मणून त्याला मोठ्या पगाराची नोकरी मिळाली होती. आपल्या दोन्ही मुलांना त्यानं उत्तम शिक्षण दिलं होतं. पांच वर्षांपूर्वी लॅबोरेटरीतल्या अपघातांत विषारी रसायन डोळ्यांत उडाल्यामुळें त्याचे दोन्ही डोळे गेले होते, आणि तो अंथरुणाला खिळून पडला होता. दोन्ही मुलं चांगलीं कर्तीं संवरती निघालीं होतीं. पण—

ती श्रीरंगाला सांगूं लागली, ' कॉंग्रेसची धामधूम सुरूं झाली आणि माझ्या दोन्हीं मुलांच्या डोक्यांत चळवळीचं वेड शिरलं. अरे बाबांनो, असं करूं नका, अशा करण्यानं तुरुंगांत जाल, फांसावर जाल, असं कांहीं त्यांना सांगायला जावं तर तींच आम्हांला सांगतात शहाणपणाच्या गोष्टी. आम्हीं म्हातारे झालों, आम्हांला कांहीं समजत नाहीं हें कदाचित् खरं असेलही. तीं दोघं जें करताहेत तें केल्यानंच सगळे लोक सुखी होणार आहेत असं कदाचित् असेलही. परंतु माया भित्री असते. रात्रंदिवस मला अन् माझ्या नवऱ्याला चिंता वाटते. एखाद् वेळेस मध्यरात्रीं दचकून ते म्हणतात, ' दार वाजलं. रशीद आला वाटतं. जा लवकर आणि घे त्याला

आत ' तो भाव खोटा ठरला की, ते एकाद्या लहान मुलासारखे रडत सुटतात. अशा वेळेस मी त्याची समजूत काय घालणार ! मीदेखील रडत सुटतें झालें. रशीदनं आणखी या पोरीनं काय घातपात केले आहेत कुणाला ठाऊक ? त्यांच्यावर वारंटं सुटलीं आहेत, त्यांना पकडायचे प्रयत्न चालले आहेत, दोघंही लपून छपून कुठें तरी असतात. रशीदला तर गेल्या वर्षभरात मीं पाहिलं नाहीं. आणि गुलशन घरीं येतें ती काय एकाद्या अर्ध्या घटकेपुरतीच. रात्रीं अपरात्रीं, लपून छपून. आम्ही दोघांनाही गमावून बसलों आहोंत बघा. आमचीं मुलं ज्या दिवशीं आम्हांला परत मिळतील असा दिवस खुदाच्या कृपेनं केव्हां तरी उगवेल अशी आशा करीत बसायचं ...'

श्रीरंग तिचा निरोप घेऊन आपल्या घरीं आला व अंथरुणावर पडला तेव्हा बऱ्याच गोष्टींचा उलगडा झाल्यासारखं त्याला वाटत होतं. ज्याला कुठेंही मोठ्या पगाराची नोकरी मिळावी अशा रशीदचं आपल्या बंगल्यावरच्या कामावर रहाणं, ' मी पोलिसांच्या हातीं सापडलों नाहीं. पोलिसांच्या छळाला मी बळी पडलों असं समजूं नकोस ' असे उद्गार त्यानं मरतांना काढणं, अगदीं आड रस्त्यावरच्या इराणी हॉटेलांत गुलशननं त्याची भेट घेणं, मग त्याची भेट घेण्याचं टाळणं, तुटक बोलणं, आपण कोण आहोत तें कळूं न देणं, इत्यादि गोष्टी त्याला विलक्षण चमत्कारिक वाटल्या होत्या. परंतु त्या सगळ्यांची आतां संगति लागली होती. गुलशन पांचशे रुपये घेऊन एकाएकीं कां नाहींशी झाली त्याचाही उलघडा आतां झाला होता. तो मनाशीं म्हणाला, गुलशन अशा प्रकारची मुलगी आहे तर ! त्याचं मन त्याला विचारूं लागलं, ' आतां इतकं कळल्यावर तरी तूं तिचा नाद सोडावास हें चांगलं नाहीं काय ? उगीच कां या भलत्या प्रेमांत पडतोस ? तुझ्यांत आणि तिच्यांत कोणतं साधर्म्य आहे ? सर्वस्वीं भिन्न आहे ती ! '

श्रीरंगानं आजपर्यंत राजकारणाचा विचार फारसा केला नव्हता. देशांतल्या घडामोडींकडे त्याचं लक्ष अर्थातच होतं. परंतु मी अमक्या पक्षाचा असं तीव्र अभिमानानं म्हणतां आलं पाहिजे असं त्याला कधीं वाटलं नव्हतं. घरांतल्या वातावरणामुळें आणि मनाच्या विवक्षित ठेवणी-मुळें धर्म आणि विज्ञानशास्त्र या दोन विषयांत त्याच्या मनाला इतकी अमर्याद गोडी वाटली होती, कीं त्यामुळें इतर सारे विषय दूर राहिले होते. पुढाऱ्यांच्या धरपकडीनंतर लोकाचा असंतोष ज्या प्रकारांनीं होऊं लागला होता ते चांगले म्हणायचे कीं वाईट म्हणायचे याबद्दल त्यानं मित्रांशीं अगर स्वतःच्या मनाशींहि कधीं वाद केला नव्हता...

आणि आतां ज्या गुलशनकडे तो अनावर वेगानं आकृष्ट होत होता ती घातपाताच्या चळवळींत पडलेली एक मुलगी होती हें त्याला समजलं होतं !

तें समजल्यामुळें पुष्कळशा गोष्टींवर प्रकाश पडल्याप्रमाणें झालं होतं खरं, परंतु त्याचं मन स्वस्थ आणि शांत होण्याऐवजीं अधिकच अस्वस्थ झालं होतं. गुलशन नाहींशी झाली ती आतां आपणाला पुन्हां भेटणार नाहीं काय ही भीति तर त्याला असह्य वाटावी अशी होतीच. परंतु शिवाय त्याला असा विचार करणं भाग होतं, कीं तिची आपली पुन्हां भेट झाली तर तिच्याशी आपण कसं वागायचं ? चळवळींतून अंग काढून घेण्याचा उपदेश आपण तिला करायचा ? आपण तो केला तर ती ऐकणार आहे थोडीच ? उलट ती मनातून आपल्याला भेकड ठरवील आणि आपल्यापासून कायमची दूर होईल !...बरं, तिला आपण असा कांहीं उपदेश केला नाहीं, ती आपलं अंगीकृत कार्य करीत राहिली, अन् तें करतांना तिच्यावर भलतंच संकट आलं तर ? आणि अशा प्रकारें आपण तिला गमावून बसलों तर ? . . . काय करावं, कोणत्या मार्गानं जावं, ती परत भेटल्यावर तिच्याशीं कसं वागावं, याबद्दल श्रीरंगाला कोण-ताच निर्णय घेतां येत नसे.

खूप विचार करूनही कसं वागावं तें माणसाला नीट ठरवितां येत नाहीं, पण प्रत्यक्ष वागायची वेळ आली कीं तो न बाचकता एका विशिष्ट प्रकारानं वागूं लागतो, आणि त्याला आढळून येतं कीं आपल्या ध्यानांत आलं नव्हतं परंतु हें वागण्याचं धोरण आपल्या मनानं आंतल्या आंत आधींच ठरवून ठेवलं असलं पाहिजे. श्रीरंगाला याचा अनुभव आला.

गुलशनची वाट पाहून पाहून तो निराश होऊं लागला होता अशा वेळीं ती एके दिवशीं त्याला अकस्मात् भेटली होती व ती भेटल्यावर तिच्याशीं बोलूं लागतांच त्याच्या लक्षांत आलं होतं, कीं तिच्याशीं कोणत्या धोरणानं वागायचं तें आपल्या मनानं आगाऊ ठरविलेलं आहे. ती चळ-वळींत पडलेली आहे ही गोष्ट आपल्याला माहीत असल्याची ओळखच तो तिला देणार नव्हता. तूं कुठें गेली होतीस, मला न कळवितां नाहींशी कां झालीस, केव्हां आलीस, आतां किती दिवस इथें राहणार आहेस, यांपैकीं एकही प्रश्न त्यानं तोंडाबाहेर पडूं दिला नाहीं. मी तुझी फार वाट पहात होतों असंसुद्धां तो म्हणाला नाही. ‘ तूं भेटलीस. फार बरं वाटलं ! ’ येव-ढाच उद्गार त्यानं काढला.

ती म्हणाली, ‘ मी फरारी झालें असं तुम्हांला वाटलं होतं कीं काय ?

‘ तसं नाहीं. पण—’ तें वाक्य त्याला पुरं करतां आलं नाहीं.

रस्त्यानं चालतां चालतां तिनं मोठी जांभई दिली, व म्हटलं, ‘ मला फार झोंप आली आहे. आणखी भूक तर अशी लागली आहे कीं सांगून सोय नाहीं. ’

‘ आपण एखाद्या हॉटेलांत जाऊं या काय ? ’

तिनं मान हालवून म्हटलं, ‘ अहं, नको. ’

‘ गाडी करून तुझ्या घरीं पोंचवूं का तुला ? ’

‘ घरीं ? छे ! ’

तिच्या घरावर पाळत असल्यामुळें ती घरीं सहसा जात नसे हें श्रीरंगाला माहित होतं. परंतु आपण पूर्ण अज्ञानांत आहों अशी बतावणी त्याला करायची होती म्हणूनच त्यानं तो प्रश्न केला होता. त्यानं विचारलं,

‘ माझ्या घरीं येतेस काय ? ’

तिनं पुन्हां मान हालवून म्हटलं ‘ अंहं ! ’

त्यानं मुद्दाम खवचटपणानं विचारलं, ‘ तुला माझं भय वाटतं काय ? ’

‘ फार ! तुम्ही मला खाऊन टाकलंत तर मी काय करूं ? ’ ती हंसली.

तिचं तें बोलणं अन् हंसणं ऐकून श्रीरंगाला फार आनंद झाला. असा गमतीचा खेळकर विनोद तिनं प्रथमच केला होता. तिच्या त्या लाघट बोलण्याचा धागा वाढविण्यासाठीं तो म्हणाला,

‘ मग, मी तुला खाऊन टाकलं तर बिघडलं कुठें ? माझ्या पोटांत अलगद रहा म्हणजे झालं. ’

‘ अन् माझ्या पोटांत कावळे तसेंच ओरडूं देत होय ? ’

‘ अरे खरंच, तुला भूक लागली आहे नाहीं का ? पण तुला हॉटेलांत यायचं नाहीं, घरीं जायचं नाहीं, माझ्या खोलीवर यायचं नाहीं. मग कसं करायचं ? या रस्त्यांत तर चणेवाला किंवा गंडेरीवाला सुद्धां दिसत नाहीं. मला युक्ति सुचते आहे पण ती तुला पसंत पडेल कीं नाहीं कुणास ठाऊक ! ’

‘ भुकेसाठीं माणूस वाटेल तें पाप करतं ’.

श्रीरंगाच्या मनांत आलं, आज विनोदाची लहर आलेली दिसते आहे. नशीब ! त्याला मलांतल्या मनांत फार आनंद झाला. त्यानं मुद्दाम खडा टाकून पाहिला,

‘ असं कोण मार्क्स म्हणतो वाटतं ! ’

' भकेनं जीव कासावीस होण्याचा अनुभव ज्यांनी आहे ती माणसं म्हणतात. त्याला मार्क्स कशाला हवाय् ! पण तें जाऊं दे. तुमची युक्ति सांगा ना ! '

' सांगतों. आपण पलीकडच्या मोठ्या रस्त्यापर्यंत चालत जाऊं. तिथे मी एक टॅक्सी करतो. तू टॅक्सींत बैस. मी एखाद्या चांगल्या हॉटेलांत जाऊन खूपसं खायला घेऊन येतों. मग आपण मिळून टॅक्सींतून दूर कुठें तरी जाऊं. आणखी—आलं लक्षांत ! '

' आलं. '

' मग चल तर झपाझप. '

त्यानं तिचा हात धरला. तिनं तो त्याच्या हातीं राहूं दिला.

दूरच्या ठिकाणीं जाऊन बसल्यानंतर खातां खातां तिनं त्याला विचारलं होतं,

' अगदीं कडकडून भूक लागल्याचा अनुभव तुम्हाला कधी आलाय् कां नाहीं ? '

' लहानपणीं फार वेळां आलाय्. आईनं मला कितीहि खायला दिलं तरी मला तासातासाला भयंकर भूक लागायची. आणखी मग आई मला फार रागं भरायची. '

तिनं एकदम विचारलं, ' तुमच्या आईचं नांव काय ? '

त्यानं सांगितलं, ' रुक्मिणी. '

ती म्हणाली, ' तुमच्या लहानपणच्या कांहीं गमती सांगा मला. '

' कां ? '

' कां कोण जाणे, पण आतांशा माझ्या स्वतःच्या लहानपणच्या फार आठवणी येतात मला. आणि वाटतं, आपण सदा लहानच राहिलों असतों तर बरं झालं असतं. '

' कवींचं आणि तुझं या बाबतींत पटतं म्हणायचं ! '

' कवींचा तुम्हाला फारच कैवार आहे असं दिसतं. पण ते जाऊं दे. तुमच्या लहानपणच्या कांहीं गोष्टी सांगा ना ? '

' पण तें जाऊं दे ' हें वाक्य तिच्या तोंडांतून वरचेवर येत असे व ते म्हणतांना किंचित् हंसण्याची व मान वेळावण्याची तिची लकब मोठी मोहक वाटण्यासारखी असे, या गोष्टी श्रीरंगाच्या एकदम लक्षांत आल्या.

मग मोठया खुषींत येऊन त्यानं आपल्या लहानपणच्या कांहीं हकीगती तिला सांगितल्या होत्या. त्या ऐकतांना ती वरचेवर मनापासून हंसली होती. व त्यानं जेव्हां तिला तिच्या लहानपणच्या हकिगती सांगण्याचा आग्रह केला तेव्हां तिनं म्हटलं होतं.

' सांगतें. मी लहानपणीं फार भित्री होतें.

' होय ? सांग. '

' भित्रेपणाच्या हकीगती सांगूं ? वा रे वा ! '

' शूरपणाच्या हकीगती कुणीहि सांगतं. स्वतःच्या भित्रेपणाच्या हकीगती सांगायलाच खरं धैर्य लागतं. '

' होय कां ? चांगली आहे व्याख्या धैर्याची. म्हणजे धैर्य सिद्ध करण्यासाठीं आधीं भित्रेपणा हातून घडला पाहिजे म्हणायचा. तुम्हीं बर्नार्ड शॉचं वाङ्मय फार वाचलेलं दिसतंय. पण तें जाऊं दे. ऐका तरी. आम्ही लखनौला ज्या घरांत रहात होतो तिथें शेजारी एक फार जुनं झाड होतं. आमच्या गच्चींत उभं राहून रात्रीं त्या झाडाकडे पाहिलं, कीं त्याच्या लोंब-लेल्या पारंब्या काळयाकुट्ट दिसायच्या. मला एका मैत्रिणीनं सांगितलं होतं कीं त्या पारंब्या मध्यरात्रीनंतर भुतं होतात आणि सकाळीं पुन: पारंब्या होतात. मला अशी कांहीं भीति वाटायची त्या झाडाची कीं गच्चीशेजा-रच्या त्या खोलींत झोंपायला मी कांहीं केल्या तयार व्हायची नाहीं...'

अशा प्रकारें ती खूप वेळ बोलत राहिली होती. श्रीरंगाला वाटलं होतं, आज ही गुलशन आपल्याशीं फार निराळं वागते आहे. तिचा

नेहमीचा तुटकपणा तिनं टाकला आहे, आपल्याजवळ येण्याची तिची इच्छा आहे.

परंतु टॅक्सींतून परत आल्यावर ज्या रस्त्यांत ती त्याला भेटली होती तिथें तिला सोडताना त्यानं विचारलं होतं,

आतां ' पुन्हा भेट ? '

तेव्हां ती म्हणाली होती, ' पुन्हां भेट ? ती कशाला ? गुड नाइट. '

तो म्हणाला होता, गुलशन, असं करूं नकोस ! '

परंतु त्याच्याकडे वळूनसुद्धां न पाहतां ती सरळ चालूं लागली होती.

या साऱ्या गोष्टी आठवल्या, कीं, श्रीरंगाच्या मनाला फार त्रास होई. मग तो आपल्या खोलींत येरझारा घालूं लागे, व दोन्ही हातांचे तळवे कानशिलापासच्या केसांवरून फिरवून तो चिडून स्वतःला विचारी, मला काय हवं आहे तरी काय ? वास्तविक त्या प्रश्नाचं उत्तर अगदीं सरळ आणि उघड होतं. तें स्वतःशी कबूल करण्याची त्याची तयारी नव्हती इतकंच. त्याला गुलशन हवी होती. तिच्या प्रेमांत तो चांगलाच सांपडला होता !

—०—



ज्या सिंधी लक्षाधीशांच्या साहाय्यानं श्रीरंग आपल्या धंद्यांचा जम चटकन् बसवूं शकला तेच काय ते त्याचे मुंबईतले स्नेही होते, परंतु ते जवळजवळ अमृतरावांच्या वयाचे होते, व आपल्या कुटुंबांचं सर्वथैव हित चिंतणारे एक वडीलधारे ऋणानुबंधी अशी भावना ठेवूनच श्रीरंग त्यांच्याशी वागे. कधींमधीं ते त्याला मुद्दाम आपल्या घरीं जेवायला बोलावीत, अगर एखादी छोटी मोठी पार्टी ते देणार असले कीं ते त्याला अगत्यपूर्वक आमंत्रण देत. अशा वेळीं त्यांची जिव्हाळ्याचीं बोलणीं होत. आपल्या धंद्यांतलं यशापयश, नव्या योजना, अडचणीं इत्यादि गोष्टी श्रीरंग त्यांच्या कानावर घाली व त्यांची सल्लामसलत विचारी. परंतु यापलीकडे आपल्या खाजगी सुखदु:खांचे कप्पे तो त्यांच्यापुढें कधीं उघडीत नसे. मनुष्य असे कप्पे नि:संकोचपणे उघडतो ते समवयस्क खेळीमेळीच्या मित्रांपुढें. अशा वयाचा एकही मित्र श्रीरंगाला नव्हता. शाळेंत असतांना व कॉलेजांतही गेल्यावर प्रथम कांहीं दिवस दहावीस दोस्त गोळा करणं, त्यांचं टोळकं बनविणं व त्याचा नायक होंणं हा श्रीरंगाचा स्वभावविशेष होता. परंतु नंतर त्याचा स्वभाव एकाएकीं चिंतनशील बनला तेव्हां भोंवतीं मित्र गोळा करण्याची त्यांची हौसही नाहीशी झाली. तो मुंबईस येऊन राहूं लागल्या-

नंतर तर त्याचे सारे जुने मित्र दूर झाले, आणि नवे त्यानं जोडले नाहींत. मित्रांच्या सहवासावाचून आपल्या आयुष्यांत उणीव रहाते असं त्याला कधीं वाटलंही नाहीं.···

परंतु आतांशा मात्र त्याला वाटूं लागलं कीं, आपल्याला एखादा समवयस्क मित्र असतां तर बरं झालं असतं. त्या मित्राला आपण विचारूं शकलों असतों, कीं असं चमत्कारिक तापदायक प्रेम वांट्याला आल्यावर माणसानं कसं वागावं ? कारण जें प्रेम त्याच्या वांट्याला आलं होतं तें खरो-खरच सामान्यतः ज्या प्रेमाचा अनुभव तरुण माणसं घेतात त्याहून अगदीं निराळं होतं. तें जितकं सुखानं तितकंच मनस्तापानं भरलेलं होतं.

आतां त्याचं प्रेम एकतर्फी राहिलं नव्हतं. तिचंही मन त्याच्या ठिकाणीं गुंतलेलं आहे हें स्पष्ट दिसूं लागलं होतं. परंतु यांतून आनंद उत्पन्न झाला नव्हता.

ती त्याला क्वचित् व अनियमितपणें भेटे या गोष्टीचा त्याच्या मनाला त्रास होई. हाहि त्यानं खुषीनं सोसला असता. ती जेव्हां जेव्हां भेटेल तेव्हां तेव्हां आपला वेळ हंसत खेळत मजेंत जाईल अशी त्याची खात्री असती तर गांठीभेटीचा अनियमीतपणा त्यानं मनावर घेतला नसता. परंतु त्याचं व तिचं एकमेकांवरचं प्रेम जों जों अधिकाधिक स्पष्ट होऊं लागलं होतं तों तों त्यांच्या मतांची भिन्नतादेखील उघड व्हावयास लागली होती. या भिन्नतेचा परिणाम असा होई कीं त्यांच्या प्रत्येक गांठीभेटींत बोलण्याच्या ओघांत असा कांही तरी विषय निघे कीं ज्यामुळें दोघांचं कड-कडून भांडण होत असे. आणि भेट संपून एकमेकांपासून दूर होतांना तो आणि तीं दोघंही नासलल्या मनःस्थितींत असत. भेटावं, मजेनं गप्पागोष्टी कराव्यात, पण तितक्यांत कशावरून तरी वाद सुरूं व्हावा, भांडण व्हावं, आणि त्यांतच भेटीचा शेवट व्हावा, असा जवळजवळ क्रम ठरून गेल्या-सारखं झालं होतं. अलौकिक सुखाच्या पोटांत असामान्य मनस्ताप असतो.

जे ठरीव चाकोरींतून जात असतात त्यांचीं सुखं लहान असतात, व त्यांचीं दुःखंही क्षुद्र व सहज सहन करतां यावींत अशीं असतात. उलट जें सहसा कुणाच्या वांट्याला येणार नाहीं अशा सुखामागं माणूस धांवूं लागला, कीं त्याला तें मिळालं तरी केवळ तेंच मिळत नाहीं तर त्या सुखाबरोबर कधीं कुणाच्या वांट्याला येत नसेल असा मनस्तापही त्याला भोगावा लागतो. जणूं तो मनस्ताप म्हणजे त्या अपूर्व सुखाची किंमत असते, आणि ती दिल्यावांचून गत्यंतर नसतं... /

श्रीरंगाचा एखादा समवयस्क जिवाभावाचा स्नेही असता तर आतांशा वारंवार मनात येणारे हे विचार त्यानं त्याला सांगितले असते व पडताळून पाहिले असते. त्या मित्रानं जर विचारलं असतं, असं तुला कां वाटतं ? तर त्यानं आपल्या व गुलशनच्या एकांताच्या हकीगती मनमोकळे-पणानं सांगितल्या असत्या.

उदाहरणार्थ कालचीच हकिकत.

आज दिवसभर त्याला सारखी तिची आठवत येत होती. आणि त्यामुळें त्याच आपल्या कामाकडे कांहीं केल्या लक्ष लागत नव्हतं.

वाद निघायचं कांहींच कारण नव्हतं. तो आणि ती मिळून कॉफी पीत बसली होतीं. त्याच्या आधीं ती जायला निघाली होती. पण ' थांब ना जरा. आपण पुन्हां कॉफी घेऊं. " असा त्यानं आग्रह केला तेव्हां ती बसली होती. ती त्याच्या खोलीवर आली कीं, कॉफी प्यायला लावल्या-वाचून तो तिला सोडीत नसे. कॉफी पतां पितां तो तिला सहज म्हणाला होता.

' थांब हं, बरी आठवण झाली. बंगल्याचे मी प्लॅन्स केले आहेत, ते तुला दाखवायचे आहेत. '

चटकन उठून टेबलाच्या एका खणांतून कागद काढून त्यानं तिच्यापुढें ते धरले तेव्हां ती म्हणाली होती, ' कुणाचा बंगला आहे हा ?

त्यानं उत्तर दिलं होतं, ' ही कांहीं कुणाची ऑर्डर नाहं ! माझ्या स्वतःसाठीं बांधणार आहे मी. इतक्यांत नाहीं. पुरेसे पैसे मिळाल्यावर !'

' पुरेसे म्हणजे किती ? '

त्यानं उजव्या हाताचं एक बोट उभं करून तिला दाखविलं होतं.

ती म्हणाली होती, ' बस्स, एक हजार ? '

' नाहीं नाहीं. एक लाख !

' इतके पैसे मिळविणार तूं ? '

' येवढयानं काय होतंय्. '

' तुझे हे उद्गार ऐकून मला मोठं नवल वाटतं '

' तें कां बुवा ? माझ्यासारख्या हुषार माणसानं कष्ट करून श्रीमंत होण्याची इच्छा धरली तर त्यांत नवल वाटण्यासारखं काय आहे ? '

' श्रीमंताच्याबद्दल तिरस्कार आहे माझ्या मनात '

यावर त्यानं सरळ उत्तर द्यायला काय हरकत होती ? पण वाकडं बोलण्याचा मोह त्याला अनावर झाला अन् तो म्हणाला '

' श्रीमंताचा तिरस्कार करायची सध्या फॅशन आहे, माहीत आहे. '

' ज्या तत्त्वासाठीं माणसं आपलं रक्त सांडायला तयार होतात त्या तत्त्वाला फॅशन म्हणायला तुझी जीभ नाहीं कचरतं ? '

' सरसकट साऱ्या श्रीमंतांबद्दल तिरस्कार वाटतो असं म्हणतांना तुझी जीभ कुठं कचरली ? '

ती आवेशानं म्हणाली, ' नाहींच कचरायची. जगातले श्रीमंत लोक नाहींसे करून दाखवूं आम्ही. '

' त्या योगानं जगाचं फारसं कल्याण होईल असं नाहीं मला वाटत. '

' नीट कधीं मनाशीं विचार करशील तर ना ? '

' मला काय शाळकरी पोर समजतेस कीं काय तूं ? '

' स्वतःला मोठा जाडा पंडीत समजतोस कीं काय तूं ? '

अशा प्रकारें उलटसुलट उत्तरांची भलतीच कडक फैर उडाली होती. तिनं त्याला एक लांबलचक व्याख्यान दिलं होतं, व अखेर म्हटलं होतं,

‘ तुझ्यावर माझं प्रेम जडलं याची मला दुहेरी शरम वाटते. एक शरम अशाबद्दल, कीं जी मी थोडयाच दिवसांपूर्वींपर्यंत प्रेम बीम सारं झूट आहे असं आग्रहानं प्रतिपादीत आलें ती मी तुझ्यावर प्रेम करूं लागलें अन् तुझं प्रेम मला हवंसं वाटूं लागलं. अन् दुसरी शरम अशाबद्दल कीं तुझं माझं जुळण्यासारखं मुळींच नाहीं हें अगदीं पुरतं कळूनसुद्धां तूं मला हवासा वाटतोस. कसल्या आकर्षणांत तूं मला पकडलं आहेस ? कधीं कधीं तुझं हें आकर्षण असह्य होतं, आणि मी तुझा द्वेष करूं लागेन कीं काय अशी मला भीति वाटते ! ’

बोलतां बोलतां ती एकदम थांबली होती, आणि मग अगदीं गप्प राहीली होती. अखेर एकदम त्याच्यावर नजर फिरवून ती म्हणाली होती,

‘ आतां मला जाऊं दे. ’

ती उठून उभी राहिली तेव्हां श्रीरंगानं तिचे दोन्ही हात झटकन् धरले व तिच्या नजरेला नजर लावून तो म्हणाला,

’ गुलशन, भांडण विसरून जा ! आपलं प्रेम लक्षांत ठेव ! ’

तिच्या भुंवयांमधोमध नेहमींची ती लहानशी उभी अढी दिसूं लागली होती. ती म्हणाली होती, ‘ नाहीं , रे इतकी सोपी नाहीं ती गोष्ट ! ’

मग त्याच्या हातांतून आपले हात झटकन सोडवून घेऊन ती दूर सरकली होती व निघून गेली होती.

कालच्या या भांडणाच्या आठवणी श्रीरंगाला वरचेवर येत होत्या. आणि आज त्याचं कमाकडे कांहीं केल्या लक्ष लागत नव्हतं. ऑफिस बंद व्हायला अजून दोन तास अवकाश होता, आणि ऑफिसांत बसणं तर त्याला नकोसं झालं होतं. पण तो जाणार कुठें ? तो कुठल्याही क्लबाचा सभासद नव्हता, किंवा ज्याच्याकडे कांहीं कारण नसतां आमंत्रणावांचून जाऊन

त्याला दोन घटका गप्पा गोष्टी करण्यांत घालवितां येतील असा कुणी मित्रही त्याला नव्हता. त्याचे श्रीमान् सिंधी स्नेही कुंदनमल मनसुखानी यांचीच काय ती आठवण होण्यासारखी होती. त्यानं आपल्या मनाला विचारलं, ' जाऊं या कां तिकडे ? ' तो टेलिफोनकडे वळला व त्यानं मनसुखानींचा नंबर घेतला.

' हॅलो ? ' असा शद्ब त्याला ऐकूं आला तेव्हां तो म्हणाला, ' काका, मी श्रीरंग बोलतो आहे. '

तिकडून कुंदनमलनीं विचारलं, ' तुला कितवं वर्ष आहे रे ? '

खोंचदार विनोद करण्याची त्यांना फार हौस आहे हें श्रीरंगाला माहीत होतं, परंतु या विनोदी वाक्याचा त्याला संदर्भ लागेना. तो म्हणाला, ' मला वाटतं, माझा जन्म एकोणीसशे सतरा सालीं झाला ! '

' म्हणजे तुला सत्तावीसावं वर्ष चालू आहे म्हणायचं. '

' होय ! गणितानं हें ओघानंच आलं. '

' हो, आलं खरं. आणखी शकुनशास्त्राप्रमाणें तूं आणखी त्र्याहत्तर वर्षं जगणार हेंहि अगदीं ओघानंच आलं. '

तो हंसला व म्हणाला, ' काका, मला गरिबाला कळेल अशा सोप्या भाषेंत बोला कीं, '

' तुला शंभर वर्षं आयुष्य आहे. तुला फोन करायसाठीं मी यंत्राकडे वळणार तोंच तूं टेलिफोन केलास मला. '

' कां ? माझी कशासाठी आठवण काढली होती ? '

' तुला सवड असली तर तूं इकडे ये म्हणजे सांगतों. ' श्रीरग मनाशीं म्हणांला, देव तुमचं भलं करो.

कुंदनमल आपल्या मुलीच्या वाङ्निश्चयानिमित्त ताजमहाल हॉटेल-मध्यें पार्टी देणार होते. पार्टीला अजून दहा दिवस अवकाश होता. परंतु पाहुण्यांची यादी करण्याची धांदल आतांपासूनच सुरूं झाली होती. त्या

पार्टीचं आमंत्रण श्रीरंगाला द्यायसाठींच त्यांनीं त्याची आठवण काढली होती.

श्रीरंग त्यांच्या बंगल्यावर गेला तेव्हां ही गोष्ट त्याला सांगून ते म्हणाले, ' आलं पाहिजे हं तूं ! '

तो हंसून म्हणाला, ' वा, म्हणजे काय काका ! '

शेटजींची मुलगी म्हणाली, ' आणखी एकटं यायचं नाहीं बरं कां ! '

श्रीरंग म्हणाला, ' दुकटं कुणी नाहींच आहे मला ! '

शेटजी आपल्या मुलीला म्हणाले, ' तुझ्या नवऱ्यासारखा तो उतावळा झालेला नाहीं. '

ती म्हणाली, ' लग्न झालं नसलं तरी मैत्रिणी तर असतील ना ? '

तिचे वडील म्हणाले, ' मला माहीत नाहीं. पण तूं आमंत्रण तर देऊन ठेव. '

त्यांच्याकडून परत निघाल्यापासून सत्कृद्दर्शनीं अगदीं विपरीत वाटण्यासारखी एक कल्पना श्रीरंगच्या मनांत घोळूं लागली. गुलशनला घेऊन ताजमहाल हॉटेलमधल्या पार्टीला जाण्याचा बेत तो करूं लागला. त्याचं मन त्याला विचारूं लागलं, याहून मूर्खपणाचा दुसरा बेत असूं शकेल काय ? आधीं मुळीं पार्टीच्या दिवसापर्यंत गुलशन त्याला भेटेल कीं नाहीं याची शंका होती. आणि भेटली तरी त्याच्याबरोबर जायला ती तयार होईल कीं नाहीं याची तर अधिकच शंका होती.

परंतु त्याचं नशीब विशेष जोरावर होतं असं दिसलं. कारण गुलशन चारच दिवसांनीं त्याच्याकडे आली. या वेळची त्यांची गांठ–भेट भांडणांवाचून सुनी गेली: आणि आश्चर्यातलं आश्चर्य हें कीं त्याच्याबरोबर ताजमहाल हॉटेलच्या पार्टीला जायचं तिनं कबूल केलं. ती म्हणाली,

' मला पहायचंच आहे एकदां ऐदी श्रीमंतांच्या या पार्ट्या कशा असतात, त्यांची मूर्खपणाचीं बोलणीं कशीं चालतात, आणि अशा ठिकाणीं एकंदर वातावरण कसं असतं तें. '

या हेतूनं का होईना, त्याच्याबरोबर येण्याचं ती कबूल करीत होती यांतच श्रीरंगाला फार आनंद झाला. तो म्हणाला, ' मग ठरलं तर ? '

ती म्हणाली, ' पण एका अटीवर हं ! माझ्या खऱ्या नांवानं माझी कुणाशीं ओळख करून द्यावयाची नाहीं. मी एक हिंदु, मराठ्याची मुलगी म्हणून येणार तुझ्याबरोबर. '

' मग तसा वेष तुला केला पाहिजे. '

' करीन. '

' आणखी तुझ्यासाठीं एखादं छोटं नांव शोधून काढलं पाहिजे मला. नाहीं तरी तूं माझ्याशीं लग्न केल्यावर—'

ती एकदम त्याला अडवून म्हणाली, ' श्रीरंग Please तो विषय काढूं नकोस. आपण आतां हा केवळ खेळ खेळतों आहोंत. '

त्याची चर्या एकदम बदलली. तीहि स्तब्ध झाली.

पण मग नेहमीच्या संवयीप्रमाणें किंचित् हंसून व मान वळवून म्हणाली, ' पण तें जाऊं दे. एखादं चांगलं नांव काढ ना माझ्यासाठीं. '

' इंदिरा ! चालेल ? '

' शीः ! '

' सरस्वती ? '

' अं हं ! '

' शकुंतला ? '

' एकदम कबूल ! '

त्यानं तिच्यासाठीं फार उंची पोषाख तयार करविला. तो अंगावर चढविल्यावर ती हंसत सुटली व त्याला पुनः पुन्हां विचारूं लागली, 'मी कांहीं तरीच दिसते आहे का रे ? खरं सांग हं. अजून उतरतां येतील हे कपडे आणि पार्टीला जाण्याचा बेत रद्द करतां येईल. '

तो तिला दर वेळेस सांगत होता, ‘ वेडी तर नाहींस ? अतिशय सुंदर दिसते आहेस. सारे लोक काकांच्या मुलीऐवजीं तुझ्याकडे बघत राहतील. ’

‘ नक्की तेंच व्हायला नको आहे मला. ’

‘ असं होय ? मग मी एकटाच असा बघत राहीन कीं इतरांना तुझ्याकडे पहाण्याचं धैर्यच होऊं नये. ’

पार्टीच्या ठिकाणीं जाऊन दाखल होईपर्यंत त्यांचा अशा प्रकारं विनोद चालला होता. पार्टीसाठीं जी मंडळी जमली होती त्यांत गुलशन मिसळली नाहीं. परंतु ती मिसळावी अशी अपेक्षा श्रीरंगानं ठेवलीच नव्हती. ती आनंदांत असल्यासारखी दिसत होती. आणि तेवढी गोष्ट त्याच्या स्वतःच्या आनंदाला पुरेशी होती.

परत आल्यावर त्यानं तिला विचारलं,

‘ कशी वाटली पार्टी तुला ? इतका वेळ आनंदांत होतीस अन् आतां तुझी चर्या इतकी गंभीर कां झाली आहे ? ’

खालचा ओठ दांताखालीं दाबून व पुन्हां सोडून ती म्हणाली, ‘ माझ्या मनांतली भीति खरी ठरली आहे ! ’

त्यानं चमकून विचारलं, ‘ कसली भीति ? ’

‘ तुझं माझं पटणं शक्य नाहीं हो ! तुझे विचार निराळे आहेत, तुझीं मतं निराळीं आहेत, ज्या माणसांच्या संगतींत तूं रमतोस तीं माणसं निराळीं आहेत ! कुंदनमलच्या मुलीचं अभिनंदन करतांना तूं जें बोललास तें मी नीट ऐकलं. श्रीमंत लोकांच्याविषयीं फार कौतुक आहे तुझ्या मनांत. कारण तुला श्रीमंत व्हावसं वाटतं. तुझा सर्व लोकांचं पैसा हें दैवत आहे. माझं दैवत फार वेगळं आहे. मला फार निराळ्या गोष्टींबद्दल आदर वाटतो. मला आयुष्य फार निराळ्या रीतीनं काढायचं आहे. तुझ्या माझ्या आयुष्याचीं सूत्रं एकत्र गुंफूं देणं फार चुकीचं होईल .... ’

ती जायला निघाली तेव्हां तिच्या दोन्ही खांद्यांवर हात ठेवून तो म्हणाला, ' गुलशन, अशी जाऊं नकोस. मघाशीं जें बोललीस तें विसरून जा. '

ती म्हणाली, ' अरे वेड्या, तें विसरणं सोपं आहे काय ?

त्यानं विचारलं, ' माझ्यावर तुझं प्रेम आहे कीं नाहीं ? '

' आहे ! आणि त्या प्रेमापुढं माझ्या बाकीच्या साऱ्या विचारांचा पराभव होईल कीं काय याचं भय वाटतं. तसा पराभव होऊं नये यासाठीं माझ्या जिवाची आंतल्या आंत कशी धडपड चालली आहे त्याचं वर्णन मी कोणत्या शब्दानं करूं ? माझ्यावर सत्ता चालविणारं हें जुलमी प्रेम जसं कुठल्या किमयेनं कोण जाणं माझ्या मनांत उत्पन्न झालं तशाच किमयेनं तें नष्ट झालं तर मला फार आनंद होईल. मी मनाशींच मोठ्यांदा ओरडेन, सुटलें ! मुक्त झालें ! मी आतां तुझं तोंड पाहाणार नाहीं ! तुला विसरतां येतं कां बघेन. तुझ्याकडे कधींच न आलें तर तूं मला विसरून जा. परंतु तुला विसरण्याच्या प्रयत्नांत मला यश आलं नाहीं तर मी आपण होऊन तुझ्याकडे येईन अन् सांगेन, श्रीरंग माझ्याशीं लग्न कर ...!'

ती निघून गेली. आणि श्रीरंग मनांशीं विचार करीत राहिला कीं ती आपल्यापासून कायमचीच दूर गेली कीं काय ?

आणि मग त्याच्या मनांत इतके दिवस जो विचार सूक्ष्मपणानं अन् लपून छपून कधीं मधीं वावरला होता तो एकदम वरच्या थरावर येऊन स्पष्ट होऊं लागला. तो विचार असा, कीं त्याच्या या प्रेमप्रकरणाचा योग्य शेवट ताटातुटीवांचून दुसरा कोणता होता ? मताच्या भिन्नतेची बाब गुलशनला महत्त्वाची वाटत होती, त्याला वाटत नव्हती. तथापि तिच्याशीं लग्न करणं त्याला कितपत शक्य होतं ? तिचा व त्याचा धर्म भिन्न होता. आणि ही भिन्नता नेहमींच्या मामुली स्वरूपाची नव्हती. त्याचा बाप भग-

वद्भक्त होता. त्याच्या घरांत हिंदुधर्माचं वातावरण कांठोकांठ भरलेलं होतं. या घरांत तो गुलशनला आपली बायको म्हणून आणूं शकत होता ? ...

नंतरच्या दिवसांत श्रीरंगाच्या या विचारानं फार उचल खाल्ली. गुलशन त्याच्याकडे आली नाहीं याबद्दल तो मनांतल्या मनांत सुटकेचा श्वास टाकी. परंतु हा श्वास टाकल्याबरोबर त्याच्या मनाची प्रतिक्रिया सुरूं होई, आणि तो ह्मणे, छे छे ! माझं प्रेम इतकं लेचंपेचं नाहीं. गुलशन भेटली नाहीं याचं जें तीव्र दुःख मला आंतल्या आंत होत आहे तेंच खरं आहे. गुलशन मला भेटली तर तिच्याशीं मी लग्न करीन.

आणि गुलशनच्या भेटीवांचून जों जों दिवस जाऊं लागले तों तों त्याला वाटूं लागलं, माझ्या मनाचा हा निश्चय खरा आहे. अडचणींची भीति वाटते तो खोटी आहे. ती आपल्याला हवी आहे ही एकच गोष्ट खरी आहे.

एके दिवशीं गुलशन त्याच्याकडे आली !

आपला पराभव झाल्याचं सांगायला ती आली होती. त्याच्याशीं लग्न करण्याचा तिचा निश्चय झाला होता ! ती त्याला म्हणाली,

' पूर्वी प्रेमाची मी थट्टा करीत असे. त्याची शक्ति लोक उगीच एकमेकांला फसविण्यासाठीं वाढवून सांगतात असं मला वाटलं होतं. पण मीं चुकलें होतें. खरं प्रेम कसं असतं तें आतां मला कळलं. मी तुझ्याकडे परत आलें आहे. तुझी होण्यासाठीं आलें आहे ! '

दुसऱ्या दिवशीं श्रीरंग पुण्यास जावयास निघाला. आपल्या बाबांना गुलशनची हकीगत तो सांगणार होता, व तिच्याशीं लग्न करण्याचा आपला निश्चय त्यांच्या कानांवर घालणार होता. आजपर्यंत गुलशनचा उल्लेख एका शब्दानंही त्यानं त्यांच्याजवळ केला नव्हता. परंतु आतां कसलीच लपवा-लपवी त्याला करायची नव्हती. कोणतेही परिणाम होवोत, त्याला गुलशनशीं

लग्न करायचं होतं. तिला तो हवा होता. त्याला ती हवी होती ! आपल्या बाबांशीं कसं बोलायचं, काय बोलायचं याबद्दल मनाशीं सारखा विचार करण्यांतच त्याचे प्रवासांतले तीन तास गेले. बंगल्यापाशीं येतांच तो आपल्या विचारांच्या तंद्रींतून जागा झाला. तो मनाशीं म्हणाला, ' अरे, मी इतक्यांत घरीं येऊन पोंचलोंसुद्धां ! '

त्यानं पाहिलं तों बंगल्यांत नेहमींपेक्षां किती तरी अधिक दिव्यांचा लखलखाट झालेला दिसत होता. त्या लखलखाटाचं कारणही त्याला लगेच कळलं. स्वतः अमृतराव आज कीर्तनाला उभे राहिले होते. दिवाणखान्यांत पाहुण्यांची मोठी दाटी झाली होती. तोंड धुऊन आणि कपडे बदलून श्रीरंग वर गेला तों कीर्तन ऐन रंगांत आलं होतं अमृतरावानीं आपलं फार आवडतं असं शबरीचं आख्यान लावलं होतं. त्यांनीं शुभ्र वस्त्रं परिधान केलीं होतीं. कमरेला उपरणं कसलं होतं. त्यांच्या गळयांत तुळशीच्या आणि फुलांच्या माळा होत्या. कपाळावर बुक्का लावलेला होता. दुतर्फा दिवाणखान्याच्या दोन्हीं भिंतींना लागून टाळकरी उभे होते. अमृतरावांचं वक्तृत्व चाललं होतं. त्यांच्या बोलण्यांतल्या एखाद्या वाक्याला ज्याचा आधार होईल असा अभंग आठवल्याबरोबर दुतर्फा उभ्या राहिलेल्या या मंडळींपैकीं कुणीहि त्या अभंगाचा पहिला चरण ओरडून सांगावा आणि मग त्या संबंध अभंगाची सर्वांच्या तोंडून गर्जना झाली कीं एकजात सारे टाळ झडत राहावेत असा सोहाळा सुरू होता !

' पवित्र तें कुळ, पावन तो देश ।
जेथें हरिचे दास जन्म घेती ।।

श्रीरंग दिवाणखान्यांत पोंचला त्या वेळेस या चरणांची ललकारी उठली ! आणि ती ऐकतांच श्रीरंगाच्या अंगावर रोमांच उभे राहिले !

शबरीनं दिलेली उष्टी बोरं रामचंद्रानं मोठ्या आवडीनं कशी खाल्लीं त्याचं मोठं रसभरित वर्णन करून अमृतराव सांगूं लागले.

‘ प्रभूला दुसऱ्या कशाची भूक नाहीं, फक्त भावाची भूक आहे महाराज. ज्याच्या हृदयांत भाव नाहीं अशा श्रीमंतांनीं आपल्या आठ मजली राजवाड्यांत सुवर्णाचा रत्नजडित देव्हारा उभा केला, आणि पंच-पक्वान्नांचीं ताटं तयार करून देवाला बोलाविलं तरी तो जायचा नाहीं. आमचा देव कधीं फसायचा नाहीं. भक्ताची परीक्षा कशी करावी तें त्याला उत्तम रीतीनं कळतं. खरा भक्त दिसला, कीं त्याच्या हातचे पोहे, त्याच्या हातचीं उष्टींमाष्टीं बोरं, काय असेल तें तो मिटक्या मारीत खातो. भागवत धर्माचं दैवत, माझा विठ्ठल, माझा पांडुरंग, माझा रामचंद्र असा भावाचा भुकेला आहे. शबरी म्हणजे नीच वर्णाची स्त्री, परंतु तिलाही देवानं जवळ घेतलं, तिची पूजा ग्रहण केली, तिचा उद्धार केला. भक्तीचा आणखी नामाचा महिमा वर्णावा तेवढा थोडा आहे. प्रभू रामचंद्राचं नांव घेतल्या-वर चिंता भय इत्यादि साऱ्या गोष्टी आपोआप दूर पळतात. आणि नाम-स्मरणाचा हा धर्म असा सोपा आहे कीं त्याचं आचरण विद्वानानं, मूर्खानं, ब्राम्हणानं, शूद्रानं वाटेल त्यानं करावं. उच्च नीच, स्पृश्य अस्पृश्य असले भेद माझ्या रामचंद्राला दिसत नाहींत. रामचंद्राला सारीं लेकरं सारखींच. रामचंद्राच्या भक्तीचा हा भागवत धर्म साऱ्या हिंदुधर्मीयांना आशेचा संदेश देतो. यारे या, सारे हिंदु या, भक्तिधर्माच्या भगव्या निशा-णाखालीं एक व्हा, अशी एकनाथ, नामदेव, तुकाराम या संतांची ललकारी आहे. कुणाही हिंदूनं या धर्मात प्रवेश करावा आणि ‘ हा माझा धर्म, माझा धर्म ! ’ असं अभिमानानं म्हणावं... ’

अमृतरावांच्या बोलण्यांत आवेश होता. त्यांची वाणी रसाळ होती आणि तोंडांतून निघणाऱ्या प्रत्येक शब्दांत अंतःकरणांत उचंबळणारी श्रद्धा खणखणून वाजत होती. सारे श्रोते थरारून गेले होते. श्रीरंगाच्या अंगावर पुनः पुन्हा शहारे उभे रहात होते. परंतु त्याच्या मनात इतर श्रोत्यांहून अगदींच निराळे विचार येत होते.

या भागवत धर्मात उच्च नीच, स्पृश्य अस्पृश्य सर्वांना थारा आहे, परंतु सर्वांना म्हणजे सर्व हिंदूंना ! माणसाची जात, कुल, देश कोणताहि असो, त्याला मी पचवीन असं कांहीं माझ्या बाबांचा भागवत धर्म म्हणत नाहीं ! खरं म्हणजे सर्वांना पचविण्याचं सामर्थ्य हिंदुधर्मात आहे. जो स्वतःला हिंदु म्हणवितो तो हिंदु अशी व्याख्याच खरी आहे. हिंदुधर्माचं हेंच तत्व स्वामी विवेकानंदांनीं साऱ्या जगापुढें मांडलं. परंतु माझ्या बाबांना हें माहीत नाहीं. त्यांचा देव दयाळू आणि भावाचा भुकेला खरा. त्याचं केवळ नामस्मरण केलं तरी उद्धार होतो. परंतु त्यांच्या या देवाचं नांव राम आहे. त्याला रहीम म्हणून हांक मारली तर तो ओ देणार नाहीं. त्याला रहीम असं संबोधणाऱ्याला माझे बाबा अगर माझा समाज आनंदानं आणखी तत्परतेनं हिंदु म्हणेल काय ? गुलशन या घरांत येऊन माझी बायको म्हणून नांदूं लागली तर माझं हें घर तिला पचवील काय ? माझ्या बाबांचा आणि इथें जमलेल्या या सर्वांचा हिंदु धर्म तिला पोटांत घेऊन आपली म्हणेल काय !...

नाहीं, नाहीं ! कदापि नाहीं !

कीर्तनाच्या रंगांत एकदम भजनाला सुरवात झाली होती. ' जय जय रामकृष्ण हरी ' असा जयघोष टाळमृदंगाच्या साथीबरोबर होऊं लागला होता. पण श्रीरंगाला ' कृष्ण हरी ' असे शब्द ऐकूं येत नव्हते. त्याला भास होत होता, कीं जणूं गुलशनशीं लग्न करण्याचा त्याचा हेतू त्याच्या बाबांनीं व या साऱ्या लोकांनीं ओळखला होता, व ते त्याला धर्माची शपथ घालून ओरडून सांगत होते नाहीं, नाहीं ! कदापि नाहो !

त्याला कीर्तनाच्या जगीं बसणं असह्य झालं. तो तेथून एकदम उठला, व खोलींत जाऊन त्यानं पलंगावर अंग टाकलं. टाळ-मृदंगांचा आवाज आणि भजनाचे शब्द त्या खोलींतही शिरून घुमत होते, म्हणून त्यानं उठून धाडकन् दार लावलं व उशीवर डोकं टेकून आपल्या दोन्ही हातांचा विळखा डोक्याला घातल्यासारखा करून तो पडला.

आपले वडील आपल्या लग्नाला सहज संमति देतील अशी वेडी कल्पना त्यानं मनाशीं ठेवली नव्हती. आपला विचार त्यांना आवडण्यासारखा नाहीं, आपल्याला त्यांची समजूत घालावी लागेल हें त्याला माहीत होतं. ती समजूत घालायसाठीं काय काय बोलावं त्याचा विचार त्यानं केला होता, व त्या बोलण्याची उजळणी करीतच त्यानं प्रवासांतला सगळा वेळ घालविला होता. परंतु आतां त्याच्या एकदम आवेगानं लक्षांत आलं होतं, कीं आपल्या वडिलांना त्याला जी गोष्ट विचारायची होती तिचा नुसता त्यांच्याजवळ उच्चार करणं म्हणजे जन्मभर ज्या समजुती पराकाष्ठेच्या मोलाच्या ह्मणून त्यांनीं हृदयाशीं बाळगल्या होत्या त्यांवर एकदम आघात करून त्यांचा चक्काचूर करण्यासारखं होतं. ज्या घरांत त्याच्या वडिलांनीं त्याचं पालनपोषण केलं होतं, त्याच्यावर माया ममता केली होती, त्याच्या लहानपणीं त्याच्या तोंडच्या बोबड्या शब्दांतल्या अभंगांनीं ज्या घरांत आनंद भरून गेला होता, त्या घरांत गुलशनचं पाऊल पडलं कीं तें घरच उन्मळून जाऊन त्याचा पूर्ण उच्छेद होणार होता. नष्ट झालेल्या त्या घराच्या ढिगाऱ्याखालीं त्याचे वडील सांपडणार होते आणि भगवद्भक्तीनं तुडुंब भरलेल्या त्यांच्या अंतःकरणाच्या ठिकऱ्या उडणार होत्या ! ....

हें सारं करण्याची शक्ति त्याच्या ठिकाणीं होती काय ? हें सारं पहाण्याचं सामर्थ्य त्याच्या अंगांत होतं काय ? ...

श्रीरंग दुसऱ्या दिवशीं मुंबईस परत गेला. आपल्या मनांतल्या हेतूचा उच्चारदेखील अमृतरावांच्या जवळ त्यानं केला नव्हता. ती गोष्ट अशक्य आहे हें त्याच्या ध्यानांत पुरतेपणीं आलं होतं. गुलशनची व त्याची नंतर भेट झाली तेव्हां तिच्याशीं लग्न करणं त्याला कोणत्या कारणांनीं अशक्य आहे तें त्यानं तिला सांगितलं.

रशीदच्या मृत्यूची हकीगत त्यानं तिच्या त्याच्या पहिल्या भेटींत सांगितली त्या वेळीं ती जशी वागली होती तशीच ती या वेळीं वागली. त्याचं म्हणणं तिनं खोडून काढलं नाहीं. भेकडपणाचा आरोप त्याच्यावर केला नाहीं. प्रेमाच्या मोठेपणाची त्याला आठवण करून दिली नाहीं. स्वतःच्या निराशेचं वर्णन केलं नाहीं. फक्त तिनं चेहरा घट्ट केला, खालचा ओठ दाताखालीं दाबून धरला, मुठी वळवून ठेवल्या. जणूं मृत्यूचीच बातमी ती ऐकत होती. हा मृत्यु दुसऱ्या कुणाचा नव्हता. तिचा स्वतःचा होता !

ती निघून गेली त्याबरोबर श्रीरंगाच्या मनांत जोरानं आलं, अरे मी हें काय केलं. अजून ती हांकेच्या अंतरावर असल्याप्रमाणें तो ओरडला, गुलशन ! गुलशन ! ' परंतु ती फार दूर गेली होती ! स्वतःच्या छिन्नविच्छिन्न अंतःकरणांतून होणारा रक्तस्त्राव बघत तो एखाद्या वेड्या माणसासारखा जागच्या जागीं बसून राहिला.

नंतरच्या दिवसांत त्याची हीच अवस्था कायम राहिली. तो ऑफिसांत गेला नाहीं. पुण्यास आपल्या घरींहि गेला नाहीं. तो कुठें तरी असे आणि कांहीं तरी करीत असे. हातीं येईल तें पुस्तक घेऊन तासन् तास तो वाचीत राही. वर्तमानपत्रं मिळालीं कीं तारतम्य न ठेवतां त्यांतला सगळा मजकूर तो वाचून काढी. कुणाच्या प्रेमविवाहाची बातमी त्यांत आढळली कीं त्याचं मन त्याला फटके मारूं लागे, ' बघ, बघ, येवढं सामर्थ्य तुझ्यांत नव्हतं. तूं भेकड ठरलास. दुबळा ठरलास ! ' त्याच्या अंतःकरणांतला कुठला तरी खोल आवाज म्हणे, ' पण माझ्या वडिलांची हत्या मीं केली असती तर मी अधिक दोषी ठरलों असतों ! ' निराश झालेल्या प्रेमिकांनीं गळ्यांत गळे घालून आत्महत्या केल्याची बातमी एखादे वेळेस वर्तमानपत्रांत असे. ती वाचली कीं त्याच्या मनांत येई, आपण असं कां केलं नाहीं ? गुलशनवांचून आपण जिवंत राहूं शकलों तरी कसे !

आणि गुलशन ? ... ती कुठें गेली असेल ? तिचं काय झालं असेल ? ती यावेळीं काय करीत असेल ? तिनं जो मार्ग पत्करला होता त्या मार्गावर तर मृत्यू सतत उभा होता ! तिच्याशीं लग्न करण्याचे विचार ज्या ज्या वेळीं त्यानं केले होते त्या त्या वेळीं तिला त्या मार्गापासून परावृत्त करण्याचा बेत त्यानं मनाशीं केला होता. कदाचित् ती आपलं ऐकेल अशी आशा त्याला वाटली होती ... परंतु तिला वांचविण्याऐवजीं त्यानं तिला मृत्यूच्या मार्गावर पुन्हां परत धाडलं होतं.

एके दिवशीं त्यानं वर्तमानपत्र उघडलं आणि पहिल्या पानावरची ठळक बातमी वाचतांच त्याचं रक्ताभिसरण एकदम थांबलं.

गोळीबारांत गुलशनचा अंत झाला होता !

दोन्ही हातांनीं वर्तमानपत्राचा कागद घट्ट धरून त्यानं तोंडावर टेकला, आणि मग तो पुन्हां दूर करून तो ओरडला,

‘ अरे, मी हें काय केलं ! गुलशन ! गुलशन ! ’

परंतु आतां तर काय त्याच्याच नव्हे तर या मर्त्य लोकांतल्या कुणाहि माणसाच्या हांकेपलीकडे त्याची गुलशन पोंचली होती !

—o—



तिसऱ्या मजल्यावरची ती गच्चीसारखी जागा सूर्य कासराभर वर आला, कीं उन्हानं न्हाऊन निघे. गच्चीच्या तिन्ही बाजूंच्या कठड्यांवर कुंड्यांत उगवलेल्या झाडांची अशी दाटी होती कीं ती पाहून आपण एखाद्या बागेत आहोंत असंच माणसाला क्षणभर वाटावं. या झाडांना सकाळीं अगदीं लवकर माळ्याकडून पाणी मिळालेलं असे आणि उन्हं पडलीं कीं त्यांचीं पानं आणखी फुलं टवटवीत आणि दिमाखदार दिसूं लागत. या ठिकाणीं उभं राहिलं, कीं कोणत्याहि बाजूस नजर फिरविली तर अगदीं दूरच्या डोंगरापर्यंत ती पोचवितां येत असे. गेल्या पांच सहा वर्षात पुणं शहर उभं आडवं किती वाढलं, व युद्धामुळें त्याच्या पंचक्रोशींत व आजुबाजूस कोणकोत्या इमारती व कारखाने उभे राहिले याची कल्पना यायला या गच्चीवरून चौफेर टाकलेली नजर पुरेशी होती. वाऱ्याची सुंदर झुळुक तर याठिकाणीं अष्टौप्रहर चालू असे. एक आरामखुर्ची टाकून सकाळचं उन्ह आणि वारा अंगावर घेत खुशाल वाचीत पडायला ही जागा फार चांगली होती

श्रीरंग तेंच करीत पडला होता.

या जागीं तो फक्त सकाळींच पडून रहात नसे, तर जवळ जवळ सबंध दिवसभर तो या ठिकाणींच असे. संध्याकाळीं लहर आली तर तो

खूपखूप लांब फिरावयास जात असे. पुस्तकं परत द्यायसाठीं आणायसाठीं तो कधीं कधीं गांवांतल्या वाचनमंदिरात खेप घाली. गंभीर विषयावरेच ग्रंथ हेच त्याचे जिवलग मित्र होते. मुंबईस त्याची तब्येत बिघडूं लागली तरी तो घरीं न येता तिकडेच राहिला होता. परंतु मग डॉक्टरनीं ती गोष्ट अमृरावांना कळविली होती, व अमृतराव स्वतः तांतडीनं जाऊन त्याला घरी घेऊन आले होते. मात्र तो घरीं आला तरी पूर्वीप्रमाणें आपल्या आईशीं अगर बाबांशीं मोकळेपणानं गप्पा मारीत बसत नसे. त्याची बोलण्याची हौसच मावळल्याप्रमाणें तो वागत होता. त्याची चर्या सदा गंभीर दिसे. तो एखाद्या वेळेस हंसला तरी मनाच्या इच्छेविरुद्ध अणि कष्टानं हंसल्यासारखा हंसे. जणूं त्या हंसण्याची त्याची त्यालाच शरम वाटे. अमृतराव मनांत आश्चर्य करीत कीं याच्यांत हा असा विचित्र बदल कशानं झाला ? परंतु त्यांनीं त्याला कधीं प्रश्न केला नाहीं. तो न करण्यांतच शहाणपणा होता हें त्यांना कळत होतं. श्रीरंग घरांत असून नसल्यासारखाच असे. तो सदा तिसऱ्या मजल्यावरच्या त्या गच्चींत वाचीत पडलेला असे.

एके दिवशीं सकाळीं तो असाच पडलेला असतांना माळी वर आला होता व त्याला कांहीं विचारूं लागला होता.

हातांतलं पुस्तक दूर करून श्रीरंगानं जरा त्रासूनच म्हटलं होतं, 'काय ?'

'खालीं एक टॅक्सीवाला आला आहे. तो विचारतो आहे ही बॅग आपलीच काय ? काल रात्रीं आपण त्याच्या गाडींत बसून आलांत ना ? तो म्हणतो सकाळी गाडी साफ करतांना ही बॅग त्याला सांपडली. आंतल्या गादीवर पडली होती. तो विचारतो आहे आपलीच ना ही ?'

त्याच्या हातांत एक छोटी सुबक बॅग होती, ती त्यानं श्रीरंगापुढें धरली होती. तिच्याकडे पहात श्रीरंग म्हणाला होता, 'त्या टॅक्सीवाल्याला सांग हीं बॅग इथली नाहीं. कुणाची आहे मला माहीत नाहीं.'

परंतु माळी परत फिरला व खालीं जाऊं लागला तेव्हां श्रीरंग म्हणाला होता, 'पण तसं नको. थांब, मीच सांगतों त्याला काय तें' आणि

माळयाच्या हातांतली बॅग घेऊन तो खालीं गेला होता.

त्याला पहातांच टॅक्सीवाल्यानं सलाम करून विचारलं होतं, ' बॅग मिळाली ना साहेब ? जाऊं मी ? '

श्रीरंग म्हणाला होता, 'ही इथली नाहीं. इथें देऊन काय उपयोग ? '

' मला वाटलं आपल्याकडे आणून दिली कीं ज्यांची असेल त्यांना मिळेल ! '

' नाहीं, तुलाच नेऊन दिली पाहिजे. काल संध्याकाळीं आपण ज्या बंगल्यांत त्या बाईंना पोंचविलं तो तुला आठवतो ना ? तिथें जा. आणखी ही बॅग दे. माझ्याकडे आला होतास असं तिथें सांगण्याचं कारण नाहीं. समजलं ना ? हं, जा. '

टॅक्सीवाल्यानं बॅग घेतली होती व तो गाडींत चढून बसला होता. तितक्यांत श्रीरंगाला आठवण झाली व खिशांतून एक रुपया काढून तो म्हणाला होता,

' अरे, थांब थांब. हें घे. '

टॅक्सीवाल्याच्या हातांत रुपया ठेवून परत गच्चीवर जावयासाठीं तो घरांत वळला होता.

वर जाऊन त्यानं पुन्हां पुस्तक हातीं घेतलं व तें तो वाचूं लागला. परंतु पानावरील मजकुराऐवजीं आदल्या दिवशीं तिन्हींसांजा घडलेल्या प्रकाराचीं चित्रं त्याच्या डोळयांपुढं येऊं लागलीं. परंतु त्यानं तीं क्षणभरच डोळयांपुढें स्थिर होऊं दिलीं. संकटांत सांपडलेल्या त्या मुलीला त्यानं वांचविलं होतं, घरीं पोंचविलं होतं. त्याचं कर्तव्य संपलं होतं. तिच्या आठवणी आतां त्याला नको होत्या. कोणत्याच स्त्रीचा विचार त्याला नको होता. गुलशनच्या बाबतींत त्याचं अंत:करण भाजलं होतं तेवढं पुरे होतं. स्त्रीचा विचार त्याच्या मनाला हवासा वाटणं शक्य नव्हतं. मनांत येऊं पहाणाऱ्या काल संकटांत सांपडलेल्या त्या मुलीच्या आठवणी त्यानं झट-कून दूर केल्या. ती मुलगी पुन्हां भेटावी अशी अस्पष्ट देखील इच्छा

त्याच्या मनांत नव्हती ! कधीं कुठें चुकून ती भेटली तर तिला ओळख देण्याची देखील त्याची इच्छा नव्हती.

ती कांहीं दिवसांनीं वाचन मंदिरांत त्याला दिसली होती तेव्हां त्यानं तिला ताबडतोब ओळखलं होतं परंतु त्यानं तसं मुळींच दाखविलं नव्हतं. तिनं जेव्हां नोटीस-बोर्डापाशीं त्याला म्हटलं होतं, ' मला वाटतं मला तुमचे आभार मानले पाहिजेत. ' कमालीचं आश्चर्य दाखवून तो म्हणाला होता, ' माझे ? '

ती किंचित् गोंधळली परंतु लगेच त्याच्या नजरेला नजर लावून म्हणाली,

' तुह्मीच ना ते ? '

त्यानं विचारलं, ' ते ? ते म्हणजे कोण ? '

तिनं खुलासा केला तेव्हां तो म्हणाला, ' माफ करा. तुमची कांहीं तरी चूक होते आहे ! तुम्हांला मी पूर्वी कधीं पाहिलं देखील नाहीं.

तो वाचनमंदिरांतून बाहेर पडला होता.

त्यानं ओळख न दाखवितां तिला तोडून टाकलं होतं. परंतु त्याचं मन मात्र हळूच तिच्याविषयीं विचार करूं लागलं होतं. कारण तिचं शेवटचं बोलणं त्याला फार आवडलं होतं. ती म्हणाली होती. ' ज्यांनीं मला संकटांतून सोडविलं ते तुमच्या चांगल्या माहितीचे असले पाहिजेत. त्यांना माझा निरोप सांगा, कीं मी आणि माझे आईबाप यांनीं त्यांचे फार आभार मानले आहेत. येवढं सांगून ती दूर झाली होती. पण पुन्हां म्हणाली होती, ' अहो, त्यांना आणखी असंही सांगा, कीं माणसाच्या अंगीं कांहीं रीतभात असावी. आभार मानणं माझं कर्तव्य वाटलं म्हणून ओळख काढली. पण ती नको असली तर माझी ओळख कांहीं वर आली नाहीं. येवढं सांगा बरं का त्यांना. सांगाल ना ? गुड बाय ! '

तिचं हें बोलणं त्याला वरचेवर आठवूं लागलं, व त्यानं कितीहि नको म्हटलं तरी त्याच्या मनांत येऊं लागलं, कीं ही कांहीं

सामान्य मुलगी नाहीं खचित्. तिच्या बोलण्यांत स्वाभिमान होता आणि मोठा मनोज्ञ उपरोध होता. ओळख न दाखविल्याबद्दल त्याच्या मनाला वाईट वाटावं, त्याच्या अंतःकरणाला लागावं, या हेतूनं तिनं तें उपरोधिक बोलणं केलं होतं. श्रीरंगाला वाईट वाटलं नव्हतं. उलट तिला डवचल्या-मुळें तिचा स्वाभिमान आपल्याला दिसला याचा त्याला आनंद झाला होता. तिचे शब्द त्याच्या अंतःकरणाला लागले होते ते अशा अर्थानं कीं त्यांचा ठसा त्याच्या अंतःकरणावर खोल उमटला होता. ' आणखी त्यांना असंही सांगा, कीं माणसांला कांहीं रीतभात असावी ... ' या शब्दांची त्याला पुनः पुन्हां आठवण होई. हातांत घेतलेलं पुस्तक वाचतां वाचतां थांबून तो स्वतःशींच म्हणे, ' होय असावी कीं. नाहीं कोण म्हणतो ...' आणि मग जणूं बराच वेळ तिचं बोलणं, तिची हालचाल, तिच्या चर्येवरचे भाव या सगळयांचा विचार करून निष्कर्ष काढल्याप्रमाणें त्याच्या तोंडून उद्‌गार निघे, ' मोठी तेजस्वी मुलगी दिसते आहे. तेजस्वी, चतुर, आणि विनोदी.'

परंतु यापलीकडे त्याचं मन तिच्याबद्दलच्या विचाराभोंवती घोटा-ळलं नाहीं. तिचं नांव काय असेल, ती कुणाची मुलगी असेल असे प्रश्न त्याच्या मनांत आले नाहींत. थोड्याच दिवसांत तो तिला पुरता विस-रून गेला.

बरेच दिवस गेल्यानंतर श्रीरंग हलके हलके आपल्या धंद्यांत लक्ष घालूं लागला. पण अजूनही आठवड्यांतून एक दोन दिवसच तो मुंबईस जाई. बाकीचे दिवस पुण्यासच घरीं स्वस्थ बसून काढी. मुंबईहून येतांना तो दुकानांत दिसतील तेवढी नवी गंभीर विषयावरचीं पुस्तकें खरेदी करीत असे, व पुण्यास आल्यावर सर्व काळ त्यांच्या संगतींत घालवीत असे.

एकदां दुकानदारानं त्याला एक पुस्तक देऊन म्हटलं, ' हें तुम्ही जरूर वाचा. '

त्यानं पुस्तकाचं नांव पाहिल्यासारखं केलं व ह्मटलं, ' असल्या पुस्तकांत मला गोडी नाहीं. '

दुकानदार म्हणाला, ' मी शिफारस करतों म्हणून वाचून बघा तरी. मला वाटतं तुम्हांला हें आवडेल. फार प्रशंसा झाली आहे या पुस्तकाची. '

श्रीरंगानं मनांत नसतांहि तें पुस्तक घेतलं. पुण्यास परत आल्यावर कित्येक दिवस त्यानं तें तसंच पडूं दिलं. पण मग एके दिवशीं त्याच्या मनांत आलं, बघूं या तरी. त्यानं तें हातीं घेतलं, आणि त्यांत एका न्यायाधिशानं आपल्यापुढें आलेल्या खटल्याच्या साध्या आठवणीच जरी सांगितल्या होत्या तरी त्या लिहितांना मानसशास्त्र आणि तत्त्वज्ञान याबद्दलचे मोठे उद्बोधक विचार त्यानं ठिकठिकाणीं प्रगट केले होते हें जेव्हां त्यानं पाहिलं तेव्हां तो तें पुस्तक गोडीनं वाचूं लागला. तो पुढें पुढें वाचीत गेला तेव्हां तर तें पुस्तक त्याला फारच आवडलं.

नंतरच्या मुंबईच्या खेपेंत तो पुस्तकांच्या दुकानांत गेला तेव्हां दुकानदाराला त्यानं सांगितलं, ' मला तुमचे आभार मानेल पाहिजेत. '

दुकानदार हंसून म्हणाला, ' तुम्ही माझे आभार मानाल हें मला माहीत होतं. तें पुस्तक तुम्हांला आवडलं ना ? '

' होय, फार ! '

तितक्यांत एक गृहस्थ दुकानांत शिरले. दुकानदारानं दोन्ही हात जोडून त्यांना नमस्कार केला व म्हटलं, ' वा वा वा ! हा योग मोठा गंमतीचा म्हणावयाचा. '

त्या गृहस्थांनीं जवळ येऊन विचारलं ' म्हणजे कसं म्हणतां ? '

' अहो, एखाद्या पुस्तकावर खूष झालेला वाचक आणि त्या पुस्तकाचा लेखक यांची समक्षच गांठ घालून देण्याचा योग आम्हां विक्रेत्यांना फार क्वचित् येतो. ' मग श्रीरंगाकडे नजर वळवून आणि त्या गृहस्थाकडे हात वळवून तो म्हणाला, ' तुम्हाला आवडलेल्या पुस्तकाचे

लेखक जस्टिस संपतराव गायकवाड. ' जस्टिससाहेबांकडे वळून त्यानं श्रीरंगाची ओळख करून दिली.

संपतरावांनीं श्रीरंगाशीं हस्तांदोलन केलं, श्रीरंग म्हणाला, ' तुमचं पुस्तक फार आवडलं मला. कोणत्या कारणासाठीं आवडलं तें मला सांगावसं वाटतं. पण तें सांगण्यांची ही जागा नाहीं. पुन्हां कधीं कुठें आपली भेट झाली तर सांगेन मी. '

जस्टिससाहेबांनीं विचारलं, ' तुम्हांला कामाची अगर कुठें जाण्याची घाई आहे कां ? '

' नाहीं, कां ? '

' नाहीं, आपण गेलों असतों अन् घटकाभर बसलों असतों. '

श्रीरंगानं चटकन् हो म्हटलं नाहीं, तेव्हां ते हंसून म्हणाले, ' तुमची प्रशंसा ऐकण्याची मला घाई झाली आहे ह्मणून माझ्याबरोबर चला म्हणतों असं समजूं नका. '

' छे छे ! त्या शंकेनं नाहीं मी गप्प राहिलों. '

जस्टिससाहेब ह्मणाले, ' माझ्या पुस्तकाबद्दल तुह्मी मला शाबासकी दिलीत. उलट मी तुह्मांला कांहीं द्यायला नको ? म्हणून जाऊं या म्हटलं. येतां कां ? पंधरा वीस मिनिटांपेक्षां अधिक वेळ घेणार नाहीं मी तुमचा ! '

' जास्त घेतलात तर मला फार आनंद होईल. '

' थँक यू ! थँक यू ! ' असं म्हणत जस्टिससाहेबांनीं श्रीरंगाला हाताला धरून दुकानाबाहेर नेलं.

त्यांची टॅक्सी उभी होती. तिचं दार स्वतः उघडून ते श्रीरंगाला ह्मणाले ' Please. '

श्रीरंग गाडींत चढण्यासाठीं पुढें झाला, आणि त्याच क्षणीं विलक्षण चपापला. कारण गाडींत एक तरुण स्त्री बसलेली त्याला दिसली. आणि ती दुसरी कुणी नव्हे, तर जिला त्यानं संकटांतून वांचविलं होतं, व

जी वाचन-मंदिरांत भेटल्यावर त्याला तेजस्वीपणानं आणि उपरोधानं बोलली होती तीच ! त्याच्या दचकण्याचं खरं कारण जस्टिसाहेबांना कळण्यासारखं नव्हतं. परंतु तो चमकून केसभर मागं सरकला हें त्यांच्या लक्षांत आल्यावांचून राहिलं नाहीं. ते म्हणाले ‘ अरे खरंच, तुमची ओळख करून दिली पाहिजे नाहीं कां ? ही माझी मुलगी. मालती. अन् माले ! ’ त्यांनीं तिला श्रीरंगाची ओळख करून दिली.

मालतीनं ओठांवर किंचित् हास्य आणून सभ्यपणानं श्रीरंगाला नमस्कार केला.

श्रीरंगाच्या मनांत आलं, काय बेरकी आहे !

त्यानं उलट नमस्कार केला. तितक्यांत जस्टिससाहेबांनीं त्याला जवळ जवळ ढकललंच म्हणून तो गाडींत चढला, व मालतीजवळ बसला. जस्टिससाहेब श्रीरंगाजवळ बसले, व गाडी चालू झाली.

जस्टिससाहेब म्हणाले, ‘ माले, यांना आपलं पुस्तक फार आवडलं आहे बरं का ? ’ आणि मग श्रीरंगाकडे मान वळवून ते म्हणाले, ‘आपलं पुस्तक असं मीं म्हटलं त्याचं तुम्हांला आश्चर्य वाटलं असेल, परंतु माझं पुस्तक खरंच माझं एकट्याचं नाहीं. तें मी लिहिलं याचं फार मोठं श्रेय आमच्या या मालीकडे आहे. मी म्हणत होतों मला कसलं लिहितां येणार. पण हिनं माझ्यामागं सारखा तगादा लावला. चांगली मराठी पुस्तकं मला वाचायला आणून दिलीं. चांगल्या शैलीनं कसं लिहावं हें मला शिकविलं म्हणा ना ! ’ —

मालती त्यांना अडवून म्हणाली ‘ साहेब, You make me blush. कांहीं तरीच काय सांगतां ? ’

‘ कांहीं तरीच कसं ग ? ते पुस्तकाची तारीफ करतात तेव्हां तिचा केवढा वांटा तुला दिला पाहिजे हें नको सांगायला ? काय हो श्रीरंग, Am I wrong ? “

" Not in the least ! "

नंतर जस्टिससाहेब श्रीरंगशीं बोलत राहिले, व त्या संभाषणांत त्यांनीं मालतीला ओढलं नाहीं. मधूनच कुणाच्या लक्षांत न येईल अशा बतांन ती श्रीरंगाकडे नजर टाकीत होती. तो स्वभावानं बेमुर्वतखोर, आढ्यतखोर असेल ही कल्पना तिला पटेना. त्यानं वाचन मंदिरांत तिच्याशीं चमत्कारिक वर्तन केलं त्याची आठवण जेव्हां जेव्हां तिला झाली होती–व ती पुष्कळदांच झाली होती--तेव्हां तेव्हां तिनं मनाशीं प्रश्न केला होता याचा स्वभाव गर्विष्ठ, कुजका, माणूसघाण्या असेल काय ? असेल असं तिला कधींच वाटलं नव्हतं, आणि त्यामुळें त्याच्या चमत्कारिक वागण्याचं ती नेहमींच मनाशीं आश्चर्य करीत राहिली होती. मनाशीं तिनं कितीदां तरी ठरविलं होतं कीं तो पुन्हां कधीं कुठें भेटला तर त्याला सरळ थांबवून विचारायचं, त्या दिवशीं तुम्ही असे कां वागलांत हो ? आतां तो तिला भेटला होता. तो भेटेल अशी किंचित् देखील कल्पना नसतांना भेटला होता. नुसताच भेटला नव्हता तर अगदीं तिच्या शेजारीं बसला होता. त्याच्याकडे वळविलेली नजर जेव्हां क्षणभर तरी स्थिर ठेवतां येत होती तेव्हां त्याच्याकडे बघत राहून ती स्वतःशीं म्हणत होती, छे छे, ही मुद्रा गर्विष्ठ उर्मट माणसाची खास नाहीं. हें पहाणं, हें हंसणं, हें बोलणं ... तिचे साहेब त्याच्याचीं किती बोलत होते. पहिल्या भेटींतच एखाद्याशीं ते इतकं बोललेले तिला कधीं दिसले नव्हते. एखाद्या स्त्रीची मर्जी संपादायची असली की, तिच्या मुलाचं कौतुक करावं हें कुठें तरी वाचण्यांत आलेलं सुभाषित तिला आठवलं. स्वतःच्या पुस्तकाबद्दल माणसाची भावना अपत्यप्रेमासारखीच असते कीं काय कुणास ठाऊक ? असावी. साहेब आपला नेहमींचा गंभीर रुबाब टाकून या श्रीरंगाशीं एकदम इतकं बोलूं लागले होते या गोष्टीचा दुसरा खुलासा तिला सुचेना ...

जस्टिससाहेब श्रीरंगाला म्हणत होते, ‘ आपण जिथें जाणार आहों तें माझं घर नाहीं बरं का. माझ्या एका स्नेह्याचं आहे. मी एकटा किंवा या मालीला घेऊन कधीं मुंबईस आलों कीं त्यांच्याकडे उतरतों. मी पुण्यास राहतों. तुम्हीं नेहमीं मुंबईसच रहात असाल ?

श्रीरंग म्हणाला, ‘ माझं ऑफिस मुंबईत आहे. पण घर म्हणाल तर पुण्यास आहे. ’

‘ होय कां ? फार छान ! मग पुण्यास वरचेवर येत असाल. आतां आमच्या बंगल्यावर एकदां यायला हवं तुम्ही.’

श्रीरंग कांहींच बोलला नाहीं.

तितक्यांत टॅक्सी थांबली.

वर गेल्यावर श्रीरंगाला कोचावर बसायला सांगून जस्टिससाहेब आपल्या लेकीला म्हणाले, ‘ माले, काय आणतेस ? चहा कीं सरबत ? खायलाहि घेऊन ये कांहीं तरी ! ’

मालती आंत गेली. जस्टिससाहेब श्रीरंगाला म्हणाले, ‘ आमच्यां मालीचा मला फार अभिमान आहे, तुमच्या लक्षांत आलंच असेल. ’

यावर काय उत्तर द्यावं ते श्रीरंगाला चटकन सुचेना. जस्टिसाहेबच पुढें कांहीं तरी बोलणार होते, परंतु तितक्यात नोकर आला व त्यांना म्हणाला, ‘ आपला टेलिफोन आहे. ’ ते श्रीरंगाला म्हणाले ‘ माफ करा हं ! आलोंच ! ’ आणि ते पुढच्या व्हरांड्यांत जाऊन उजवीकडे वळले. अगदीं कडेच्या खोलींत फोन होता.

मालती चहाचं आणि फराळाचं घेऊन आली. तिनं तें टेबलावर नीट ठेवलं, इकडे तिकडे पाहिलं, व मग ती उद्गारली, ‘ हें काय ? साहेब कुठें गेले ? ’

तो उद्गार आपल्याला उद्देशून आहे असं श्रीरंगाला वाटण्याचा सभव होता हें लक्षांत आल्याबरोबर तिचा चेहरा बदलला. तो उद्गार

काढतांना तिची नजर बेसावधपणानं किंचित्शी त्याच्याकडे वळली होती. परंतु त्याला आपण प्रश्न केला असं त्याला वाटावं अशी तिची मुळींच इच्छा नव्हती. वाचन–मंदिरांतल्या त्याच्या वर्तनाचा चांगला परत आहेर करण्याची तिची इच्छा होती. म्हणूनच मघाशीं तो टॅक्सीजवळ जस्टिस-साहेबांजवळ उभा असतांना आंत बसल्या बसल्या तिनं जेव्हां नमस्कार केलां तेव्हां सभ्यता न सोडता जितका थंडपणा दाखवितां येईल तितका दाखवून अगदीं अनोळखी माणसाकडे पाहतांना जेवढं करायचं तेवढंच हास्य तिनं केलं होतं. साहेब कुठं गेले असं म्हणतांना आपण त्याच्याकडे पाहिलं असा त्याचा समज तिला व्हायला नको होता. तोंडांतन गेलेले शब्द कांहीं आतां परत घेणं शक्य नव्हतं. परंतु त्याला उद्देशून आपण बोललों नव्हतों असं दाखविणं शक्य होतं... ती परत आंत जाण्यासाठीं वळली.

तितक्यांत श्रीरंग म्हणाला, ‘ जस्टिससाहेबांना फोन आला आहे म्हणून ते तिकडे गेले आहेत. येतील. तोपर्यंत बसा कीं तुम्ही. ’

ती बसली नाहीं, पण परत वळल्याप्रमाणें करून तिनं एकदम विचारलं, ‘तुम्हांला पूर्वीं कुठें तरी पाहिल्यासारखं वाटतं. माफ करा मला आठवत नाहीं. पण बरेच दिवसांपूर्वीं तुम्ही मला कुठें तरी भेटला होतां. ’

तिचं हें बोलणं श्रीरंगाला फार आवडलं. तिच्या चर्येवर असा भाव होता असं त्याला वाटलं, कीं जणूं तिच्यासारखं बोलण्याच ती आव्हानच देत होती.

तो म्हणाला,

‘ मी नाहीं, पण माझे एक स्नेही तुम्हाला भेटले होते. आणि मला पोंचविण्यासाठीं एक निरोपसुद्धां तुम्ही त्याच्याजवळ सांगितला होता.’

‘ असं ! मला कांहीं तो आठवत नाहीं. जीं माणसं आठवणी लवकर विसरतात त्यांचा खरं म्हणाल तर मला फार राग येतो. आणि

मग तो राग कांहीं केल्या बुजत नाहीं. पण कधीं कधीं माझी स्वतःचीच आठवण मला दगा देते, अन् मग रागवायचं कुणावर असा प्रश्न पडतो.'

'तें कां ? स्वतःवर रागवायला माणसानं शिकावं.'

'अस्सं ? तुमचा हा उपदेश मोठ्या मोलाचा वाटतो मला. पण तुमच्या स्नेह्यांच्या जवळ मी काय निरोप सांगितला होता ?'

'माणसाच्या अंगीं रीतभात असावी.'

खरच असावी, मग तो निरोप पोचला का तुम्हाला ? त्या निरोपाचा कांहीं उपयोग झाला कीं नाहीं ?'

'तें आतां तुह्मीच ठरवा.'

'मोठ्या आनंदानं ठरवीन. तितका अवधि द्या म्हणजे झालं.'

तो हंसला. मग तिनं टेबलावर ठेवलेल्या वस्तूंतून चांदीचा चमचा उगीचच उचलून तो म्हणाला, 'टॅक्सींत तुम्ही असाल अशी माझी कल्पना नव्हती.'

'असती तर साहेबांच्या बरोबर आला नसतां असं मी समजूं कीं काय ?'

'छे, छे, तसं नाहीं.'

तिनं त्याच्याकडे पाहिलं. तिची नजर म्हणाली, उत्तर-प्रत्युत्तरांचे हे वार आतां पुरे झाले. माझ्या मनांत डाचणारी गोष्ट मी सरळ सांगतें ती ऐका. ती एकदम म्हणाली,

'वाचन-मंदिरांत तुह्मी ज्या तऱ्हेनं माझ्याशीं वागलांत ती किती चमत्कारिक अन् उपमर्दकारक होती याचा कधीं विचार केला आहांत काय ! तसे का वागलांत हो !'

श्रीरंग स्वतःशीं म्हणाला, कां वागलों तें तुला काय सांगूं ? फार मोठा इतिहास आहे त्याच्यामागें...

मालती म्हणाली, ‘ तुमचं तें वर्तन मी कधीं विसरणं शक्य नाहीं. ’

‘ बरं झालं, त्या निमित्तानं तरी माझी नेहमीं आठवण राहील म्हणायची. ’

तिच्या तोंडावर हास्य उमटलं नाहीं. विनोदी भाषणाची झटापट करायला ती आतां उत्सुक नव्हती असं दिसलं. अंतःकरण फार दुखवल्या-प्रमाणें तिची मुद्रा दिसत होती.

श्रीरंगाला एकदम फार वाईट वाटलं. तो म्हणाला, ‘ पण त्या दिवशींच्या वर्तनाबद्दल मी जर अगदीं बिनशर्त माफी मागितली तर ? ’

तिचा चेहरा एकदम हंसरा दिसूं लागला. परंतु लगेच अलग झालेले तिचे ओठ जुळले, व उमटूं लागलेल्या हास्याची रेषा नाहींशी झाली. तिच्या चेहऱ्यावर एखाद्या लहान बालकाप्रमाणे बदलते भाव चटकन् दिसत असत. तिनं क्षणभर दृष्टी खालीं केली, आपल्या हातांतल्या बांगड्या चाळवल्या, व मग त्याच्याकडे बघून ती म्हणाली.

‘ पण माझी शर्त आहे एक. ’

‘ कळूं द्या. ’

‘ आतां तुम्हीं मला टाळायचा प्रयत्न करतां कामा नये. ’

त्यानं उत्तर देण्यापूर्वींच जस्टिससाहेबांचे बूट व्हरांड्यांत वाजले. ते आले व खुर्चीवर बसतां बसतां त्यांनीं म्हटलं.

‘ अरे, तुम्ही दोघांनीं सुरवात कां नाही केली ? हं माले, चल ओत चहा. ’

श्रीरंग निरोप घेऊन जाऊं लागला तेव्हां जस्टिससाहेब त्याला म्हणाले, ‘ ठीक आहे. आतां मी तुम्हांला अधिक बसायला लावीत नाहीं. पण आतां पुन्हां केव्हां भेट ? ’

श्रीरंग म्हणाला ‘ भेट होय ? होईल की ! ’

‘ तुम्ही पुण्यास आला कीं आम्हांला भेटायला आलं पाहिजे. ’ जस्टिससाहेबांनीं आपल्या बंगल्याचं नांव आणि पत्ता सांगितला.

त्यानं बापाला व लेकीला वेगवेगळा नमस्कार केला व मग तो ंघून गेला.

जस्टिससाहेब परत कोचावर बसता बसतां बसतां म्हणाले, ‘ आज क चांगली ओळख झाली बुवा. इतकी हुषार आणि विचारशील तरुण ाणसं क्वचित् भेटतात. काय माले, तुला कसे काय वाटतात हे आपले वे स्नेही ? ’

ती म्हणाली, ‘ त्यांना स्नेही म्हणतां कां तुम्ही ? ’

जस्टिससाहेब हंसले, ‘ माझ्या मराठी शब्दांच्या उपयोगावर तूं हेमीं अशी टीका करीत असतेस. स्नेही हा आमचा शब्द चुकला. पण ाझ्या प्रश्नाचं उत्तर तर देशील. तुला कसे आवडले आपले हे वे परिचित ? ’

ती म्हणाली, ‘ तुम्हाला ते नवे होते, मला नव्हते. ’

जस्टिससाहेबांनीं आश्चर्यानं विचारलं, ‘ काय म्हणालीस ? म्हणजे ू पूर्वीच त्यांना ओळखीत होतीस ? ’

‘ होय. ’

‘ कसं ? ’

‘ तुम्हांला एके दिवशीं आईनं क्लबावर टेलिफोन केला, आणि तुम्ही डॉक्टर मोघ्यांना घेऊन घरीं आलांत तें आठवत तुम्हांला ? ’

‘ आठवतं. कुणी तरी तुला मूर्च्छित अवस्थेंत घरीं आणून पोचविलं होतं— ’

‘ ज्यांनीं मला पोचविलं तेच आज तुम्हांला भेटलेले गृहस्थ. ’

‘ मग मला हें सांगितलं कां नाहींस आधीं ? त्यांचे आभार मानणं माझं कर्तव्य होतं ! ’

‘ तें त्यांना आवडलं नसतं. ’

‘ आवडो न आवडो, आपण त्यांचे आभार मानायला हवे. आतां ते पुन्हा भेटले, कीं पहिली गोष्ट मी करणार म्हणजे त्यांचे आभार मानणार. ’

श्रीरंगाचे आभार मानायचे राहिले ही गोष्ट जस्टिससाहेबांच्या मनाला लागून राहिली. त्यांच्या मनांत आलं, तो पुन्हां आपल्या भेटीला येण्याची वाट तरी कशाला पाहिली पाहिजे ? त्याला एक पत्र लिहून टाकां. परंतु त्यांना आढळून आलं कीं, त्याचं फक्त नांव आपल्याला कळलं होतं, त्याच्या घराचा अगर ऑफिसचा पत्ता त्यानं सांगितला नव्हता अन् आपणही विचारला नव्हता. पत्र लिहिण्याचा विचार त्यांना सोडून द्यावा लागला. परंतु पुण्यास गेल्यावर ते त्याची वाट पाहूं लागले. दहा बारा दिवस झाले तरी तो आला नाहीं तेव्हां त्यांनीं मालतीला विचारलं,

" काय ग, ते आले नाहींत ? '

श्रीरंग आला नाहीं याचा त्यांना फक्त विस्मय वाटत होता, पण मालतीच्या मनाला निराशेचे दुःख होत होतं, ' तुम्हीं मला टाळतां कामा नये ' या तिच्या प्रश्नाला त्यानं उत्तर दिलं नव्हतं. परंतु ते अनुकूल असेल अशी तिनं मनाशीं आशा ठेवली होती ती खोटी ठरली होती. पूर्वीप्रमाणेंच तिची गांठ भेट त्याला नको होती. असं चमत्कारिक वर्तन तो कां करीत होता याचा तिला तर्क करतां येत नव्हता. मनांतल्या मनांत त्याच्यावर खूप रागावण्याचा आणि त्याला अजिबात विसरून जाण्याचा ती प्रयत्न करीत होती. परंतु पूर्वीं तिला तो साधला नव्हता, आतांही साधत नव्हता. आणि त्यामुळें ती स्वतःवर चिडत होती. बापाचा प्रश्न ऐकून ती फक्त येवढंच म्हणाली, ' हों, नाहीं आले. '

जस्टिससाहेबांना वाटलं, तो आला काय न आला काय दोन्ही गोष्टींची हिला सारखीच किंमत वाटत असावी.

सात आठ दिवसांनीं त्यांनीं पुन्हां विचारलं, ' काय ग माले, ते आले नाहींत ? '

तिनं पुन्हां येवढंच उत्तर दिलं, ' हो नाहीं आले ! '



मालती स्टेशनापुढच्या भव्य पटांगणांत गाडींतून खालीं उतरली, व एखादा हमाल पुढें येऊन गाडींतलं सामान काढील म्हणून वाट पाहूं लागली. परंतु एकही मोकळा हमाल तिला दिसेना. आज उतारूंची भलतीच गर्दी उडालेली दिसत होती. हमालांना भाव आला होता. हांका मारल्या तरी ते वळून पहायला तयार नव्हते. तिच्याबरोबर कुणी नव्हतं. चार दिवसांपूर्वी ती एकटीच मुंबईस आली होती व आतां ती परत पुण्यास जायला निघाली होती. आधींच तिला स्टेशनवर यायला खूप वेळ झाला होता, आणि आतां तिला हमाल मिळत नव्हता. गाडी खडी करूं नकोस म्हणून गाडीवाल्याला शिपाई ओरडूं लागला. आणि गाडीवाला तिला म्हणूं लागला, ' बाई, सामान उतरा आपलं लवकर. ' ती त्रासून त्याच्यावर ओरडली, ' अरे मेल्या हमाल तर मिळाला पाहिजे ना !' दूर अंतरावर दिसणाऱ्या एका लाल डगलेवाल्याला तिनं हांका मारल्या, ' अरे ए हमाल ! ए हमाल ! ' परंतु त्यानं तिच्याकडे वळून पाहिलं देखील नाहीं. गाडीवाला पुन्हां तक्रार करूं लागला. तेव्हां तिनं पुढें पाऊल टाकलं व दोन्हीं हातांनीं गाडींतली आपली मोठी बॅग खस्‌दिशीं ओढून घेतली. ती जड असल्यामुळें तिच्या हातांतून फरशीवर धबदिशी पडली. तिचं मनगट लचकलं. एकीकडे

विवळत तिनं मनीबॅग उघडली व गाडीवाल्याचे पैसे चुकते केले. गाडी निघून गेली. तिचा प्रश्न शिल्लकच राहिला. ती ज्या ट्रेननं जाणार होती ती सुटायला आतां सात आठच मिनिटं शिल्लक उरलीं होतीं. आणि मोकळा हमाल तिला कांहीं दिसत नव्हता !

आंतल्या बाजूस एखादा हमाल सांपडतो का पहावा म्हणून ती लगबगीनं गेली. तिच्या मनांत आलं, तिकडे बॅग नेऊं दे कुणी तरी भामटा उचलून. आंतल्या बाजूस तिनं नजर खूप लांबवून इकडे तिकडे पाहिलं. पण एकही हमाल तिला दिसेना. तिचा अर्धा जीव बाहेर टाकलेल्या बॅगकडे होता. ती परत आली. एक हमाल तिला पाठमोरा दिसला तेव्हां त्याचा डगला ओढून ती म्हणाली,

'ए बाबा, येवढी माझी बॅग घेतोस का ?'

दुसऱ्याच दोन बॅग उचलण्यासाठीं तो वाकत होता. तो म्हणाला, सायबांच्या या सामानाबरोबर तुमची ही बॅग नेलेली चालत असेल तर घेऊन येतों.'

'चालेल. कोण साहेब रे ?'

'ते त्या मोटारीजवळ बोलत उभे राहिले आहेत बघा ते.'
तिनं पाहिलं. आणि त्याचवेळीं ते साहेबही बोलणं संपवून परत निघाले व त्यांची दृष्टि तिच्याकडे वळली.

श्रीरंग होता तो !

ती चमकली !

तोहि तिला पहातांच चपापला. परंतु लगेच पुढें होऊन तो तिच्याजवळ आला व म्हणाला, 'तुम्ही माझ्यावर खूप रागवला असाल. तुम्हीं कांहींहि बोललांत तरी मला तें मुकाट्यानं ऐकलं पाहिजे असा माझा अपराध झाला आहे. तुम्हीं माझी फार वाट पाहिली असेल ?'

‘ साहेबांनीं पाहिली. ’

तिच्या उत्तरांतली खोच मनावर न घेतां तो म्हणाला,

‘ माझा अगदीं नाइलाज झाला. मुंबईहून हलतांच आलं नाहीं. मी आजारी होतों. ’

त्याचे ते शद्ब ऐकल्याबरोबर मालतीचा राग पार नाहींसा झाला. तिनं त्याच्याकडे पाहिलं. खरंच, त्याची चर्या सुकलेली आणि मलूल दिसत होती. त्याच्या गौर वर्णांतला लालसर रंग किती तरी कमी झाला होता. त्यांत फिकेपणा आला होता. डोळे शिणल्यासारखे दिसत होते. तिला एकदम त्याची दया आली. ती म्हणाली,

‘ होय ? आणि आम्ही तुमच्यावर वेडयासारखीं रागावलों होतों ! ’

तो म्हणाला, ‘ आतां हवा पालटायसाठीं मी पुण्यास बरेच दिवस रहाणार आहे. तुम्हीं पुण्यासच चाललांत ना ? ’

‘ होय, मला हमाल मिळेना. तुमच्या हमालाजवळ मी आपली बग दिली आहे. चालेल ना ? ’

तो तिच्याकडे पाहून हंसला, मग तीं दोघंजणं भराभर चालूं लागलीं.

त्यानं तिला म्हटलं. ‘ तुमचं रिझर्वेशन तिकिट द्या म्हणजे मी तुमचा नंबर शोधून काढतों. तिनं तें त्याच्या हातावर ठेवलं तेव्हां त्याकडे पाहून तो म्हणाला, तुमची व माझी जागा एकमेकीपासून दूर आहेत. मध्यें दुसरे सहा नंबर आहेत.

गाडी सुटायला पुरतीं तीन मिनिटं सुद्धां उरलीं नव्हतीं. तो झटकन पुढें झाला व एका डब्याच्या दारांत उडी मारून तिला म्हणाला, , तुम्ही मागोमाग या. ’ एका कंपार्टमेंटच्या दारावरची नंबरांची पाटी त्यानं वाचली. पांचशें एकाहत्तर तें पांचशें अठ्याहत्तर. अरे आपल्या दोघांचे

नंबर एका कंपार्टमेंटमध्यें आहेत. या या तुम्हीं पांचशें अठ्याहत्तर. नंबरावर बसा. मी सामान घेतों. माझा नंबर पांचशें एक्काहत्तर आहे. ए हमाल, इकडे इकडे ये या खिडकीपाशीं.

त्यानं हमालाच्या डोक्यावरच्या बॅगा कशाबशा ओढून आंत घेतल्या. तितक्यांत गाडी चालूं सुद्धां झाली. गाडीबरोबर जाणाऱ्या हमालाच्या हातावर त्यानं पैसे ठेवले, व मग तो कंपार्टमेंटमध्यें शिरण्यासाठीं वळला. मालती खिडकीपाशीं बसली होती, तिनं हात पुढें करून म्हटलं, ' हं हें घ्या. ' तिनं चिमटींत धरलेल्या अधेलीकडे पाहून त्यानं विचारलं,

' हें काय ? '

' माझी हमाली. '

असं होय, ठेवा तुमच्याच जवळ. ' तो हंसला. मग कंपार्टमेंटमधील जागावर रंगविलेले नंबर बघत अर्धवट तिला उद्देशून त्यानं विचारलं, ' बरं पण आमची जागा कोणची ? '

' इथें माझ्यासमोर आहे तुमचा नंबर हा बघा. '

त्यानं आपली जागा पाहिली व बसण्यएवेजीं तो म्हणाला, ' वा वा म्हणजे मधे सहा नंबर असूनसुद्धां तुमची माझी जागा समोरासमोर आली म्हणायची. मुद्दाम मागूनसुद्धां इतक्या सोयीच्या जागा मिळाल्या नसत्या. आजचा दिवस फार चांगला उगवलेला दिसतो. '

स्टेशनच्या बाहेर त्याची तिची प्रथम दृष्टादृष्ट झाली तेव्हां तिनं कपाळाला आठ्या घातल्या होत्या. त्याची आपली ही भेट कशाला होत आहे असं तिला वाटलं होतं. तिचा स्वाभिमान दुखविला जाईल असं तो पुन्हाः वागला होता, आणि आतां तो निराळ्या रीतीनें वागेल अशी

अपेक्षा तिला करतां येत नव्हती. त्याच्याशीं नजरभेट झाल्याचा तो क्षण तिला अतिशय मनस्तापाचा वाटला होता, परंतु तो आपणहून तिच्या-जवळ आला होता. तिच्याशीं बोलला होता. आणि नंतर तर इतक्या चांगल्या तऱ्हेनं वागला होता कीं तिचं आनंदलेलं मन सारखं आश्चर्य करीत होतं कीं, आज हें आहे तरी काय ?...तें तिचं सुखदायक आश्चर्य अजूनहि संपलेलं नव्हतं. 'आजचा दिवस फार चांगला उगवलेला दिसतो,' असं म्हणून तो थांबला तेव्हां ती म्हणाली,

'होय. आजचा रंग कांहीं निराळा दिसतो.'

श्रीरंग आपल्या जागीं बसला. परंतु लगेच उठून त्यानं आपली बाकाखालीं घातलेली बॅग बाहेर ओढून उघडली, व तिच्यांतून पांचसहा पुस्तकं बाहेर काढून बाकाच्या गादीवर टाकलीं. बॅग परत बाकाखालीं लोटून तो उभा राहिला व हात झटकीत मालतीला म्हणाला, हीं वाचावयासाठीं नाहीं काढलीं मी. पण माझ्याशीं बोलण्याचा तुम्हांला कंटाळा आला कीं, तुम्ही यांतलं एकेक पुस्तक घेऊन पाहूं लागा, म्हणजे मी समजेन.'

ती हंसली. 'होय ? मग मी तीं पाहीन असे कांहीं दिसत नाहीं.'

'तरी पण असूं देत वर.'

'तुम्हांला पुस्तकाचा फार नाद दिसतो. आमच्या साहेबांनाहीं आहे.'

'तुम्ह[illegible]तो पसंत नाहीं अशा तऱ्हेनं बोलता आहात.'

'साहे[illegible]साठीं पुस्तकं खरेदी केलीं तीं माझ्या बॅगेत भरल्या-मुळें बॅग फार [illegible] झाली. हमाल मिळाला नाहीं. तेव्हां गाडींतून ती मलाच काढावी [illegible] गली, अन् माझं मनगट लचकलं.'

‘ हं असं असं ! तुमच्या साहेबांचा पुस्तकांचा नाद सध्यां रो। तुमच्या अंगाशीं म्हणजे मनगटाशीं आलाय म्हणायचा. तुमच्या नापसंतीचं कारण आलं माझ्या लक्षांत. ’

‘ हें निमित्त कारण आहे, कायमचं कारण निराळं आहे. ’

‘ कोणतं ? ’

‘ फार पुस्तकं वाचणारं माणूस दिसलं कीं माझ्या मनांत येतं, इतकं वाचन चाललं आहे, पण वाचनाप्रमाणें कांहीं वर्तन घडतंय् का हातून ? ’

‘ हें बोलणं मलाच लागावं म्हणून आहे कीं काय ? ’

‘ छे छें, तसं कसं असेल ! तुम्हीं कोणत्या विषयांवरचा पुस्तकं वाचतां तें कुठें आहे मला माहीत ? आणि तुमचं वाचणं व वागणं यांतला मेळ बघतां यावा इतकं तुमच्याजवळ मला कुठं येऊ दिलं आहे तुम्हीं ? ’

‘ म्हणजे माझी परीक्षा करायसाठींच तुम्हांला जवळ यावंसं वाटतं म्हणायचं ? ’

‘ माणसं एकमेकांजवळ आलीं कीं किती नाहीं म्हटलं तरी एक-मेकांची परीक्षा करूं लागतातच तीं. ’

‘ हो, बरोबर आहे तुमचं म्हणणं. पण मला वाटतं आपण फार तात्विक बोलायला लागलों. गाडींतून मजेंत प्रवास करतांना असलं बोलणं कांहीं फारसं शोभत नाहीं. कांहीं तरी गंमतीचं साधं बोलूं या कीं. ’

‘ गमतीचं साधं ? कांहीं हरकत नाहीं. यंदा नेहमींच्या मानानं पाऊस अगदीं कमी पडला, नाहीं ? ’

'छे छे, हें फारच साधं, बोलणं झालं, हवा पाण्याच्या गोष्टी केव्हां बोलायच्या तर बाकीचे सगळे विषय संपले म्हणजे.'

ती हंसली व म्हणाली, 'मग आतां तुम्हीच काढा तर तुम्हाला आवडेल तो विषय.'

'जस्टिस संपतराव गायकवाड हें तुमचे वडील आणि तुमचं नांव मालती, एवढंच मला माहीत आहे. तुमची आणखी ओळख करून द्या मला.'

'शीः! हा विषय आवडतो तुम्हांला?' तिनं नकारार्थी मान हालविली आणि ती खालीं पहात राहिली.

तो म्हणाला, 'हें काय? सांगा ना? पुण्यास कॉलेजांत असतां काय तुम्ही?

तिनं होय असं मानेनं सांगितलं, परंतु मुद्दामच वर पाहिलं नाहीं. त्याला जर सौंदर्यदृष्टि असेल तर आपल्या मुकेपणाचा व अभिनयाचा त्याला मोह पडेल अशी तिची कल्पना होती, व तो पडावा अशी तिच्या मनांतली स्पष्ट इच्छा होती. त्या इच्छेची तिला लज्जा वाटली नाहीं. त्याच्याविषयीं तिला पहिल्यापासून आकर्षण वाटलं होतं. त्याच्या चमत्कारिक वागण्यानं तिला त्याचा राग आला होता तेव्हां सुद्धां हें आकर्षण तिच्या मनात खोल कप्प्यांत राहिलेलं होतंच. मुंबईस त्याची तिची अकस्मात् गांठ पडली. त्यानंतर तो आपल्याला अजूनहि टाळीतच आहे अशी तिची खात्री होऊं लागली, तेव्हां त्याच्याबद्दल उत्पन्न झालेल्या चिडींत देखील या आकर्षणाचा भाग होता. किंबहुना तो आपल्याला भेटावा, त्याचा आपला परिचय वाढावा अशी तिच्या मनाची ओढ होती, म्हणूनच त्यानं आपल्याला भेटूं नये याची चीड तिला वाटली होती. त्याची भेट नंतर कधींच झाली नसती तर मानवी मनाच्या धर्माप्रमाणें त्याच्याबद्दल

विला वाटणारं आकर्षण कालांतरानं तिच्या मनांतून उडून गेलं असतं. ती त्याला विसरली असती. आपल्या आयुष्याची वाट चालत गेली असती. आपण अशा एका तरुणावर एकदां मोहित झालों होतो याची आठवण तिच्या मनांत मध्येंच केव्हां तरी सकारण अगर कारणा-वांचून तरळली असती इतकंच ... परंतु ज्याच्यावर तिचं मन जडलं होतं, जो आतां कधींच भेटणार नाहीं असं ती मनाशीं ठरवूं लागली होती, तो तिला आतां अकस्मात भेटला होता. त्याच्या सहवासांत ती प्रवास करीत होती, त्याच्या वागण्यांतला पूर्वीचा चमत्कारिकपणा त्यानं आपण होऊन सोडून दिला होता, तो तिच्याशीं खेळीमेळीनं बोलत होता ! तिच्या मनांतलं त्याच्याविषयींचं जें आकर्षण निर्जन माळरानावावर फुललेल्या सुंदर सुकुमार फुलाप्रमाणें कोमेजून वाया जाणार अशी तिला भीति वाटत होती तें आतां एकदम टवटवीत झालं होतं. आणि त्याला तें कळावं अशी तिची इच्छा होती. एखाद्या पुरुषाविषयीं वाटत असलेलं आकर्षण दाखविण्याची स्त्रियांची रीत ठरलेली आहे. ज्यायोगें ती आक-र्षित होईल, त्याच्या मनाला मोह पडेल, अशी लाघवी बोलणीं आणि नाजुक अभिनय त्या करतात ! ....

म्हणून श्रीरंगाचा प्रश्न ऐकून होय अशा अर्थी तिनं मान हालविली, परंतु तिनं वर पाहिलं नाहीं !

गाडींतल्या त्या प्रवासांत कांहीं नाहीं, परंतु नंतरच्या दिवसांत मालती वरचेवर त्याच्या घरीं येऊन त्याच्याशीं बोलत बसूं लागली, तेव्हां तिचं मन श्रीरंगानं हलकें ओळखलं. तो नुकताच आजारांतून उठला होता, व हवापालट करण्यासाठीं व पूर्ण विश्रांति घेण्यासाठीं पुण्यास घरीं आला होता. तो घराबाहेर क्वचितच जाई. परंतु ती त्याच्याकडे पुष्कळदां येऊन जाई. प्रथम एकदोनदां ती त्याच्याकडे आली तेव्हां आपण त्याच्या

प्रकृतीच्या चौकशीसाठीं आलों असं तिला सांगतां आलं. तिसऱ्या खेपेस ती आली तेव्हां तिच्या हातांत एक पुस्तक होतं. ती म्हणाली,

'तुम्ही मला अभ्यासांत मदत केली पाहिजे.'

तो म्हणाला, 'मी ? झालें, एकादशीच्या घरीं गेली शिवरात्र पाहुणी. तुम्ही एम्. ए. साठीं घेतलाय भाषाविषय. मी पदवीवर असलो तरी माझा विषय घनफूट, क्षेत्रफळ, लोखंड, लाकूड, खडी आणि चुना. तुमच्या अभ्यासांत मी काय मदत करणार, दगड ?'

ती म्हणाली, परंतु ज्यां विषयावर मी तुमची मदत मागते तो विषय देखील तुमच्या फार आवडीचा आहे हें मला माहीत आहे. ज्ञानेश्वरींचा बारावा अध्याय आम्हांला परीक्षेला आहे.

'आणखी एकनाथी भागवत नाहीं कां ? तूं एम्. ए. ची तयारी करणार आहेस कीं वारकरीण होऊन हातांत भगवी पताका घेऊन टाळ कुटीत पंढरीला जाणार आहेस ? ज्ञानेश्वरीचा बारावा अध्याय तुमच्याकडून घोकून घेणारी ही युनिव्हर्सिटी मोठी शहाणीच दिसते मला.'

'पुरे पुरे. चावटपणा पुरे. हा अध्याय वाचण्यांत तुम्हीं मला मदत करणार कीं नाहीं बोला. मला फार जड जातो हा अध्याय.'

'मी तुला सांगूं, आमच्या बाबांची मदत घे तूं, त्यांचा जवळ जवळ पन्नास वर्षं व्यासंग आहे ज्ञानेश्वरीचा. तुला काय अडत असेल तें त्यांना विचार.'

'शाबास ! हालवायाच्या घरावर तुळशीपत्र !'

'कुणी मिठाई मागायला आलं अन् ती आपल्याजवळ नसली तर मग हलवायचं घर नको दाखवायला ?'

'हुं ! पुष्कळ मिठाई आहे तुमच्याजवळ. उगीच नका बोलूं.'

अशा प्रकारें ती येऊन बोलत बसली कीं संभाषणाच्या ओघांत

मध्येंच एखादं वाक्य असं कांहीं बोले कीं त्यांत तिचं मनोगत अगदीं स्पष्ट दिसत असे. तिचा संकोच कमी कमी होत गेला तसतसं तिचं संभाषणचातुर्य श्रीरंगाच्या अधिकच प्रत्ययाला यायला लागलं. तिच्या स्वभावाचे नवे नवे पैलू त्याला दिसूं लागले. व ते सगळे त्याला मनोहर वाटूं लागले. तिचं सौंदर्य हा केवळ तिचा बाह्य गुण होता. ती वाचनमंदिरांत श्रीरंगाशीं प्रथम बोलली तेव्हां त्याचा कांहींच परिणाम त्याच्या वृत्तीवर झाला नव्हता. त्यानं तिला सहज तोडून टाकलं होतं. परंतु आतां केवळ तिचं बाह्य रूप त्याला दिसत नव्हतं. ती जों जों त्याच्या अधिकाधिक जवळ जवळ येत होती तों तों तिचं मन आणि अंतःकरण त्याला ज्यास्त स्पष्ट दिसूं लागलं होतं, व त्यांत ओतप्रोत सौंदर्य व उमदेपणा भरलेला आहे असं त्याला आढळून येत होतं. त्याच्या वृत्तींतला प्रतिकार तिनं आपल्या वागण्यानं केव्हांच ढासळून टाकला होता, आणि प्रेमाच्या बाबींतील्या एका अनुभवानं भाजलेल्या त्याच्या मनाची रूक्षता तिच्या सहवासांत झपाट्यानं नाहींशी झाली होती. त्या ठिकाणीं स्निग्धता उत्पन्न झाली होती, ' तिच्याविषयीं त्याला आकर्षण वाटूं लागलं होतं, त्यांतून प्रीतीचे अंकुर फुटले होते. तिनं आपल्याकडे यावं, जवळ बसावं, ' बोलावं यासाठीं आपण किती उत्सुक असतों तें त्यानं प्रथम प्रथम तिला मुळींच कळूं दिलं नव्हतं. परंतु उत्तरोत्तर हें कौशल्य त्याला साधेना. तो तिच्या वाटेकडे डोळे लावून बसलेला असे. रस्त्यावर तिच्या सायकलची घंटा वाजली कीं ती त्याला ओळखतां येऊं लागली होती. तो स्वतःशीं म्हणे, ' आली खालीं त्याच्या आईशीं बोलत ती जास्त वेळ बसली तर तें त्याच्या मनाला खपत नसे. तिनं उशीर केला, कीं तिला पहातांच तो म्हणे' ' किती वेळ वाट पहायला लावतेस ? ' | पुरुष आपल्यावर पूर्ण अनुरक्त झाल्याची खात्री पटली कीं त्याला त्रास देण्यांत, प्रेमाची कबुली त्याच्या तोंडून काढण्यांत स्त्रियांना आनंद होत असतो. | पुष्कळदां मालती

श्रीरंगाकडे यावयास मुद्दाम वेळ करी, किंवा आली तरी मुद्दाम खालीं अमृतरावांच्या जवळ ज्ञानेश्वरीच्या गप्पा काढून बोलत राही. मग श्रीरंग तिच्यावर रागावे त्याच्या रागाचं तिला फार सुख होई व ती त्याची समजूत काढूं लागली कीं त्याला आनंद होत असे.

तो मुंबईस परत गेला तेव्हां पुन्हां लवकर येण्याचं त्यानं मालती-जवळ कबूल केलं, परंतु त्याप्रमाणें तो आला नाहीं. तिला दिलेलं वचन तो विसरला हें त्याचं कारण नव्हतं. मध्यंतरीं उद्योगांत त्याला अगदीं गोडी वाटेनाशी झाली होती ती आता त्याला पुन्हा वाटूं लागली होती, कामहि खूप सांचलं होतं, आणि आतां पुण्यास गेल्यावर लवकर परत येण्याची गरज राहूं नये इतकं काम उरकून टाकण्याची त्याची इच्छा होती, हें त्याचं खरं कारण होतं.

तो मालतीला अगदीं क्वचित् पत्र लिहीत असे. त्या कामांत तो अतिशय आळशी होता. त्याच्या या स्वभावदोषाची मालती पुष्कळदां चेष्टा करी. पण त्याबद्दल ती त्याच्यावर कधीं रागावत नसे. कारण तो पुण्यास आला कीं पुष्कळ दिवस राहात असे. आतां तो व ती एकमेकांशीं उघड उघड प्रेमिकांप्रमाणें वागूं लागलीं होतीं. एकमेकाचा अदमास घेणं, अंत पाहणं, एकमेकावर अधिक मोहिनी पसरण्यासाठीं बोलणं, चालणं, लपंडाव खेळणं हे सर्व प्रकार बंद झाले होते. त्यांच्या सहवासाला निःशंक प्रीतीचं संथ गंभीर स्वरूप आलं होतं.

एके दिवशीं मालती बापाला म्हणाली, ' साहेब, मला एक गोष्ट तुम्हाला सांगावयाची आहे. '

' ते म्हणाले, ' सांग. '

' तुम्हाला ती आवडेल असं वाटतं. '

'

‘ आईला मी ती अजून सांगितली नाहीं. ’

‘ हं. ’

‘ तिच्यापेक्षां तुम्ही मला अधिक जवळचे वाटतां. ’

जस्टिससाहेब हंसूं लागले. ते म्हणाले, ‘ अग प्रस्तावना पुरे कीं. ’

मालती गप झाली. तिला काय सांगायचं होतं त्याचा नीटसा तर्क त्यांना करतां येईना. त्यांनीं विचारलं, ‘ तुझी परीक्षा जवळ आली आहे त्याबद्दल कांहीं आहे काय ? ’

ती म्हणाली, ‘ माझी परीक्षा राहूं दे. तुमची पाह्यची आहे मला. ’

म्हणजे काय ? ’

‘ सांगतें. आज संध्याकाळीं तुम्ही श्रीरंगाच्या घरीं आलं पाहिजे. त्याच्याशीं लग्न करायचं मी ठरविलं आहे. तो तुम्हांला आवडतो मला माहीत आहे, परंतु त्याच्या घरचीं माणसंही आमच्या लग्नाला संमति देण्यापूर्वीं तुमच्या परिचयाचीं व्हावींत अशी माझीं इच्छा आहे, तुमचा त्यांचा परिचय झाला म्हणजे मग आमचा लग्नाचा विचार श्रीरंग आपल्या बाबांना सांगणार आहे, आधीं नाहीं. ’

‘ असं म्हणतेस ? ’ त्यांच्या त्या प्रश्नांत आश्चर्याचा थोडासा ध्वनि होता.

म्हणून मालतीनं विचारलं, ‘ मीं श्रीरंगाशीं लग्न करायचं ठरविलं हें ऐकून तुम्हांला आश्चर्य वाटलं काय ? ’

‘ नाहीं. या रोगाचीं लक्षणं बरेच दिवस दिसत होती मला. परंतु त्याच्या घरीं मी यावं असं तूं म्हणशील अशी माझी कल्पना नव्हती. तूं आणि श्रीरंग इतका सूज्ञपणा दाखवाल अशी कल्पना नव्हती मला. प्रेमांत सांपडलेल्या तरुणांना इतकं धोरण सुचत नाहीं.\ म्हणून थोडंसं आश्चर्य वाटलं मला. ’

मग आज संध्याकाळीं जाऊं या ना आपण ?'

'अवश्य !'

मालतीला फार आनंद झाला.

ती जस्टिससाहेबांना घेऊन श्रीरंगाच्या घरीं दाखल झाली तेव्हां दुसऱ्या मजल्यावरच्या दिवाणखान्यांत श्रीरंग एकटाच बसला होता. मालतीच्या वडिलांना पहातांच तो उठला, व आंतल्या खोलीकडे तोंड वळवून म्हणाला, 'बाबा, बाहेर या. मालतीचे वडील आपल्याकडे आले आहेत.'

'वा वा ! माझ्या गरिबाच्या घराला पाय लागले त्यांचे. मोठी कृपा झाली !' असं आंतून ओरडून त्यांनीं चटकन डोक्याला पांढरा स्वच्छ रुमाल बांधला व ते बाहेर आले.

जस्टिससाहेब थोडेसे पुढं झाले.

दोघांची दृष्टादृष्ट झाली.

आणि मग काय चमत्कार !

दोघांनीं हात पसरून एकमेकांला घट्ट आलिंगन दिलं.

श्रीरंग आणि मालती दोघंहि अत्यंत आश्चर्यचकित होऊन जागच्या जागींच उभी राहिलीं ! त्यांच्या दोघांच्या पित्यांची पूर्वीची ओळख असेल अशी त्यांना स्वप्नांत देखील कल्पना करतां आली नसती. पण अगदीं जुन्या जिवलग मित्रांप्रमाणें त्यांनीं एकमेकांना घट्ट मिठी मारलेली प्रत्यक्षच दिसत होती 'किती अकल्पित ही भेट ! अरे मला खरं सुद्धां वाटत नाहीं !' हे जस्टिसाहेबांचे उद्‌गार, व 'माझ्या पाडुरंगानं तुमचं पुण्य दर्शन घडविलं !' असे अमृतरावांच्या तोंडचे सद्‌गदित उद्‌गार प्रत्यक्षच ऐकूं येत होते !

जस्टिससाहेबांच्या भेटीनं अमृतरावांना भलताच आनंद झालेला दिसला. जस्टिससाहेबांनीं नको नको म्हटलं तरी त्यांचं न ऐकतां त्यांनीं

रुक्मिणीबाईकडून लहानशा मेजवानीचाच थाट उडवून दिला. नंतर श्रीरंग आणि मालती खालीं रुक्मिणीबाईशीं बोलत बसलीं, व अमृतराव व जस्टिससाहेब वर गेले.

अमृतरावांच्या खोलींत जातांच जस्टिससाहेब म्हणाले, 'दार बंद कर. मला तुझ्याशीं कांहीं बोलायचं आहे.'

अमृतरावांनीं दार बंद केल्यावर जस्टिससाहेबांनीं त्यांचा हात धरला आणि विचारलं, 'हें आहे काय?'

एखाद्या अपराधी माणसाप्रमाणें अमृतरावांनीं खालीं मान घातली.

जस्टिससाहेब म्हणाले, 'हा खोटेपणा तूं कशासाठीं चालविला आहेस? तुझं खरं स्वरूप तूं कशासाठीं लपविलं आहेस? किती दिवस लपवूं शकशील? या वंचनेंत सुखापेक्षां दुःखाचींच—कल्याणापेक्षां अकल्याणाचींच—बीजं आहेत, अशी मला भीति वाटते.'

अमृतरावांनीं एकदम त्यांच्या नजरेला नजर दिली पण मग मान वळवून स्वतःशींच बोलल्याप्रमाणें अगदीं हलक्या आवाजांत ते म्हणाले, "तशी भीति मलासुद्धां वाटते. पण त्याचं असं आहे, एकदां आरंभिलेलं हें नाटक मला आतां अखेरपर्यंत तडीला न्यायलाच पाहिजे. मध्येंच तोंडाचा रंग पुसून माझं मूळ स्वरूप दाखविणं मला शक्य नाहीं. माझा हा संसार म्हणजे नदीचं अर्धं पात्र ओलांडून गेलेली नांव आहे. मागं काय पुढें जाण काय सारखंच धोक्याचं आहे. तेव्हां विचार करतों, जाऊं दे पुढेंच नांव! ज्या पांडुरंगानं इतके दिवस कृपा केली तोच यापुढेंही माझ्या संसारावर दयेचं छत्र धरील, आणि निभावून नेईल!'

अमृतरावांच्या घरून परत जातांना आपले साहेब आधीं कांहीं तरी बोलतील व मग आपण बोलूं अशा विचारानं मालती प्रथम कांहीं

वेळ गप राहिली. जस्टिससाहेब कांहींच बोलेनात याचं तिला आश्चर्य वाटलं. आणखी वेळ गेला तेव्हां तिचं आश्चर्य वाटलं. आतां आपणच कांही तरी बोललं पाहिजे असं तिच्या मनांत आलं, परंतु ज्या बोलण्यांतून पुढें चांगलं आनंदाचं संभाषण निघेल असं बोलणंच तिला सुचेना. श्रीरंगाचे आईबाप तिला स्वतःला इतके आवडत होते कीं त्याच्या घरून परत निघाल्या बरोबर 'फार चांगलीं आहेत माणसं. माले, या घरात तूं सुखी होशील याबद्दल मला शंका नाहीं' अशा अर्थाचे कांहीं तरी उद्गार बापाच्या तोंडून ऐकायला मिळतील अशी तिची परिपूर्ण खात्री होती. मोटार सुरूं झाल्यापासून ती अगदीं सारा जीव एकवटून आतां आपल्या साहेबांच्या तोंडून प्रशंसेचे कोणते उद्गार बाहेर पडतात अशा अपेक्षेनं आपल्या जागीं बसली होती. परंतु तिची अपेक्षा पूर्ण झाली नव्हती. तिच्या खात्रीला धक्का बसत होता. साहेब बोलत कां नाहींत म्हणून ती मनाशीं आश्चर्य करूं लागली होती. वेळ जाऊं लागला व ते स्तब्धता मोडीनात तेव्हां तिला त्यांचा राग आला. तुम्हांला सांगायचं नसलं तर माझंही कांहीं अडलं नाहीं असं ती मनांतल्या मनांत त्यांना उद्देशून म्हणूं लागली. यामुळें ते बोलत नाहींत तर आपण बोलून सुरवात करावी असं जरी तिला कांहीं वेळानं वाटूं लागलं तरी त्याचा उपयोग झाला नाहीं. रागाची आढी तिच्या मनांत उत्पन्न झाली होती व त्यामुळें बोलायला सुरवात कशी करावी हें तिला सुचत नव्हतं. तिचा राग अगदीं ताजा होता. तिच्या मनाच्या अगदीं वरच्या पातळीवर आधणाच्या पाण्याचे बुडबुडे फुटावे त्याप्रमाणें त्या रागाचे कढे उठत होते. ती कांहींहि बोलली असती तरी त्यांत तिचा राग उमटला असता. आपण रागावलों कीं एकदम कांहीं तरी बोलतो हें तिला माहिती होतं. ती गप्प राहिली.

जस्टिससाहेबही गप्पच राहिले. आतां मात्र त्यांची स्तब्धता माल-तीला अपशकुनासारखी भासूं लागली. इतका वेळ तिला वाटत होतं कीं

श्रीरंगाचे आईबाप आवडले असून साहेब मला तसं सांगून कां टाकीत. नाहींत ? श्रीरंगाचें आईबाप त्यांना आवडले असतील याची तिला शंकाच नव्हती आणि त्यामुळें त्यांच्या अनपेक्षित स्तब्धतेवर ती चिडली होती. परंतु आतां तिचा निःशंकपणा डळमळूं लागला होता. बंगला जवळ आला तरी देखील जस्टिससाहेब गप्प राहिले तेव्हां तिच्या मनांत एकदम शंका आली. यांना श्रीरंगाचं घर पसंत नाहीं कीं काय ? ही शंका इतकी क्लेशकारक होती कीं बंगल्यावर पोचल्याबरोबर साहेबांना सरळ विचारायचं असं तिनं मनाशीं ठरविलं.

परंतु बंगल्यावर पोचल्यावर तिच्या वडिलांनीं आपण होऊ-नच स्तब्धता सोडली. ते म्हणाले, 'माले, मला जें तुझ्याशीं बोलायचं होतं तें ड्रायव्हरच्या देखत बोलण्याची माझी इच्छा नव्हती. म्हणून घरी येत असतांना वाटेंत मी कांहींच बोललो नाहीं. परंतु आतां मात्र सांगतों. कारण माझ्या मनांत तुला जें सांगायचं आहे तें सांगितल्यावांचून मला झोप यायची नाहीं. ये, अशी इथें बैस. आणि मी काय ह्मणतो तें ऐक.'

मालती मनांतल्या मनांत चपापली. बोलण्याची ही प्रस्तावना कांहीं आशापूर्ण नव्हती. ती स्वतःशीं ह्मणाली, 'हे मला आपली नापसंती सांग-णार आहेत कीं काय ? मोठं आश्चर्य आहे ह्मणायचं. श्रीरंगाच्या आई-बापांत त्यांना कोणतं वैगुण्य दिसलं ? त्यांच्या घरांत कोणती वावगी गोष्ट यांना आढळली ? हे हिंदु धर्माचे येवढे अभिमानी अन् कैवारी आणि शुद्धि चळवळीचे आधारस्तंभ. श्रीरंगाच्या घरांत तर धर्माचं अन् भक्तीचं वातावरण कांठोकांठ भरलेलं ! अमृतरावांनीं यांना मोठ्या आवडीनं आग्रहानं आपलं देवघर दाखविलं नाहीं काय ? त्या देवघरांत विठ्ठल रखुमाईच्या मूर्ति होत्या. संतांच्या तस-

बिरी होत्या. भगवद्गीता होती! मग यांना असं काय दिसलं कीं, ज्यामुळें...

साहेब तिला पुन्हां म्हणत होते, ' बैस ना अशी इथें. '

ती बसली. मनांतल्या मनांत ती अतिशय शंकाकुल अन् कष्टी झाली होती. त्याचा परिणाम तिच्या चर्येवर आणि बसण्याच्या तऱ्हेवर झालेला दिसत होता. तिच्याकडे पाहून साहेबांनाहि फार वाईट वाटलं, पण तिच्या हितासाठींच त्यांना आपलं मन थोडा वेळ कठोर करणं भाग होतं. तिला जी गोष्ट ते सांगणार होते ती गोष्ट टाळण्यासारखी नव्हती. शक्य तितक्या लवकर ती तिला सांगून टाकणं आवश्यक होतं. त्यांनीं तिच्या खांद्यावर आपला हात ठेवला व म्हटलं,

' माले, मी जें तुला सांगणार आहे तें तुझ्या कल्याणासाठीं सांगणार आहे हें नीट लक्षांत ठेव. आणि धीरानं वाग. '

' म्हणजे ? हे मला सांगणार आहेत तरी काय ? तिनं त्यांच्याकडे पाहिलं. तिच्या नजरेंत अधीरपणा होता, परंतु त्याहिपेक्षां अधिक भय होतं. ती हलकेंच पुटपुटली, ' समजलें, सांगा ! '

' श्रीरंगाशीं लग्न करण्याचा विचार तुला सोडून द्यावा लागेल. '

त्यांचे ते शब्द ऐकतांच मालतीनं चपापून त्यांच्याकडे पाहिलं. जिवावरचं संकट समोर दिसल्याबरोबर आत्म-संरक्षणाची व विरोधाची सारी शक्ति एखाद्या शिकारी जनावराच्या डोळ्यांत एकवटलेली दिसावी त्याप्रमाणें तिची नजर चमकली. ' साहेब !— ' येवढाच दचकलेला उद्गार तिच्या तोंडांतून बाहेर पडला.

तिची ही प्रतिक्रिया संपतरावांनीं अपेक्षिलेली होती. तिचं त्यांना आश्चर्य वाटलं नाहीं. ते पुढें म्हणाले, ' तूं विचारी आहेस. मीं जें सांगेन तें तुझ्या कल्याणासाठींच सांगेन, हें तुला माहीत आहे. श्रीरंगाशीं लग्न करण्याचा विचार तुला सोडून द्यायला पाहिजे. '

मालतीचे ओठ थरथरत होते, भुंवया चढल्या होत्या. डोळ्यांच्या कडा ओलसर होऊं लागल्या होत्या. ती आपला संताप आवरून धरीत आहे कीं दुःख मागं लोटून देत आहे हें कळणं कठीण होतं. कांहीं वेळ ती या अवस्थेंत गप्प राहिली, व एकदम चढविलेल्या आवाजांत म्हणाली,

' पण कां ? साहेब तुम्हीं मला असं कां सांगतां ? आणि सांगण्याचा धीर तुम्हांला कसा होतो ? तुम्हीं मला जो विचार सोडून द्यायला सांगतां तो सोडून देणें आणखी प्राण सोडणं यांत मला अंतर वाटणार नाहीं, हें तुम्हांला माहीत आहे ना ? माझं श्रीरंगावर पराकाष्ठेचं प्रेम आहे अन् त्याचं माझ्यावर आहे — '

' माले, तें मला माहीत आहे. तुझ्या म्हणण्याप्रमाणं मी श्रीरंगाच्या घरीं आलों तेव्हां तूं उत्तम जोडीदार मिळविलास असंच मी मनाशीं म्हणत होतों. तुलां असंच सांगण्याच्या तयारीनं मी निघालों होतों, कीं, मालती, तुझ्या लग्नाला माझी पूर्ण संमति आहे. पण—

' पण काय ? '

' अमृतरावांची भेट झाल्याबरोबर मी स्वतःशीं म्हटलं, अरेरे ! घात झाला ! दैवानं असा खेळ खेळायला नको होता. आतां मालतीच्या लग्नाला संमति कशी देऊं मी ? '

अर्धवट स्वतःशीं व अर्धवट बापाला उद्देशून ती म्हणाली, ' तुम्हीं काय म्हणतां तें मला कांहीं समजतच नाहीं. श्रीरंगाचे बाबा भेटल्याबरोबर घात झाला असं तुम्हांला वाटलं म्हणजे काय ? तुम्ही दोघांनीं तर एक-मेकांना अशी मिठी मारली होती कीं जणूं काय दोघांच्या स्नेहाच्या भावना उचंबळून आल्या होत्या. तुम्हां दोघांनाही गहिंवर आला होता. तुमच्या दोघांच्याहि तोंडून धड शब्दहि फुटत नव्हता. तें दृश्य पाहून मला इतका आनंद झाला, कीं माझ्या डोळ्यांतून पाणी ओघळूं लागलं. श्रीरंगानं माझ्या कानांत हळूच विचारलं, हें काय ? तूं रडतेस कशासाठीं ? मी

त्यांच्या कानांत सांगितलं, ‘ श्रीरंग आतां आपल्या सुखाला मर्यादा नाहीं या विचाराचा आनंद मला सहन होत नाहीं म्हणून मी रडतें आहे. ’

बोलतां बोलतां ती गप्प झाली. तिनं बापाकडे पाहिलं तेव्हां आतांहि तिचे डोळे भिजलेल होते.

संपतराव म्हणाले, ‘ माले, अमृतरावाला पाहिल्याबरोबर जुनी ओळख आठवून मला इतका आनंद झाला, कीं क्षणभर मला दुसऱ्या कोणत्याहि गोष्टीचं भानहि उरल नाहीं. पण मी भानावर आल्यावर माझा तो आनंद संपला. नंतर मी बोलत होतो, हंसत होतों, परंतु मनांतल्या मनांत मी एकीकडे सारखा विचार करीत होतो. आतां माझ्या लाडक्या मालतीला खरा प्रकार मी सांगू कसा ? माले, अमृतराव जातीनं मराठा नाहीं ! ’

‘ मग ? ’

‘ तो जातीनं महार आहे. त्याच खरं नांव अमृतराव नव्हे, आडनांव भोसले नव्हे; हीं दोन्हीं खोटी आहेत. शिवा कांबळे हें त्याचं खरंच नांव ! त्याच्या मुलाशीं लग्न करण्याची परवानगी तुला मी कशी देऊं ? तुला आपला विचार सोडला पाहिजे. ’

त्यांच्या बोलण्यातलं एकेक वाक्य ऐकतां ऐकतां मालतीचा विस्मय इतका वाढत गेला होता, कीं अखेर स्तंभित झाल्यामुळें तिच्या मनाची संवेदना शक्तिच नाहींशी झाली होती. ‘ तुला आपला विचार सोडावा लागेल ’ हे शब्द तिला धड ऐकूंच आले नाहींत. त्यामुळ तिनं कांहींच उत्तर केलं नाहीं. एखाद्या भ्रांतचित्त बावरलेल्या वेड्या माणसाप्रमाणें शून्य दृष्टीनं ती त्यांच्याकडे बघत राहिली !

—०—

# ९

**किती** वाजले होते कुणास ठाऊक, परंतु अंगावरून जाणाऱ्या वाऱ्याच्या विशिष्ट प्रकारच्या गारव्यामुळें पहांट झाली असावी असं मालतीच्या मनांत आलं. तिनं सारी रात्र अंथरुणाला एकदांसुद्धां पाठ न लावतां बागेकडच्या खिडकींत बसून काढली होती. विचार करून करून ती केव्हां थकली व खिडकीच्या फळीवर डोकं टेकल्या टेकल्याच तिला झोंप कधीं लागली तें तिला कळलंहि नव्हतं. ती जागी झाली तेव्हां तिला येवढंच कळलं कीं, आपला बराच वेळ डोळा लागला असावा. मूर्च्छा सपली, कीं, मूर्च्छेअगोदरच्या विचारांचा व नव्या जाणिवेचा दुवा लगेच जुळत नाहीं; माणसाला फक्त स्वतःच्या जागृतीची जाणीव होते. आपले पाय पुन्हां जमिनीला लागल्याप्रमाणें त्याला वाटतं इतकंच. मालतीला या गोष्टीचा थोडा अनुभव आला. क्षणभर तिचं मन स्वच्छ आणि शून्य राहिलं. तिच्या शरीराला थोडासा ताजेपणा वाटला. परंतु ती स्थिती अगदीं थोडा वेळ टिकली. डोळा लागण्यापूर्वी ज्या विचारांचीं चक्रं कित्येक घटका उलट सुलट फिरत राहिलीं होतीं ते विचार घरट्याकडे फडफडत परत येणाऱ्या पांखरांप्रमाणें पुन्हां गोळा झाले. वाऱ्याची झुळूक आपल्या थंड स्पर्शानं तिच्या अंगाला सुख देत होती. पण तिच्या मनाचा

दाह पुन्हां सुरूं झाला. तो कमी करण्याचं सामर्थ्य त्या वाऱ्यांत नव्हतं. मान मागें टेकून उजव्या हाताच्या तळव्यानं तिनं आपलं कपाळ दाबलं. ती पुन्हां विचार करूं लागली ... साहेबांनीं सांगितलेली हकीगत तिला पुन्हां आठवूं लागली...

संपतराव न्यायखात्याच्या नोकरींत नुकतेच शिरले होते. एका लहानशा शहरीं ते सबजज्ज होते, त्यावेळीं शिवा कांबळे नांवाचा पोरसवदा तरुण महार त्यांच्या घरीं रखवालदार होता. एकदां त्यानं संपतरावांना प्राणांतिक संकटांतून वांचविलं होतं. अमृतराव भोसले म्हणजे दुसरं तिसरं कुणी नसून हा शिवा महारच होता.

ही हकीगत ऐकल्यावर मालतीनं त्यांना विचारलं होतं, " तुमची खात्री आहे याबद्दल ? कदाचित् तुमची चूक होत असेल. "

ते म्हणाले होते, " नाहीं. माझी चूक होत नाहीं. स्वतः अमृत-रावांनीं माझ्याजवळ खरा प्रकार कबूल केलेला आहे. त्यांचं मूळचं नांव शिवा आणि त्यांची खरी जात महाराची याबद्दल शंकेला अगदीं जागा नाहीं. माले, तुला श्रीरंगाशीं लग्न करतां यायचं नाहीं; तुला आपला विचार सोडला पाहिजे. "

ती एकदम उद्गारली होती, ' तें कालत्रयीं शक्य नाहीं ! मला श्रीरंग हवा. त्याची जात कोणती का असेना ? '

' तूं शुद्धीवर आहेस का ? हें भलतंच काय बोलतेस ? '

'भलतंच काय झालं यांत साहेब ? श्रीरंगाच्या जातीबद्दल मी अज्ञा-नांत होते व आज त्याची खरी जात मला कळली ही गोष्ट सोडून द्या. पण एखाद्या महार मुलावर जाणून बुजून माझं प्रेम जडलं असतं तर काय झालं असतं ? तुम्हीं काय केलं असतं ? '

क्षणभरहि न थांबतां संपतराव म्हणाले होते, ' तुला विरोध केला असता, आज सांगतों आहे तसंच तुला निक्षून सांगितलं असतं, कीं तुला आपला विचार सोडून दिला पाहिजे. '

' कां ? माझ्या विचारांत इतकं वावगं काय दिसतय् तुम्हांला ? '

' माले, तूं हें मला विचारतेस ? जातिवंत मराठा घराण्यांतली मुलगी आहेस तूं. तुला मी माझ्या हातांनीं महारच्या घरांत देईन हें तुला शक्य कसं वाटतं ? '

ती म्हणाली होती, ' कां शक्य वाटूं नये ? तुमची सामाजिक मतं उदार आहेत. हिंदु धर्माचे तुम्हीं अभिमानी आहांत. त्या धर्माच्या तत्त्वांचा उदारपणा, त्याचं सर्वसंग्रहाकत्व तुम्हीं मोठ्या आवेशानं लोकांना नेहमीं सांगतां. ब्राम्हण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र हे चारी वर्ण हिंदुधर्मातलेच आहत ना ? परधर्मातलीं माणसं आपल्या हिंदुधर्मांत आलीं पाहिजेत असं तुम्हांला वाटतं. त्यांना हिंदु करून घेण्याच्या चळवळीचे तुम्हीं पुरस्कर्ते आहांत. तुमच्या या उदार मताबद्दल आणि निष्ठायुक्त कार्याबद्दल समाजांत तुमचा गौरव होतो आहे. तुमचं मन प्रगल्भ आहे. निरर्थक खोट्या रूढींचीं बंधनं झुगारून देण्याचा उपदेश, हिंदुधर्माचं खरं उदात्त उज्वल स्वरूप ध्यानांत घेण्याचा उपदेश तुम्हीं केलेला मी ऐकला आहे. मग ज्याचा जन्म दुर्दैवानं शूद्र कुळांत झाला, पण जो शिक्षणान, संस्कृतीनं, शीलानं व आचरणानं तुमच्या आमच्या बरोबरीचा सहज ठरेल अशा तरुणाशीं मीं लग्न करण्याचं ठरविलं असतां त्याला तुम्हीं आनंदानं मान्यता द्याल याबद्दल मला शंका कां वाटावी ? साहेब, माझ्या व श्रीरंगाच्या लग्नाला तुम्ही विरोध करावा याचं मला फार आश्चर्य वाटतं. '

जस्टिससाहेब कांहीं वेळ अगदीं स्तब्ध राहिले होते. आपल्या लेकीचं म्हणणं बिनतोड आहे हें त्यांना नाकारतां येण्यासारखं नव्हतं,

वादांत त्यांचा पराभव झाला होता. स्वतःच्या नापसंतीचं व विरोधाचं तात्त्विक समर्थन करणं त्यांना अशक्य झालं होतं. ते म्हणाले होते,

' तूं म्हणतेस तें अगदीं बरोबर आहे. माझीं मतं उदार आहेत. जातिभेद नष्ट होऊन सर्व हिंदू एक समाज म्हणून नांदले पाहिजेत असं मला प्रामाणिकपणानं वाटतं आणि हें सर्व खरं असून शूद्राच्या मुलाशीं तूं लग्न करावंस हें मला पटत नाहीं. ज्या सुधारणेचा मनुष्य मोठा आग्रहानं प्रचार करीत असतो तीच सुधारणा त्याच्या घरांत आली कीं तो डगमगतो, असं असेल कदाचित्. हा माझा दुबळेपणा असेल. मी नाहीं म्हणत नाहीं. पण हा दुबळेपणा टाकणं मला शक्य नाहीं. माणसाला सूर्यप्रकाश हवासा वाटतो, जीवनाला तो किती उपकारक आहे हें त्याला कळतं, सूर्याची उपासना तो करतो, पण सूर्याकडे स्थिर नजर लावून पाहिलं की त्याचे डोळे दिपतात. सूर्यबिंबाचा प्रत्यक्ष स्पर्श त्याच्या नजरेला सोसवत नाहीं. धार्मिक व सामाजिक सुधारणांची गोष्ट अशापैकींच असेल कदाचित्. शूद्र आणि मराठेच काय, पण शूद्र आणि ब्राम्हण देखील धर्माच्या कसोटीनं भिन्न नाहींत हें मला कळतं. जातिभेद, वर्णभेद, अशा मोठमोठाल्या भेगा जोंपर्यंत हिंदुसमाजाला आहेत तोंपर्यंत त्याच्यांत एक-जिनसीपणाचं सामर्थ्य येणार नाहीं हेंही मला कळतं. पण जें कळतं तें वळत नाहीं. तूं माझी लेक आहेस या दृष्टीनं तुझ्या लग्नाकडे मी पहातो. हें पहातांना समाजसुधारकाची, उदारमतवाद्याची माझी भूमिका मला कायम ठेवतां येत नाहींत. पित्याच्या भूमिकेवरून मी पाहूं लागतो. आणि मग तूं एका शूद्र तरुणाशीं लग्न करावंस हें पटवून घेण्याचा कितीहि प्रयत्न केला तरी मनाला पटत नाहीं. माझा दुबळेपणा मी कबूल करतों. परंतु दुबळेपणाचा हट्ट मल. ेडत येतां नाहीं. तूं श्रीरंगाशीं लग्न केलंस तर माझ्या अंतःकरणाला असह्य वेदना होतील. माझ्या सुखदुःखाचीं

तुला कांहीं किंमत असेल तर श्रीरंगाशीं लग्न करण्याचा विचार सोडून देण्याचं वचन तूं मला दिलं पाहिजेस. '

बोलतां बोलतां जस्टिससाहेबांचा स्वर अगदीं काकुळतीचा झाला होता, व ते मालतीची जणु प्रार्थना करीत होते असा भाव त्यांच्या मुद्रेवर आला.

पण मालती त्यांच्याकडे बघत नव्हती, त्यांच्या आवाजांत झालेल्या फरकाकडे तिचं लक्ष नव्हतं. फक्त त्यांच्या शब्दांचे तिच्या अंतःकरणावर प्रहार होत होते. आणि या बाबतींत आतां अधिक वाद घालण्यांत अर्थ नाहीं अशा समजुतीनं ते मुकाट्यानें सहन करण्याचं तिनं मनाशीं ठरविलं होतं. दोन्ही हातांनीं तोंड झांकून तीं अगदीं स्तब्ध बसली होती.

थोड्या वेळानं जस्टिससाहेब तिला म्हणाले होते, ' आणखी एक वचन तूं मला दिलं पाहिजेस. '

मालतीनं तोंडावरचे हात दूर केले नव्हते. अगर ती कांहीं बोललीहि नव्हती.

संपतराव म्हणाले होते, ' अमृतरावानं आपली मूळची शूद्र जात साऱ्या जगापासून लपविली आहे. श्रीरंगालाहि ती माहींत नाही. अमृतरावाच्या घरांत त्याची सून म्हणून तूं जाऊं नयेस अशी माझी इच्छा आहे. तेवढीं तूं पुरीं केलीस म्हणजे अमृतराव यापुढें समाजांत मराठा म्हणून वावरला तरी त्या गोष्टीशीं माझं भांडण नाहीं. वावरेना बिचारा. मला त्याच्याशीं काय करावयाचं आहे ? त्याचं रहस्य चव्हाट्यावर आणून त्याची बदनामी करण्याची माझी यत्किंचितही इच्छा नाहीं. आणि श्रीरंगालाहीं दुःख देण्याची माझी इच्छा नाहीं. तो शूद्राचा मुलगा आहे हें त्याला कळतां कामा नये. आपण मराठ्याच्या कुळांतले आहोंत हा त्याचा भ्रम कायम राहूं दे. त्यावर माझ्याकडून अगर तुझ्याकडून

आघात होतां कामा नये. त्याच्या कुळाच्या रहस्याची वाच्यता तूं त्याच्या-जवळ करतां कामा नये. त्याला खरी गोष्ट कधी सांगणार नाहींस असं तुझ्या-कडून वचन हवं मला ! '

हीं सारीं बोलणीं आठवलीं कीं काल रात्रीं खिडकींत ती झोपेवाचून सचिंत बसलीं असतांना जो उद्‌गार तिच्या तोंडून पुनः पुन्हां बाहेर पडला होता तो आज पहाटे थोड्याशा झोपेनंतर ती जागीं झाली व पुन्हां विचार करूं लागली तेव्हां तिच्या तोंडून निघाला. ' कशी दुहेरी कात्री आहे पहा ! '...हें कर किंवा तें कर असं साहेब तिला सांगत नव्हते तर असं वचन दे अन् तसंही दे अशी त्यांची दुहेरी मागणी होती. दोन्ही गोष्टी तिला अत्यंत दुःखाच्या होणार होत्या. आणि त्या दोन्ही तिनं कराव्या असं तिच्या साहेबांचं मागणं होतं...' कशी दुहेरी कात्रीं आहे पहा ! '...

तिच्या मनाची खरी धांव अशी, कीं श्रीरंगाची भेट घेऊन त्याला सांगावं ' श्रीरंग, तुझ्या कुळाचं जें रहस्य तुला माहीत नाहीं तें मला ठाऊक झालं आहे. परंतु त्या गोष्टीचा परिणाम तुझ्या माझ्या प्रीतीवर होणं शक्य नाहीं. तूं शूद्राचा आहेस हें कळल्यानं माझ्या प्रेमांत काडीचा देखील फरक झालेला नाहीं. कारण मी जेव्हा मनानं तुझी झालें तेव्हां तुझी जात अमुक असा पुसटसुद्धां विचार माझ्या मनांत आला नव्हता. ज्या गोष्टीमुळें मी तुझ्या-वर अनुरक्त झालें, तुझा सहवास मला हवासा वाटूं लागला, तुझ्याशीं लग्न केल्यानंच मी सुखी होईन अशी माझी खात्री पटली, त्या गोष्टीचा आणि तुझ्या जातीचा कांहीं संबंध नाहीं. तुझी खरी जात मला आतां माहीत झाली असली तरी माझ्या प्रेमांत रतिभरसुद्धां बदल झालेला नाहीं. मला तूं हवास नव्हे तूंच हवास. तुझ्याशीं लग्न करण्याचा माझा निश्चय बदलूं शकत नाहीं...' असं श्रीरंगाला सांगण्यासाठीं तिचं मन उत्सुक होतं.

आणि ही गोष्ट तिनं करतां कामा नये असं तर तिचे साहेब म्हणत होतेच. श्रीरंगाशीं लग्न करण्याचा विचार तिनं सोडून दिला पाहिजे असा तर त्यांचा आग्रह होताच. परंतु शिवाय ज्या कारणासाठीं तिनं तो विचार सोडायचा तें कारण श्रीरंगापासून तिनं गुप्त ठेवलं पाहिजे असं त्यांचं मागणं होतं. श्रीरंग, तूं शूद्राचा मुलगा आहेस त्यामुळें तुझ्याशीं लग्न करायला साहेब मला परवानगी देत नाहींत. त्यांना दुःख देऊन तुझ्याशीं लग्न करणं मला शक्य नाहीं, असं त्याला सरळ स्वच्छ सांगण्याचा मार्ग देखील साहेब बुजवून टाकीत होते. तिनं श्रीरंगाशीं लग्न तर करता कामा नये, परंतु ज्या कारणासाठीं ते तिच्या लग्नाला हरकत घेत होते ते तिनं श्रीरंगाला कळूं देता कामा नये असा त्यांचा आग्रह होता . . . कशी दुहेरी कात्री आहे पहा ! '....

मालतीच्या मनांत मध्येंच एकदम येई, ' पण या कात्रींत मी सापडायचंच कशासाठीं ? साहेबांची ही दुहेरी इच्छा म्हणजे शुद्ध जुलूम नाहीं काय ? केवळ स्वतःच्या सुखासाठा त्यांनीं माझ्यावर असा जुलूम करावा, माझ्या सुखाचा त्यांनीं विचारच करूं नये, कुळाच्या खोट्या प्रतिष्ठेच्या दैवातापुढें माझा खुशाल बळी द्यायला त्यांनीं तयार व्हावं ? आणि बळी देतांनाहि माझ्या कल्याणाच्याच गोष्टी त्यांनीं मला सांगाव्या ? मी काय म्हणून त्याच्या इच्छला मान द्यावा ? या त्यांच्या इच्छेच समर्थन कोणत्या रीतीनं होण्यासारखं आहे ? केवळ खोटा अहंकार आहे या इच्छेच्या मुळाशीं. या त्याच्या अहंकारापुढें मी कशासाठीं मान वाकवा-यची ? माझं प्रेम शुद्ध आहे, सात्त्विक आहे, अमर्याद आहे. त्याचा अभिमान मी धरला पाहिजे. आपल्या प्रेमाचा मी आग्रह केला तर तो सत्याग्रह नाहीं असं कोणाला म्हणतां येण्यासारखं होतं ? माझ्या लग्नाच्या बाबतींत साहेबांना सुखी करतां आलं असतं तर मला हवं होतं. मला फार आनंद झाला असता. दुर्दैवानं ती गोष्ट अशक्य झाली आहे. पण झाली

म्हणून मी माझ्या प्रेमाचा बळी देऊं ? मला स्वतःला आणि श्रीरंगालाहि जन्माचं दुःखी करून ! नाहीं, नाहीं ! मी दुबळेपणा करणार नाहीं सरळ श्रीरंगाकडे जाऊन त्याला मी सांगणार, श्रीरंग, तुझ्या कुळाची हकीगत अशी आहे— '

तिच्या विचाराचा ओघ येथपर्यंत आला कीं, दर खेपेस ती दचके. कारण या बिंदूवर येऊन पोचल्याबरोबर तिच्या मनाला एकदम अशा विचाराचा धसका बसे, कीं, ' नाहीं, असं मला करतां यायचं नाहीं. श्रीरंगाला खरी गोष्ट सांगून टाकतां यायची नाहीं. कारण ती ऐकल्याबरोबर त्याला काय वाटेल, त्याच्या मनाची अवस्था काय होईल, त्याच्या अंतःकरणाला केवढा जबरदस्त धक्का बसेल, इत्यादि गोष्टींचा विचार करून ठेवणें तिला भाग होतं आणि हा विचार जेव्हां जेव्हां ती करूं लागे तेव्हां तेव्हां तिच्या मनांत मोठं भय उत्पन्न होई. कारण श्रीरंगाच्या शूद्रत्वाला ती स्वतः जरी कांहीं महत्त्व देत नव्हती तरी त्याच्यांही मनाची तशीच प्रतिक्रिया होईल असा भरवंसा तिला धरतां येत नव्हता. श्रीरंगाचे विचार, त्याचीं मतं तिच्या पूर्ण परिचयाचीं झालीं होतीं. धर्माबद्दल त्याच्या काय कल्पना होत्या त्या तिला माहित होत्या. माणसाची योग्यता जन्मानं ठरत नसते हें त्याला कळत होतं; परंतु या सर्व गोष्टी खऱ्या असल्या तरी आपण स्पृश्य हिंदु नसून जातीनं शूद्र आहोंत हें कळलं तरी त्याचा यत्किंचित्‌ही खेद श्रीरंगाला होणार नाहीं अशी ग्वाही मालतीची मनोदेवता तिला कांहीं केल्या देईना. उलट त्याला अतिशय दुःख होईल हेंच तिला स्पष्ट दिसू लागलं. दुसऱ्या माणसाच्या जातींबद्दल, कुळाबद्दल सहिष्णुता ठेवणं निराळं, आणि आपण हीन कुळांतले आहों हें समजल्यावर आणि तेंही कित्येक वर्षांनुवर्ष त्याची कल्पनाही नसतां एकाएकी समजल्यावर मनाची स्थिति निर्विकार ठेवणं निराळं. पाहिली गोष्ट शिक्षणानं आणि

विचारानं सुसाध्य आहे, दुसरी साधणें फार कठिण, किती कठिण. तें ज्याच्यावर तसा चमत्कारिक प्रसंग येईल त्यालाच कळण्यासारखं आहे. तो प्रसंग श्रीरंगावर आणण्याचं सामर्थ्य आपल्या ठिकाणीं आहे काय याचा विचार मालती करूं लागली. आहे असं उत्तर तिचं मन देईना. आजपर्यंत तिनं व श्रीरंगानं परस्परांत प्रेमाच्या गोष्टी केल्या होत्या त्या बरोबरीच्या नात्यानं. आतां तिला म्हणावं लागणार होतं, 'श्रीरंग, तुझी जात कितीहि हीन असली तरी तुझं माझं प्रेम इतकं मोठं आहे, कीं त्या हीनत्वाचा मला सहज विसर पडतो.' हें बोलणं खोटं नव्हतं. खरोखरीच तिचं श्रीरंगावर पराकाष्ठेचं प्रेम होतं. परंतु तें बोलणं श्रीरंगाला कसं प्रिय होणार ? आपल्यांत कांहीं तरी वैगुण्य आहे व मालतीचं प्रेम आहे म्हणूनच केवळ ती तें वैगुण्य विसरूं शकते हा विचार श्रीरंगाला सुखाचा वाटण्यासारखा नव्हता. कोणत्याच स्वाभिमानी तरुणाला तो सुखाचा वाटण्यासारखा नव्हता. स्त्री-पुरुष जेव्हां एकमेकांवर अनुरक्त होतात तेव्हां दोघांपैकीं प्रत्येकाला जर असं वाटलं, कीं दुसऱ्याला अर्पण करण्यासारखं कांहीं तरी मोलाचं माझ्याजवळ आहे तरच प्रीतीचा निर्व्याज आनंद दोघांनाहि उपभोगता येतो. प्रेमांत सांपडलेल्या दोघांपैकीं प्रत्ये-काची एकीकडे अशी भावना असावी लागते, कीं दुसऱ्याला त्यानं वारंवार म्हणावं, 'तुझ्या प्रेमापुढें माझं प्रेम कांहींच नाहीं, मी जें तुझ्या पाया-पाशीं ठेवलं आहे तें फार अल्प आहे. उलट तुझ्यापासून मला जें मिळतं त्याचं मोल फार मोठं आहे;' पण एकांतांत बोलावयाच्या या गोष्टी सोडल्या तर दुसरीकडे दोघांची अशी मनोमय खोल भावना असावी लागते, कीं मी जें प्रेम देत आहे तें घेण्यांत दुसऱ्याला अभिमान वाटावा इतकी त्याची योग्यता आहे. प्रणयाची भावना विलक्षण गुंतागुंतीची खरी. नम्रता व अभिमान, स्वतःच्या प्रेमाच्या अल्पत्वाची जाणीव आणि त्याच प्रेमांत मोठेपणाची खात्री, अशा उलटसुलट धाग्यांनीं प्रणयांचे पाश

विणलेले असतात. त्यांतला एखादा धागा जरी तुटला तरी प्रीतीचा नाजुकपणा अन् तिची शुद्धता दुखविली जाते.

ही गुंतागुंत इतरांना कदाचित् कळत नसेल, पण खऱ्या प्रीतींत सांपडलेल्या माणसाला ती समजते. मालतीला ती समजत होती. म्हणून तिला वाटत होतं, कीं श्रीरंगाची तात्त्विक मतं कशींहि असलीं तरी आपल्याकडून त्याच्या हीन जातीचं रहस्य त्याला कळलं कीं त्याला पराकाष्ठेचं दुःख होईल. 'श्रीरंग, तूं शूद्र जातीचा असलास तरी तूं मला हवास. पूर्वींइतकाच तूं मला प्रिय आहेस'—असं ती म्हणेल. पण तिच्या त्या बोलण्यापासून त्याला सुख होणार नाहीं. तसं बोलण्याची तिच्यावर पाळी यावी ही गोष्टच त्याला फार दु:खाची वाटेल. कदाचित् तो म्हणेल, 'माले तुझं प्रेम फार मोठं आहे हें मला माहीत आहे. परंतु माझी खरी जात कळल्यामुळें तात्त्विक दृष्टीनं नव्हे पण लौकिक दृष्टीनं मी तुझ्या योग्यतेचा नाहीं असं मला वाटतं. तुझ्याशीं लग्न न करणं हें माझं कर्तव्य आहे' कदाचित् असलें बोलणं तिला पटणार नाहीं हें ओळखून तो तें बोलणार नाहीं, तिला काहींच न सांगतां तिच्यापासून दूर कुठें तरी जाईल. नाहींसा होईल. तिच्या आयुष्यांतून तो कायमचा उठून जाईल.

हे सारे विचार भ्रमिष्टासारखे पुनः पुन्हां करतां करता मालतीची रात्र सरली होती. त्याप्रमाणेंच आतां पहाटेच्याहि घटका एकामागून एक गेल्या. दिशा उजळल्या. पक्ष्यांची किलबिल ऐकूं येऊं लागली. उमलूं लागलेल्या फुलांचा सुवास वाऱ्याबरोबर येऊं लागला. मालतीतशीच खिडकीच्या फळीला टेकून मान मागं टाकून बसलेली राहिली. तिचं मनही उलट सुलट विचारांच्या वेदना सोशीत अनिश्चित स्थितींत होतं तसं राहिलं.

दोन दिवसांनीं जस्टिससाहेबांनीं तिला विचारलं. 'हं माले, मग काय ?"

ती कांहीं बोलली नाहीं.

त्यांनीं पुन्हां विचारलं, ' तूं काय ठरविलंस ? '

' माझा विचार कायम आहे. '

' श्रीरंग काय म्हणतो ? '

' मी त्याला दोन दिवसांत भेटलें नाहीं. पण आज मी त्याच्याकडे जाणार आहे. तुम्ही मला पेंचांत टाकलं आहे. माझ्या लग्नाला तुमचा जो विरोध आहे तो तर मी मानला पाहिजेच पण त्या विरोधाचं कारण मात्र श्रीरंगाजवळ मी बोलतां कामा नये असं तुम्ही सांगतां. मीं पुष्कळ विचार करून पाहिला. तुमचं म्हणणं ऐकणं मला शक्य नाहीं. तुम्हांला दुःख देणं माझ्या फार जिवावर येतं, पण माझा खरोखर नाइलाज आहे. श्रीरंगावांचून जगणं मला शक्य नाहीं. त्यांच्याशीं मी लग्न करणार. '

' तो जातीनं महार आहे या गोष्टीची तुला कांहींच खंत वाटत नाहीं ? '

' नाहीं. '

संपतराव म्हणाले, ' तूं हें अज्ञानामुळें बोलतेस. अमृतरावाची खरी जात उघडकीला आल्यावर समाज त्याच्यावर कसा तुटून पडेल, त्याचा केवढा बदलौकिक होईल, आणि त्याची सारी प्रतिष्ठा नाहींशी होऊन त्याच्या कुटुंबाची काय दुर्दशा उडेल याची कल्पना तुला नाहीं म्हणून तूं असं बोलतेस. '

मालती म्हणाली, ' त्यांच्या घरावर आकाश कोसळलं तरी चिंता नाहीं. मी श्रीरंगाशींच लग्न करणार ! '

ते तिच्या खोलींतून रागानं उठून गेले.

आपल्या खोलींत गेल्यावर ते बराच वेळ अस्वस्थपणानं येरझारा घालीत राहिले. मग मनांत कांहीं तरी नवी कल्पना आल्याप्रमाणें ते मध्येंच थांबून उभे राहिले. टेबलाजवळ जाऊन त्यांनीं त्यावर पडलेली एक

निमंत्रण—पत्रिका उचलून पाहिली. त्यांच्या मनाचा निश्चय होऊं लागल्याप्रमाणें त्यांनीं त्या पत्रिकेंतील मजकुराकडे पाहिलं.

लष्कर भागांतल्या हिंदू नागरिकांनीं अमृतरावांच्या एकसष्टीनिमित्त त्यांचा मोठा सत्कार करून त्यांना मानपत्र द्यायचं ठरविलं होतं. अमृतरावांनीं आपल्या परोपकारी वृत्तीनं, दानशूरत्वानं आणि भगवत्भक्तीनं जी जनसेवा कली होती तिच्याबद्द दुमत होणं शक्य नव्हतं. त्यांचासारखा पवित्र आचरणाचा, सात्त्विक वृत्तीचा, धर्माचा सेवक व हिंदूंचा उपकर्ता दुसरा आढळणं कठीण होतं. त्यांनीं आजपर्यंत कित्येक संस्थांना सहाय्य केलं होतं. शेंकडों लोकांना उपकृत केलं होतं, हजारों लोकांना नामश्रवणाचं पुण्य घडविलं होतं. अशा थोर पुरुषाचा सत्कार करण्याकरितां मोठ्या मोठ्या नागरिकांची समिति नेमण्यासाठीं एक सभा बोलावण्यांत आली होती. सत्कार समितीवर जस्टिस संपतराव गायकवाड यांनीं आपलं नांव घालूं द्यावं अशी सभा बोलावणाऱ्यांची इच्छा होती.

या सभेची ती आमंत्रण—पत्रिका होती.

आणि एक विशिष्ट हेतू मनाशीं धरून त्या सभेला हजर राहण्याचा जस्टिस साहेबांच्या मनाचा निश्चय झाला. मालती हट्टीपणा करणार हें त्यांना उघड दिसत होतं. ती केवळ अज्ञानानं हट्ट करीत होती असं त्यांना वाटत होतं. अमृतरावांनीं आपली जात लपविण्याचं जें कपट केल तो भयंकर सामाजिक द्रोह होता. तें कपट उघडकीला येतांच त्यांच्या घराची किती विटंबना होईल व समाज त्यांना व त्यांच्या कुटुंबियांना किती कठोर शिक्षा करील तें तिला समजलं तर तिला खचित् वाटूं लागल, कीं समाजाच्या कमालीच्या रोषाला व बहिष्काराला बळी पडलेल्या घरांत तिला सुख लागणार नाहीं. पण ज्या गोष्टीची मालतीला अल्पवयामुळें, अज्ञानामुळें आणि श्रीरंगाच्या प्रेमांत सांपडल्यामुळें कल्पना करतां येत नव्हती त्या गोष्टी प्रत्यक्षच घडलेल्या तिला दिसाव्या असं करतां येण्यासारखं होतं. आ

तें करण्यास या सभेची संधि आयती चालून आली होती. इतकी उत्तम संधि पुन्हां मिळण्यासारखी नव्हती. तिचा पुरेपूर उपयोग करण्याचा जस्टिससाहेबांचा निश्चय झाला होता.

ते सभेला आलेले पहाताच सर्वांना फार आनंद झाला. त्यांचा व अमृतरावांचा फार जुना स्नेह असल्याचं पूर्वी कुणालाच माहीत नव्हतं. पण तीन दिवसांपूर्वी ते आपल्या लेकीला घेऊन अमृतरावांच्या घरीं आले, येतांक्षणीच त्यांना कडकडून भेटले, इत्यादि प्रकाराची बातमी हां हां म्हणतां पसरली होती. ही नवी माहिती मिळाल्यामुळें आजची सभा बोलावणाऱ्या लोकांना फार आनंद झाला होता. आणि त्यांचं आमंत्रण स्वीकारून जस्टिससाहेब प्रत्यक्ष सभेला आलेले पहातांच त्यांचा आनंद शतपटींनीं वाढला. सभेसाठीं आलेल्या साऱ्या बड्या मंडळींनीं उत्थापन देऊन त्यांचं स्वागत केलं, ' या, या साहेब. आपण आलांत, आमचं काम सोपं झालं.'

आणि या सभेवर बॉंब टाकण्यासाठीं जस्टिससाहेब आले होते !

सभेला प्रारंभ झाला. एकेक वक्ता उठून अमृतरावांचं गुणवर्णन करून त्यांचा सत्कार करणं व त्यांना मानपत्र देणं किती उचित आहे ते सांगूं लागला. वर्गणीचे मोठेमोठे आंकडे पडूं लागले. अध्यक्षांनीं जस्टिससाहेबांकडे वळून म्हटलं, ' साहेब आपला आंकडा ! एक हजार लिहूं काय ? आपला व अमृतरावांचा फार जुना स्नेह लक्षांत घेतां— '

जस्टिससाहेब उठले व अध्यक्षांकडे पाहून म्हणाले, ' मी थोडा बोलूं इच्छितो. '

अध्यक्ष म्हणाले, ' वा, अवश्य ! '

जस्टिससाहेब म्हणाले, ' मित्रहो, माझा आणि अमृतरावांचा फार जुना स्नेह आहे हें आपणां सर्वांना माहीत झालंच आहे. आपला व अमृतरावांचा जो परिचय आहे तो ते या शहरांत येऊन राहूं लागल्यानंतरच्या

थोड्या वर्षांचा आहे. मीं मात्र अमृतरावांना तीस वर्षांपूर्वीपासून ओळखतो. मध्यंतरी त्यांची आमची फाटाफूट झाली होती. एकमेकाला आम्ही पाहिलंहि नव्हतं. तीन दिवसापूर्वी त्यांची माझी भेट झाली ती जवळ-जवळ तीस वर्षांनीं. ते माझे फार जुने स्नेही आहेत हें खरं आहे. त्यांच्याविषयीं मला मोठा आदर आहे. पण धर्माबद्दल आणि सत्याबद्दल मला जास्त आदर ठेवला पाहिजे. मैत्रीपेक्षां सत्याची चाड मला अधिक बाळ-गली पाहिजे. तेव्हा सत्याला आणि धर्माला स्मरून तुम्हांला माहीत नाहीं अशी एक गोष्ट सांगणं मला भाग आहे. ती ऐकतांच तुम्ही सारे चकित व्हाल. ती तुम्हाला अप्रिय वाटेल. माझ्यावर तुम्हां सगळ्यांचा कदाचित् रागही होईल. पण माझं एक कर्तव्य म्हणून ती मला सांगितली पाहिजे.

सारे लोक स्तिमित झाले, बघत राहिले. जस्टिससाहेब पुढें काय बोलतात तें ऐकण्यासाठीं साऱ्यांनीं आपले श्वास आंवरून धरले.

जस्टिससाहेब पुढें म्हणाले, ‘ आपल्या मराठा समाजाची प्रतिष्ठा अमृतरावानीं वाढविली, आपल्या समाजाला ते एक भूषण आहेत म्हणून त्यांचा सत्कार करण्याचा बेत तुम्ही केला आहे. परंतु हा सत्कार स्वीकार-ण्याची अमृतरावांची पात्रता नाहीं. त्यांनीं आपल्या समाजाची प्रतिष्ठा वाढविलेली नाहीं. उलट आपल्या समाजाला कलंक लावला आहे. ते मुळीं आपल्या समाजांतले नाहींतच. ते जातीनं मराठा नाहींत. महार आहेत ! ’

जस्टिससाहेब खालीं बसले.

सारी सभा भयंकर चकित होऊन गेली. क्षणभर एकाहि माणसाच्या तोंडून एकही शब्द फुटेना. थोड्या वेळानें अध्यक्षांनीं जस्टिससाहेबांना विचारलं,

' माफ करा, पण आपल्या बोलण्यावर आम्ही विश्वास कसा ठेवायचा ? आपण जें सांगतां त्याची सत्यता पटविण्यासारखा कांहीं पुरावा आपण सांगाल काय ? '

जस्टिससाहेब म्हणाले, ' मी म्हणतो ती गोष्ट खरी कीं खोटी तें स्वतः अमृतरावांनाच विचारा म्हणजे झालं. '

हें त्याचं म्हणणं सभेला जमलेल्या लोकांना पटलं. आणि ते सर्वजण अमृतरावांच्या घरीं जाऊन दाखल झाले. सभेच्या अध्यक्षांनीं सभेंत घडलेली हकीगत सांगितली व अखेर त्यांना विचारलं, ' जस्टिस-साहेब सांगतात तें खरं कीं खोटं ? '

त्यांच्या प्रश्नाचं अमृतरावांना आश्चर्य वाटल्यासारखं दिसलं नाहीं. एखाद्या वाटसरूला वादळ बहुतेक टळलं असं वाटत असावं परंतु त्याचा काय नेम कदाचित् ते होईलहीं अशी त्याच्या मनात सतत कल्पना असावी, मग वाऱ्याची पहिली हालचाल झालेली दिसल्यावर त्याची जी मनःस्थिति होत असेल ती यावेळीं अमृतरावांची होती. त्याची जशी चर्या दिसत असे तशीच अमृतरावांची दिसली असेल.

क्षणभर ते गप्प राहिले. नंतर ' विठ्ठल विठ्ठल ' असा स्वगत उद्‌गार त्यांच्या तोंडून बाहेर पडला. त्यांनीं झटकन् जस्टिससाहेबांकडे अशा अर्थानं पाहिलं कीं सारा प्रकार माझ्या लक्षांत आला आहे. आणि नंतर अगदीं शांतपणानं सर्वांच्याकडे बघून ते म्हणाले,

' मित्रहो, तुमच्या प्रश्नाचं उत्तर म्हणून एक हकीगत सांगतो ती ऐका. सुमारें ३० वर्षांपूर्वी एका तालुक्याच्या गांवीं एक महाराचं कुटूंब होतं. एकदां प्लेगच्या कहरांत या कुटुंबांतलीं सारीं मोठीं माणसं दगावलीं. अठरा वीस वर्षांचा एक तरुण काय तो उरला. त्याचं नांव शिवा. त्या गांवीं एक नवे सबजज्ज आले. त्यांच्या घरीं रखवाली करण्यासाठीं सरकारांतून शिवा कांबळेची नेमणूक झाली. हे साहेब स्वभावानें फार

ममताळु होते. आपल्या न्यायदानाच्या कामांत ते मोठे चोख होते. एकदां एका खटल्यांत त्यांनीं चारपांच रामोशांना कडक शिक्षा ठोठावल्या. त्या रामोशांच्या टोळीनं आजुबाजूच्या भागांत बरेच दिवस धुंदाई माजविली होती. सबजजसाहेबांच्या निकालामुळें लोकांना समाधान झालं. परंतु त्या टोळींतल्या लोकांनीं सूड घ्यायचं ठरविलं. एके रात्रीं त्यांनीं जजसाहेबांच्या घरावर हल्ला केला. त्या वेळीं शिवा महारानं स्वतःच्या जिवाची पर्वा न करतां त्या हल्ल्याला तोंड दिलं आणि धन्याचे प्राण मोठ्या संकटांतून वांचविले. जजसाहेब मोठे कृपाळु होते. वास्तविक शिवानं सेवाधर्माला अनुसरून आपलं कर्तव्य केलं होतं. परंतु जजसाहेबांना त्याचे ते मोठे उपकार वाटले, व ते ऋण फेडण्याच्या हेतूनं शिवा कांबळ्या महाराचं लाचार जिणं घालवायाला लागूं नये, त्याला एखादा स्वतंत्र उद्योग मिळवून द्यावा असं त्यांनीं ठरविलं. सरकारी एंजिनियर खात्यांत, लोकल बोर्डांत त्यांच्या चांगल्या ओळखी होत्या. त्यांनीं शिवा कांबळ्याला छोटीं छोटीं कंत्राटं मिळवून दिलीं आणि त्यासाठीं लागणारं भांडवलहि दिलं. पुढं जजसाहेब बदलून दुसऱ्या गांवाला गेले. शिवा त्यांच्या छायेला मुकला. पण त्यांच्या आशिर्वादानं त्याला कंत्राटांत जी बरकत एकदां मिळाली ती सारखी वाढत गेली. मोठमोठ्यांच्या ओळखी झाल्या, त्याचीं कामं सर्वांना पसंत ठरलीं. एका कामांतून दुसरं काम निघून कंत्राटाच्या धंद्यांत त्याचा चांगला जम बसला. एकदां नागपूरच्या बाजूस एक मोठं मिलिटरी कॉन्ट्रॅक्ट होतं ते शिवानं खटपट करून मिळविलं. हळूहळू तो एक मोठा कंत्राटदार समजला जाऊं लागला. परंतु त्याला अधिकाधिक नांव अन् पैसा मिळूं लागला त्याबरोबर त्याची महत्त्वाकांक्षाहि वाढूं लागली. हीन जातींत सोसाव्या लागणाऱ्या हालअपेष्टांची, अपमानाची, अन् छळाची कित्येक वर्षांच्या अनुभवामुळें त्याला खंत आली होती. त्याला वाटूं लागलं, आपलं अर्धं आयुष्य तर लाजिरवाणं गेलं. गेलं त्याला उपाय नाहीं. पण आतां आपल्या पोटीं मुलं आलीं तर त्यांना तरी माणसाप्रमाणे जगतां यावं. परंतु कपाळावर

कायमची बसलेली महारपणाची तप्तमुद्रा कशी नाहीशी करायची तं त्याला कळेना. परंतु त्याच्या मनात हे विचार सुरू असायला आणि सरहद्द प्रांतांत महायुद्धाच्या धामधुमींत निघालेलें एक खूपच मोठं मिलिटरी कॉन्ट्रॅक्ट त्याला मिळायला एकच गांठ पडली. पांडुरंगानं आपल्या मनांतल्या हेतूला कौलच दिला असं त्याला वाटलं, आणि तो त्या दूरच्या प्रांतीं गेल्यावर अमृत भोसले या नांवानं राहूं लागला व मराठ्याची जात सांगूं लागला. त्या प्रांतांत असतांना व पुढं कराचीस गेल्यावर त्यानं कंत्राटाच्या धंद्यावर खूप संपत्ति मिळविली. अखेर धंद्यांतून निवृत्त झाल्यावर तो तुमच्या या पुण्यनगरींत येऊन राहूं लागला. तोच आतां तुमच्यापुढं उभा आहे. अमृतराव हें माझं नांव नव्हे ! माझी जात मराठा नव्हे ! शिवा महार तो मी! आणि त्या शिवा महाराला महत्वाकांक्षेची व माणुसकीची वाट दाखविणारा त्याचा उपकारकर्ता तो पुण्यपुरुष म्हणजे दुसरं कुणी नसून हे जस्टिस संपतराव गायकवाडच ! त्यांनीं मला श्रेष्ठपदाला चढविलं, आणि त्यांनींच आज मला त्या श्रेष्ठ स्थानावरून खालीं ओढलं ! साहेब, तुम्ही माझा असा घात कशासाठीं केलात ? '

अस म्हणून अमृतरावांनी जस्टिससाहेबांना कडकडून मिठी मारली.

जस्टिससाहेब कांहीं वेळ सुंद होऊन उभे राहिले. आपल्या हातून झालेला हा मित्रघात बरोबर कीं चुकीचा ते त्यांना कळेना.

पण मग ते अगदीं हलक्या आवाजांत म्हणाले, ' अमृतराव, तुझ्या मुलाच्या कल्याणासाठीं तूं आपली जात लपविलीस त्याचप्रमाणें माझ्या मुलीच्या कल्याणासाठीं तुझी जात उघड करण्याखेरीज मला गत्यंतर उरलं नाहीं म्हणून हें केलं. मला क्षमा कर ! '

—०—

# १०

जस्टिससाहेबांचा अदमास खरा ठरला. अमृतरावांची खरी जात उघड झाल्यामुळें जिकडे तिकडे मोठी खळबळ उडाली, आणि या खळबळीचं स्वरूप निषेधाचंच होतं. अमृतरावांनीं तीस वर्षं कपट करून साऱ्या दुनियेला फसवलं, आणि ते व त्यांच्या कुटुंबांतलीं माणसं उच्च वर्णीय हिंदु म्हणून खुशाल वावरलीं ही गोष्ट क्षम्य समजणारी शेंकडा एकदोन देखील माणसं नव्हती. जीं होतीं तीं आपापल्या मनाशीं ' मग त्यांत काय बिघडलं ' असं ह्मणून गप्प राहिलीं. वरच्या सुशिक्षित समाजांतलीं समंजस, विवेकी आणि प्रगल्भ विचाराचीं माणसं अशा प्रकारें गप्पच रहातात, आणि त्यामुळें वृत्तपत्रांतून आणि सभांतून ओरडत उठणाऱ्या दांभिकांचा आवाज म्हणजेच एकंदर समाजाचं मत असा भास बहुधा निर्माण होतो. संकुचित मतांचे दांभिक लोक अमृतरावांवर हरप्रकारांनीं तुटून पडले. त्यानीं त्यांच्याविरुद्ध वृत्तपत्रांत लेख खरडून एकच गिल्ला केला. ' रिफॉर्मिस्ट ' या एकाच इंग्रजी साप्ताहिकानं काय तो अमृतरावांचा कैवार घेऊन उलट हिंदुसमाजाला चार उपदेशाच्या गोष्टी सांगितल्या. बहुतेक सर्व मराठी पत्रांनीं अमृतरावांना दूषण दिलं. ' संस्कृति—संवर्धक '

मंडळाच्या एका उपद्व्यापी सभासदानं महात्मा गांधीपर्यंत हें प्रकरण पोहोंचवून त्यांचा अभिप्राय मागितल्याची गप्प पुण्यांत उठली. तिच्या मागोमाग दुसरी गप्प उठली ती अशी, कीं 'अस्पृश्यता नाहींशी करण्याचं मीं कंकण बांधलेलं आहे हें तर आपणाला माहीत आहे,' असं म. गांधीजींचं त्या सभासदाला उत्तर आलं. परंतु गांधींचा आधार घेतां आला नाहीं तरी संस्कृतिसंवर्धक मंडळानं दहा सभासदांची एक दणदणीत सभा भरून तिच्यांत अमृतरावांना भरपूर शिव्या देण्यांत आल्या, व त्या शिव्या समग्र छापून कांहीं दैनिकांनीं आपले रकाने भरले. नुसते शिव्याशाप देऊन अमृतरावांचं कांहीं वाकडं होण्यासारखं नाहीं हें जेव्हां लक्षांत आलं तेव्हां सनातनी मंडळींनीं 'डायरेक्ट ॲक्शन' चा मनसुबा केला. स्पृश्य हिंदुंच्या वस्तींतून अमृतरावाच्या कुटुंबाला तावडतोब हांकून द्यावं म्हणून त्यांनीं चळवळ सुरूं केली. वास्तविक लष्करच्या ज्या भागांत अमृतरावांचा बंगला होता त्या भागात श्रीमंत स्पृश्य हिंदु तर होतेच पण त्याशिवाय तुरळक कां होईनात मुसलमान, यहुदी, पारशी, अशांचींहि लहान मोठीं घरं होतीं. परंतु या गैरसोईच्या सत्याकडे पहाण्याइतपत चळवळवाल्या सनातन्यांचे डोळे उघडे नव्हते. अमृतरावांनीं समाजाला फसविलं, ठकविलं, त्यांनीं समाजाशीं कपट केलं, भ्रष्टाकार केला, असं बडबडणं त्यांना सोयीचं होतं. तें बडबडताना त्यांना रागाचा व सात्त्विक (!) संतापाचा जेवढा आव आणतां आला तेवढा त्यांनीं आणला होता. त्या रागानं ते आंधळे झाले होते. एकंदर समाजाला आंधळं करण्याची त्यांची इच्छा होती. प्रतिष्ठित नागरिकांच्या वस्तींतून अमृतरावांना हाकून देण्याची चळवळ त्यांनीं जोरानं सुरूं केली. जी मंडळी मोठ्या समारंभानं मानपत्र देऊन अमृतरावांची एकसष्टी साजरी करणार होती त्या मंडळीपैकींच बडे बडे उच्चवर्णीय हिंदू आतां या चळवळींत सामील झाले. हिंदुधर्माचे आपण मोठे अभिमानी व कैवारी आहोंत असं दाखवून मोठेपणा मिळ-

विण्याची त्यांची इच्छा होती. ती इच्छा अमृतरावांना मानपत्र देऊन जशी पूर्ण होणार होती तशीच आतां त्यांना स्पृश्याच्या वस्तींतून हाकून देण्यात साध्य होणार होती. शिवाय या चळवळींत मनाची करमणूक अधिक होती. चळवळीच्या सूत्रधारांनीं काढलेल्या पत्रकावर त्यांनीं मोठ्या आनंदानं सह्या ठोकल्या. अमृतरावांना स्पृश्याच्या वस्तींतून हाकून देण्याचा ठराव करण्यासाठीं या थोर सनातन्यांनीं एक जाहीर सभा बोलावली. लोकांना गंमत हवी असते. या सभेला प्रचंड गर्दी लोटली.

सभेंत वक्तृत्वाला जो पूर आला तो काय वर्णावा? भस्म लावलेले, गंध लावलेले, उपरणं सावरणारे, शालजोडी पांघरणारे, उंची तलम कापडाचा लांब कोट व पंपशू चढविलेले ब्राह्मण, मराठा, वाणी जातीचे दक्षिणी, गुजराथी वक्ते उठले व त्यांनीं असा कांहीं हाहाकार केला व हिंदुधर्माच्या उंच आवाजांत अशा काहीं गर्जना केल्या, कीं त्या ऐकून हिंदुधर्माच्या वैऱ्यांना कापरंच भरावं, आणि हे सर्वजण ख्रिस्तधर्मी फिरंग्याचे पिढ्यान्पिढ्या दास आहेत या गोष्टीवर विश्वास ठेवणं क्षणभर कठीण वाटावं. सारे वक्ते अशा आवेशानं बोलत होते, कीं जणूं प्रत्येकाच्या घरीं धर्माचरणाची शुद्ध गंगाच दुथडी वहात होती! पण सभेला समाज लोटला होता तो चिकित्सा करण्यासाठीं किंवा वक्त्याच्या अंतःकरणाची व घराची तपासणी करण्यासाठीं नव्हे. हिंदुधर्मावर भयंकर संकट आलं होतं. त्यांतून धर्माचे प्राण त्यांना वांचवायचे होते. दांभिक वक्ते आणि मूर्ख भोळे श्रोते असा तो अपूर्व संगम झाला होता. त्या पवित्र क्षेत्रावर अमृतरावांची उत्तरक्रिया व्हायची होती.

ठरावावरचीं भाषणं संपलीं. अध्यक्ष उठले व म्हणाले, 'आतां हा ठराव मी सभेपुढें मतासाठीं टाकणार आहे.'

गर्दींतून एक आवाज आला, 'अध्यक्ष महाराज, तत्पूर्वीं चार शब्द बोलण्याची मला आपण परवानगी द्याल काय?'

अध्यक्षांनीं खणखणून विचारलं, ' तुम्ही कोण ? '

खणखणींत आवाजांत उत्तर आलं, ' मी अमृतराव ! '

तें ऐकतांच सभेंत मोठीच खळबळ उडाली.

अमृतराव गर्दीतून वाट काढून व्यासपीठावर चढले व उभे राहिले तेव्हां ' ऐका, ऐका, ' असं ओरडून सभा शांत करतां करतां अध्यक्षांचा आवाज कोरडा झाला.

कांहीं वेळ ' ऐका ऐका, ' अशा आरोळ्या पुष्कळसे श्रोते ठोकीत राहिले, आणि त्या आरोळ्यांचाच प्रचंड गलबला चालूं राहिला. पण अखेर सभा शांत झाली. अमृतराव बोलूं लागले.

नेहमींप्रमाणें त्यांनीं शुभवस्त्रं परिधान केलीं होती. त्यांच्या कपाळावर व गालावर नेहमींप्रमाणें चंदनाच्या मुद्रा होत्या. नेहमींप्रमाणें कीर्तनाला उभ्या राहिलेल्या हरिदासाच्या थाटांत ते बोलूं लागले. प्रथम त्यांचा आवाज संथ होता, वाणी गंभीर होती, मुद्रा शांत होती. परंतु हलकें हलकें संथपणा जाऊन त्यांच्या बोलण्यांत आवेश दिसूं लागला. त्यांच्या वाणींत तेज आणि उग्रता येऊं लागली. ते म्हणाले,

' मला समाजानं शिक्षा करावी असं तुम्ही म्हणतां, परंतु मी असा कोणता गुन्हा केलेला आहे ? अस्पृश्यता नाहींशी केली पाहिजे म्हणणारे माझे स्नेहीदेखील माझ्याविरुद्ध उठलेले पाहून मला मोठं आश्चर्य वाटतं. ज्या जातींत मी जन्मलो ती हीन समजावी असं हिंदुधर्म सांगतो काय ? भागवतधर्माचा ज्या संतांनीं फैलाव केला आणि ज्या संतांची वाणी म्हणजे आपलं मोठं धन आहे असं तुम्ही समजतां त्या संतांनीं माझी जात हीन ठरविली आहे काय ?

अहो, तुकाराम महाराज सांगतातः—

नामधारकासी नाहीं वर्णावर्ण ॥

लोखंड प्रमाण नाना जात ॥ १ ॥
शस्त्र अथवा गोळे भलता प्रकार ॥
परिसीं संस्कार सकळ हेम ॥ २ ॥
पर्जन्य वर्षतां जीवना वहावट ॥
तें समसकट गंगे मिळे ॥ ३ ॥
सर्व तें हें जाय गंगाचि होऊन ॥
तैसा वर्णावर्ण नाहीं नामीं ॥ ४ ॥
महापुरीं जैसे जातसे उदक ॥
मध्यें तें तारक नांव जैसी ॥ ५ ॥
तये नांवें संगें ब्राह्मण तरती ॥
केवीं ते बुडती अनामिक ॥ ६ ॥
नाना काष्ठजात पडतां हुताशनीं ॥
तें जात होऊनी एकरूप ॥ ७ ॥
तेथें निवडेना बुरे कीं चंदन ॥
तैसा वर्णावर्ण नामीं नाहीं ॥ ८ ॥

ऐकलंत? हिंदुधर्मात सर्व वर्णांना मोक्षाचा सारखा अधिकार आहे. सगळ्या वर्णांना समाजांत प्रतिष्ठेचं स्थान देतो तोच हिंदुधर्म. परमेश्वरानं भक्तांचा उद्धार करतांना त्यांची जात विचारल्याचा उल्लेख कुठें असला तर सांगा. रोहिदास चांभार होता. सेना न्हावी होता. कान्होपात्रा ब्राह्मण नव्हती. गोरा कुंभार होता. दादू पिंजारी होता. चोखामेळा महार होता. तुकाराम महाराज म्हणतात,

पवित्र तें कुळ पावन तो देश ॥
जेथें हरिचे दास जन्म घेती ॥१॥

कर्म धर्म त्याचे जाला नारायण ॥
त्याचें नि पावन तिन्हीं लोक ॥ २ ॥
वर्णअभिमानें कोण झाले पावन ॥
ऐसें द्या सांगून मजपाशीं ॥ ३ ॥
अंत्यज्यादि योनी तरल्या हरिभजनें ॥
तयांचीं पुराणें भाट झालीं ॥ ४ ॥

असं सांगून तुकाराम महाराज पुढें स्वच्छ काय बजावतात तें नीट ऐका—

यातायातिधर्म नाहीं विष्णुदासा ॥
निर्णय हा ऐसा वेदशास्त्रीं ॥

असे किती आधार देऊं ? मीं जन्मभर हरिकीर्तन केलं. अशीं शेंकडों संतवचनं मला मुखोद्गत आहेत कीं जीं कोणताहि वर्ण उच्च कोणताहि नीच नाहीं अशी ग्वाही देतात, हिंदुधर्मात स्त्रियांना, पुरुषांना, अज्ञजनांना, पंडितांना दरिद्र्यांना, श्रीमंतांना सारखेच हक्क आहेत, आणि सारख्याच प्रतिष्ठेतनं वागतां येईल असा निर्वाळा देतात ! भक्तीनं, श्रवणानं, सज्जनांच्या संगतीनं, वाचनानं, मननानं, निदिध्यासानं ज्या श्रेष्ठ हिंदुधर्माची मला ओळख पटली आणि मीं पूजा केली तो माझा धर्म असा आहे. त्या धर्माशीं मीं कपट केलं असं मला वाटत नाहीं. माझी जात मीं बदलली म्हणून माझ्यावर तुम्हां सर्वांचा येवढा रोष. परंतु तुमच्या रोषाला कांहीं आधार आहे काय ? जात बदलतां येत नाहीं असं कुठलं शास्त्र, कुठलं पुराण सांगतं ?

चातुर्वर्ण्य जन्मानं नव्हे तर कर्मानं उत्पन्न होतं असंच आपणां हिंदूंचे सर्व धर्मग्रंथ सांगतात. माझा महारपणा—म्हणजे महारांच्या वांट्याला जे उद्योग, समाजानं दिले आहेत ते उद्योग—मी टाकले. त्याला तीस वर्षें

झालों. कर्मानं आणि आचरणानं आज तीस वर्षं मराठा म्हणून मी राहिलो. मराठा म्हणूनच मरण्याचा मला हक्क आहे. तो माझा हक्क तुम्हीं कोणत्यां आधारानं हिरावून घेणार ? तुम्हीं घेतलांत तरी माझा पांडुरंग, माझा धर्म मला अंतर देणार नाहीं.

हीं अखेरची दोन वाक्यं अमृतरावांनीं बोलायला नको होती. त्यांच्या जागीं एखादा कसलेला वकील असता तर त्यानं ती उच्चारलीं नसतीं. निदान भाषणाचा शेवट त्या वाक्यांवर केला नसता. कारण त्या वाक्यात लढाई होती, आव्हान होतं. समोर जमलेल्या ज्या अफाट समाजाचा कौल अमृतरावांना हवा होता, त्या समाजाबद्दल सूचक का होईना पण तुच्छता होती. तुम्ही काय माझा निवाडा करणार, तो निवाडा करणारी खरी शक्ति फार वेगळी आणि उंच आहे, तुमच्या निवाड्याला मी किंमत देत नाहीं अशा अर्थाचा आवेश त्या वाक्यांत होता. अमृतरावाचं भाषण फार उत्कृष्ट वठलं होतं. त्यांनीं जेव्हां खणखणीत आवाजांत व तन्मय होऊन तुकाराम महाराजांचे अभंग म्हणून दाखविले होते तेव्हां सारे श्रोते सद्‌गदित झाले होते. सभेंतून ' खरं आहे ! खरं आहे ! ' असे उद्‌गार आणि क्वचित् हुंदके देखील ऐकूं आले होते. लोकांना त्यांचं म्हणणं पटत गेलं होतं, त्यांचा कैवार घ्यावासा वाटूं लागला होता. परंतु भाषणाच्या अखेरच्या त्या वाक्यांनीं सारा रंग एकदम फिरला. लोकाच्या मनांत सांचत सांचत वाढलेली करुणेची व न्यायबुद्धीची लाट एकदम परतली. अमृतरावांच्या त्या वाक्यांनीं समाजाचा अहंकार डिवचला गेला. अरे, हा आम्हाला धाक दाखवितो काय अशी कल्पना सर्वांच्या मनाला एकदम चाटून गेली. लोकमत एकदम गर्रकन् फिरलं. जनसमुदाय म्हणजे एक मोठा विचित्र प्राणीं आहे. तो जितका भोळा, भाबडा, भावनाशील आहे तितकाच अहंकारी, दुराग्रही आणि अविचारी आहे.. चतुर वक्ता त्याच्या अहंकाराची खपली कधीं काढीत नाहीं. त्याच्या भावनांवर

फुंकर घालीत असतो. पण कसलेल्या वक्त्याचे हे चातुर्य अमृतरावा-सारख्या साध्या सात्त्विक माणसाला कोठून सुचणार ? त्यांनी आपल्या धनुष्याची दोरी वाजवीपेक्षां जास्त जोरानं ओढली. अगदीं हातातोंडाशीं आलेला कजा अखेरच्या त्या दोन वाक्यांनीं त्यांनीं हातचा घालविला ! स्पृश्य हिंदुंच्या वस्तींतून अमृतरावांनीं निघून जाण्याची ‘ चले जाव ’ घोषणा पास झाली. त्यांच्यावर कडकडीत बहिष्कार टाकण्याचा ठराव सभेनं संमत केला.

खरं पहातां अमृतरावांना आपल्या रहात्या बंगल्यांतून बाहेर काढण्याची सत्ता समाजाच्या हातीं नव्हती. अमृतरावांना हट्ट करून आपल्या बंगल्यांत रहातां आलं असतं. परंतु ज्या वस्तींतले आपले सर्व धर्मबंधू आपल्याकडे तिरस्कारानं पाहतात, आपली हेटाळणी करतात, त्या वस्तींत रहाण्याची अमृतरावांची इच्छा नव्हती. लष्करभागाच्या अगदीं एकीकडच्या बाजूच्या एका लष्करी पेन्शनरांचा बंगला विक्रीस निघाला तो त्यांनीं खरेदी केला, व तेथें जाऊन ते राहूं लागले.

जस्टिससाहेबांचा एक अदमास बरोबर ठरला होता. अमृतरावांची खरी जात उघडकीस येतांच समाज त्यांच्यावर खवळून उठेल, त्यांची छीः थूः होईल, त्यांचं कुटुंब बहिष्कृत होईल, इत्यादि सर्व गोष्टी त्यांच्या अपेक्षेप्रमाणें घडून आल्या होत्या. यांत त्यांच्या अंतःकरणाला सुख होत होतं अशांतला भाग मुळींच नव्हता. उलट अमृतरावांची एकेक हकीकत त्यांच्या कानांवर आली कीं त्यांना क्लेश होत असत. त्यांचं मन त्यांना विचारी, बिचाऱ्या अमृतरावाचा असा घात कशासाठीं केलास ? समाजाकडून त्याची जी विटंबना चालली आहे ती तुला योग्य वाटते काय ? पाहवते काय ? ते मनाला उत्तर देत, ती मला योग्य वाटत नाहीं. आणि ती मला पहावत तर मुळींच नाहीं. परंतु असं असलं तरी ती

मला पाहिली पाहिजे. मला मन घट्ट केलं पाहिजे. अमृतरावाच्या बाबतींत मीं जें केलं तें कदाचित् अक्षम्य पाप असेलही. पण माझ्या मुलीच्या कल्याणासाठीं मीं तें केलं आहे. त्यांचं मन विचारी, ठीक आहे, पण मुलीचं कल्याण तरी तूं साधलं आहेस काय ? तुझ्या म्हणण्याप्रमाणें ती वागणार आहे काय ? श्रीरंगाशीं लग्न करण्याचा विचार तिनं सोडून दिला काय ?... या प्रश्नांना जस्टिससाहेबांना उत्तर देतां येत नसे.

कारण त्यांचा एक अदमास खरा ठरला होता. परंतु दुसरा सपशेल चुकला होता.

श्रीरंगाशीं लग्न करण्याचा मालतीचा निश्चय केंसभरही ढळला नव्हता. उलट त्याच्यावरचं तिचं प्रेम अधिक दृढ झालं होतं. ती श्रीरंगाच्या गाठीभेटी पूर्वीप्रमाणेंच घेत होती. श्रीरंग मुंबईस गेलेला असला तरी त्याच्या आईबापाकडे रोज जायला ती चुकत नसे. जस्टिससाहेबांना हें सारं दिसत होतं. तिला काय बोलावं कसं रोखावं तें त्यांना कळत नव्हतं. एकदां ते तिला फक्त म्हणाले,

‘ माले, तुझ्या वागण्याचं मला फार आश्चर्य वाटतं. अमृतरावांना आणि त्यांच्या घरांतल्या मंडळींना समाजानं बहिष्कृत केलं आहे. त्यांना माणसांतून उठून जावं लागलं आहे. ’

तिनं उत्तर दिलं, ‘ होय, भेकड माणसांतनं उठून जावं लागलं आहे. पण म्हणूनच ज्यांना थोडी तरी माणुसकीची चाड आहे त्यांनीं आतां त्यांना अधिक जवळ केलं पाहिजे. श्रीरंगाशीं लग्न करण्याचा माझा निश्चय आतां अधिकच दृढ झाला आहे. ’

जस्टिससाहेब यावर कांहीं बोलले नाहींत.

त्यांना आतां मनातून एकच आशा दिसत होती ती ही कीं, श्रीरंगच तिला समजुतीच्या गोष्टी कदाचित् सांगेल, व तिच्याशीं लग्न न करण्याचा हट्ट करील.

त्यांची ही कल्पना अगदींच चुकीची नव्हती.

श्रीरंग आणि मालती एकांतांत असली, कीं, त्यांची प्रेमानं झटापट चाले. श्रीरंगानं हजार गोष्टी सांगाव्या आणि तिनं त्या ऐकू नयेत अशा स्वरुपाचं त्यांचं संभाषण घटकान्‌घटका चाले. अखेर मालती त्याला चिडून म्हणाली,

हें बघ श्रीरंग, तुला शेवटचं सांगतें, हा विषय पुन्हां तुझ्या माझ्यात निघतां कामा नये '

श्रीरंग म्हणाला, ' मीहि तुला शेवटचं सांगतों, कीं मी हा विषय सदा काढीत रहाणार. तुझ्याशीं लग्न करण्यानं मी तुझ्या आयुष्याची नासाडी करीन हें मला स्पष्ट दिसतं आहे. तुझ्या प्रेमाला मी योग्य नाहीं. तूं मला विसरावंस हें सगळयांत चांगलं '

' नाहीं. तें शक्य नाहीं ! '

' माले, तूं असा हट्ट केलास तर मीच कुठें तरी नाहींसा होईन. '

मालती हंसून म्हणाली, ' श्रीरंग, माझ्या प्रेमाची तुला कल्पना नाही म्हणून तूं असं बोलतोस. सातां समुद्रापलिकडे, जगाच्या दुसऱ्या टोकाला जरी तूं गेलास तरी मी पाठोपाठ येईन हें पक्कं लक्षांत ठेव. '

' पण आपल्या लग्नाला तुझे साहेब कधींच परवानगी देणार नाहींत. '

' एक तर त्यांच्या परवानगीसाठीं मी अडून बसणार नाहीं. आणि शिवाय त्याचं माझ्यावर इतकं प्रेम आहे कीं, त्यांची परवानगी मी अखेर मिळवीनच. '

' पण समाज— ? '

मालती हंसली व त्याच्या दोन्ही खांद्यांवर हात ठेवून म्हणाली, ' श्रीरंग, तूं इतर सर्व दृष्टींनीं माझ्याहून फार मोठा आहेस. पण प्रेमाच्या बाबतींत तुला कांहीं कळत नाहीं. अरे, खऱ्या प्रेमाला समाज फार वेळ

विरोध करूं शकत नाहीं. समाज फक्त प्रेमिकांचं सत्व पहात असतो, आणि त्यांनीं तें पटविलं कीं मग आपोआप नम्र होऊन त्यांचीच राधा-कृष्ण-गीतं करून समाज गात असतो. शिवाय, साहेबांची संमति मीं मिळविली कीं, आपण अर्धी लढाई जिंकलीं; अन् ती मी मिळवीन याबद्दल माझी खात्री आहे.

मालतीची ही अपेक्षा खरी ठरली.

अमृतरावांवरील सामाजिक बहिष्काराचं उग्र स्वरूप पाहिल्या-बरोबर मालती घाबरून गेली असती, आपण स्वतः कितीहि पुढारलेलीं मतं प्रतिपादिलीं तरी अखेर आपलं जीवन बहुजनसमाजाच्या संकुचित मताच्या चौकटींतच आपल्याला बसवावं लागतं हें तिनं ओळखलं असतं. बोलून चालून वाळींत पडलेल्या एका कुटुंबांत नांदायला जाणं म्हणजे कांहीं साधी गोष्ट नव्हे असं तिला वाटलं असतं, तर जस्टिसाहेबांना आपला हेतु सफल झाल्याबद्दल आनंद झाला असता; आणि त्या आनंदांत अमृतरावाचं कपट बाहेर काढून समाजाकडून त्याचं पारिपत्य आपण करविलं ते योग्यच केलं असं त्यांना वाटलं असतं. त्यांची सदसद्विवेकबुद्धि शांत राहिली असती. परंतु अमृत-रावांवरच्या बहिष्कारानं मालती किंचितही डगमगून गेली नाहीं. उलट समाजानं श्रीरंगाच्या कुटुंबावर अन्याय केला तेव्हां त्या समाजाच्या स्तुति-निंदेची पर्वा न करता वागण्याचा तिचा निश्चय झालेला दिसत होता. जसजसे दिवस जात होते तसतसं ती श्रीरंगशीं लग्न करणार हें अधिकाधिक स्पष्ट दिसत होतं. या बाबतींत तिच्याशीं वाद करण्याची इच्छा आतां जस्टिससाहेबांना राहिली नव्हती. कारण वाद केव्हां करायचा? ज्याच्याशीं तो करायचा त्या माणसानं पाऊल कुठें टाकायचं तें पक्कं ठरविलं नसेल तेव्हां. मग विचारांची देवघेव होऊं शकते, त्या माणसाला जें दिसलं नसेल तें दाखवितां येत. परंतु मालतीची गोष्ट अशांतली नव्हती. ती जें करणार

होती त्याचे परिणाम स्वत: जस्टिसाहेबांनीं ओळखले नसतील इतके तिनं ओळखले होते. अगदीं उघड्या डोळ्यानीं ती पाऊल टाकणार होती. ज्या तच्या बापानं अगर दुसऱ्या कुणी तरी सांगितल्या तरच तिच्या लक्षांत येणार होत्या अशा कांहीं गोष्टी नव्हत्या. हें एक झालं. दुसरं अस कीं तिच्या लग्नाला जस्टिसाहेबांचा जो विरोध होता त्याला तात्त्विक भूमिका नव्हती. जीं मतं त्यांच्या बुद्धिला पटलेलीं होतीं त्यांचा विचार मनात आला कीं त्याना वाटे मालतीला विरोध करण्याचा आपल्याला हक्क नाहीं. श्रीरंगाशीं लग्न करण्यापासून मालतीला परावृत केलं पाहिज असं जें त्यांना वाटत होतं तें केवळ थोडे जुने संस्कार त्यांच्या मनांत अजून रेंगाळत होते म्हणून, आणि अस्पृश्याशीं लग्न केल्यानें मालती दु:खी होईल अशी भीति त्यांना वाटत होती म्हणून. या भीतीचं त्यांनीं सोंग आणलं नव्हतं, त्यांना ती प्रामाणिकपणानं वाटत होती; व म्हणून तिच्याशीं ते कठोरपणानं वागूं लागले होते. तो कठोरपणा दुष्टाव्याचा नव्हता. मायेच्या पोटीं उत्पन्न झालेला होता. ती सरळ स्वत:चा घात करून घेणार तेव्हां आपण तिचं रक्षण केलं पाहिजे अशा प्रामाणिक भावनेवर आधारलेला होता. एखादं माणूस कड्याखालीं उडी टाकीत आहे असं दिसल्यावर त्याला वाचविण्यासाठीं मागं ओढतांना त्याला धक्का बसेल, त्याचं अंग खरचटेल, कपडे फाटतील असले विचार करतां येत नाहींत. त्याची तंगडी धरून त्याला फरफटत ओढावं लागलं तरी ओढलं पाहिजे असंच त्याचा बचाव करूं पाहणाऱ्याच्या मनांत येतं. जस्टिससाहेबनीं, मालतीशीं विरोध चालविला होता, कडू बोलून तिला ते छेडीत होते, आपल्या पितृत्वाचा अधिकार ते गाजवूं पहात होते, या सगळ्या प्रकारची मीमांसा अशी होती. त्याच्या मागं त्यांच्या मनांतली तिच्याविषयींची दृढ ममता होती, श्रीरंगाशीं लग्न केल्यानें ती सुखी होणार नाहीं ही भावना होती.

परंतु कांहीं झालं तरी जस्टिससाहेब आततायीं अविचारी नव्हते; विचारी होते. ते आंधळे नव्हते. जें दिसेल तें दिसलं म्हणण्याचा प्रामणिकपणा त्यांच्या ठिकाणीं होता. त्यामुळें मालती आपल्या निश्चयापासून ढळत नाहीं हें जेव्हां त्यांना स्पष्ट दिसूं लागलं तेव्हां त्यांची वृत्ति हलकें हलकें पालटूं लागली. ती दुःखी होऊं नये ही एकच त्यांची बळकट इच्छा होती. त्या इच्छेतूनच विरोध, हट्ट, दुराग्रह, नापसंती, धाक, या साऱ्या गोष्टी निर्माण झाल्या होत्या. परंतु हळू हळू त्यांना पुरतं कळून चुकलं, कीं श्रीरंगाशीं लग्न न केल्यानंच मालती भयंकर दुःखी होईल. कोणी कितीहि विरोध केला तरी तिचं व श्रीरंगाचं लग्न टळण्यासारखं नव्हतं......

ही खात्री पटल्याबरोबर त्यांच्या मनांत वेगानं पालट झाला होता. विरोध आणि कठोरपणा गेला, आणि जे संस्कार त्यांना मागं खेचित होते त्यांची ओढहि त्यांना लागेनाशीं झाली. त्यांचं मन सारखं म्हणूं लागलं, तिला श्रीरंगाशीं लग्न करायचं आहे ना, करूं दे. तिचं सुख कशांत आहे तें माझ्या समजुतीनं मी कशासाठीं ठरवावं ? आणि माझ्या समजुतीचा हट्ट मीं कां करावा ? जुन्या नव्या पिढींत सुखदुःखाबद्दलच्या समजुतींत अंतरं असायचींच. मागचा आणि पुढचा हे अंतरवाचकच शब्द आहेत. केवळ त्या अंतरावर चिडण्यांत काय अर्थ आहे ? मालतीचं सुख तिनंच ठरवावं, आणि ज्यांत तिला सुख दिसेल तें तिनं करावं हीच गोष्ट तिच्या कल्याणाची आहे. आणि विरोध न करतां तिला मी माझे आशीर्वाद द्यावेत ही गोष्ट माझ्यासारख्या बापाला शोभण्यासारखी आहे.

जस्टिससाहेबांच्या मनांत हा बदल झाला त्याचा आणखी एक परिणाम घडून आला. मालतीनं त्यांचं म्हणणं ऐकलं असतं, श्रीरंगाचा नाद सोडून दिला असता म्हणजे समाजाकडून अमृतरावाला जी शिक्षा यांनीं घडविली ती योग्यच होती असं त्यांना वाटलं असतं. परंतु आतां त्यांना तसं वाटेना. [साध्य हातीं आलं कीं साधनांच्या युक्तायुक्ततेचा

विचार मनुष्य करीत रहात नाहीं. जें आपल्याला पाहिजे होतं तें मिळालं ना, मग तें मिळविण्यासाठीं ज्या गोष्टी कराव्या लागल्या त्या वावग्या कीं कशाहि असोत, असं म्हणून मनुष्य पुढें चालूं लागतो. परंतु माणसाचा हेतु साधला नाहीं कीं याच्या उलट स्थिति होते. जें हवं होतं तें तर हुकलंच, पण शिवाय त्यासाठीं करूं नयेत अशा गोष्टी मात्र आपल्या हातून घडल्या अशी माणसाच्या मनाला सारखी टोचणी लागून रहाते. या टोचणीचा अनुभव जस्टिससाहेबांना फार तीव्रतेनं येऊं लागला. त्यांच्या मनांत सारखं येई, आपण प्रथमच मालतीच्या लग्नाला संमति दिली असती तर किती बरं झाल असतं. परंतु तो शहाणपणा आपल्याला सुचला नाहीं. मालतीच्या कल्याणासाठीं म्हणून आपण बिचाऱ्या अमृतरावांची मात्र दुर्दशा करून टाकली. तीस वर्षांच्या तपश्चर्येनं त्यानं लौकिक आणि सामाजिक प्रतिष्ठा मिळविली होती ती आपण भलत्या विचारांच्या आहारीं जाऊन एका दिवसांत खुशाल धुळीला मिळविली...छे छे, हें फार मोठं पाप घडलं आपल्या हातून. याचं प्रायश्चित्त आपण घेतलंच पाहिजे . . . आणि तें घेण्याचा एकच मार्ग आहे. मालतीच्या विचाराला संमति द्यावयाची, अमृतरावाशीं सोयरीक जोडायची आणि ज्या सामाजिक विटंबनेत आपण त्याला टाकलं तिचा वांटा आपण उचलायचा !

हे सारे विचार जेव्हां जस्टिससाहेबांच्या मनांत पक्के झाले तेव्हां अहंकाराची खोटी अढी आपोआपच दूर झाली. मालती आपल्याजवळ विषय काढील व मग आपण बोलूं म्हणून वाट पहाण्याची गरज त्यांना भासली नाहीं. ते आपण होऊन तिच्या खोलींत गेले व तिला म्हणाले,

‘ माले, तुझ्या लग्नाला संमति द्यायचं मीं ठरविलं आहे. ’

तिनं त्यांच्याकडे प्रथम आश्चर्यानं पाहिलं. पण मग लगेच ती हंसली.

ते पुढें म्हणाले, ' मी असं ठरविलं आहे, कीं तुला घेऊन अमृत-रावांच्या घरीं जायचं आणि त्यांना म्हणायचं, तुमच्या श्रीरंगाला जांवई करून घेण्यासाठीं मी आलो आहे. '

तें ऐकून मालती त्यांच्याकडे पहातच राहिली. आश्चर्य आणि आनंद या दोन्ही भावना मनांत उत्कट झाल्यामुळें तिची चर्या अगदीं फुलून आल्यासारखीं दिसत होती.

नवीन खरेदी केलेल्या बंगल्यांत आपल्याला हवे तसे फेरफार करून घेण्यांत अमृतराव आणि श्रीरंग गुंतले होते. सुतार, गवंडी, माळी हे लोक बहिष्कारांत सामील झाल्यामुळें त्यांच्या कामावर यायला तयार नव्हते. एक मुसलमान व एक खिस्ती असे दोन साधे मजूर मिळाले त्यांना हाताशीं घेऊन बापलेकांनीं घर दुरुस्तीचं काम चालविलं होतं. जस्टिससाहेबांची मोटार बंगल्याच्या आवारांत शिरलेली पाहून त्यांना आश्चर्य वाटलं. कारण मालती रोज आपल्या सायकलवरून येत असे. गाडीं उभी राहिली व जस्टिससाहेब बाहेर उतरल तेव्हां त्यांचं आश्चर्य आणखी वाढलं. त्यांच्या तोंडून कांहीं उद्गार बाहेर पडला नाहीं, पण काय चमत्कार अशा अर्थी दोघांनीं एकमेकांकडं पाहिलं.

मालतीला घेऊन जस्टिससाहेब बंगल्यांत शिरले ते मोठ्यांदा ओरडतच. " अमृतराव ! अमृतराव ! अरे, तुम्ही आहां कुठें ? "

बापलेक बंगल्याच्या मागच्या बाजूस कामांत होते, ते पुढच्या बाजूस आले. अमृतराव घाइन पावलं टाकीत जस्टिससाहेबांच्या जवळ जातां जातां म्हणाले, " माझे डोळे मला फसवीत तर नाहींत ? हें मीं काय पहातों ? साहेब, तुम्ही खरोखरीच माझ्या घरीं आला आहांत ? तुमचे पाय माझ्या घराला लागले ? वा वा वा ! आज पांडुरंगानं मोठ्या भाग्याचा दिवस दाखविला ! "

त्यांनीं दोन्हीं हातांनीं जस्टिससाहेबांचे हात धरले, आणि मोठ्या आदरानं मेल्याप्रमाणें आंतल्या बाजूस त्यांना नेलं. मधल्या दिवाणखान्यांत पाऊल टाकतांना ते म्हणाले, ' ही जागा आमच्या मनाजोगी करून घेण्याचं काम अजून चाललं आहे. परंतु बसायपुरता दिवाणखाना आतां चांगला झालाय. '

जस्टिससाहेबांना एका मोठ्या कोचावर बसवून ते त्यांच्या डाव्या बाजूस बसले.

तितक्यांत श्रीरंग व मालती मागोमाग येत होती तीं आंत येऊन पोहोचलीं. श्रीरंगानं दोन बटनं दाबलीं. दिवाणखान्यांत एकदम उजडच उजेड झाला.

सारीजणं बसल्यावर अमृतराव पुन्हा उद्गारूं लागले, ' साहेब, तुह्मी आपण होऊन माझ्या घरीं आला ! माझं इतकं भाग्य उघडलं ? मला हें खरेंच वाटत नाहीं !

जस्टिससाहेब म्हणाले, ' अमृतराव, तुम्हांला अत्यंत आश्चर्य वाटावं हें साहजिक आहे. मीच तुमची जगात नाचक्की केली, आणि आज मीच तुमच्या घरीं आलो आहे. हें खरं वाटण्यासारखं नाहीं, पण खरं आहे. या मालतीसाठीं मी तुमच्याशीं वर कंल. पण आता हिच्यासाठींच तुमच्या दारांत मी याचक म्हणून आलों आहे. तुम्हांला माझा रागच नव्हे तर तिरस्कार जरी वाटला तरी तो वावगा ह्मणतां येणार नाहीं. परंतु पूर्वी झालं गेलं तें विसरा असं सांगण्यासाठींच आणखी एक मागणं मागण्यासाठीं मी तुमच्याकडे आलों आहें. '

अमृतराव म्हणाले, ' हें कसं बोलणं साहेब ? मी समाजाशीं कपट केलं तो माझा अपराध विसरून पुन्हां माझ्याकडे येऊन ही जागा तुम्हीं पवित्र केलीत, आह्मांला धीर दिलात याबद्दल मी उतराई कसा होऊं तें मला कळेना. आणि तुमचं असं कसं उलट बोलणं ? तुह्मी माझ्याजवळ

मागणं मागावं असं मज गरिबाजवळ काय आहे ? तुमची कोणची इच्छा पुरी करतां येईल सांगा ? '

जस्टिससाहेब श्रीरंग व मालती यांच्याकडे बोट दाखवून म्हणाले, ' या दोघानीं कांहीं एक गोष्ट ठरविली आहे. ती तुम्हांला माहीत आहे काय ?

अमृतराव ह्मणाले, ' या दोघांनीं ? ती काय बुवा ? '

' बरोबर आहे. तुम्हांला माहीत नाहीं, मला ठाऊक आहे. माझी संमति मिळाल्यावरच तुम्हांला ती कळवावयाची असं या दोघांनीं ठरविलेलं आहे. आणि यांनीं तुम्हांला कळविण्यापेक्षां मी कळविलेली अधिक चांगली म्हणून मी या मालतीला घेऊन तुमच्याकडे आलो आहे. त्यासाठींच मी म्हटलं, कीं याचक म्हणून मी तुमच्याकडे आलों आहे.

' साहेब, तुमच्या बोलण्याचा अर्थ मला नीट कळना. '

जस्टिससाहेब म्हणाले, ' अमृतराव, तुमच्या या श्रीरंगाला जांवई करून घ्यायचं ठरविलं आहे मी. आणि माझ्या या विचाराला तुमची संमति असावी म्हणून विनंति करण्यासाठीं म्हणून मी मुद्दाम आलों आहे.'

तें ऐकून अमृतराव चटकन् हो म्हणतील अशी त्यांची व श्रीरंग आणि मालती याचीहि कल्पना होती. मालती व श्रीरंग यांनीं आपल्या विवाहाचा बेत अजूनपर्यंत अमृतरावांना सांगितला नव्हता. तो अशाच विचारानं कीं, त्यांची अनुमति सहज मिळेल अशाच कल्पनेनं: मुख्य प्रश्न होता तो जस्टिससाहेबांच्या रुकाराचा. तो मिळाला कीं, मग अमृतरावांची परवानगी विचारणं ही गोष्ट काय एका मिनिटांत आटपणाऱ्या विधीसारखी होती. त्यामुळें जस्टिससाहेबाचं बोलणं ऐकून अमृतराव कदाचित् किंचित्सं आश्चर्य दाखवितील. परंतु लगेच रुकार देऊन आपल्याकडे पहातील व ' अरे लबाडांनों, असं गुपित केलं होतंत काय ? '

अशी कांहीं तरी मस्करी करतील, असं श्रीरंग व मालती यांना वाटलं होतं. या कारणानं अमृतरावांची मुद्रा जेव्हां गंभीर झाली व त्यांच्या चेहऱ्यावरील आश्चर्यांत सुखापेक्षां दुःखाची दाट छटा दिसली तेव्हां श्रीरंग आणि मालती चपापली. जस्टिससाहेबहि अमृतरावांकडे अधीर आश्चर्यानं पहात राहिले. अमृतराव बोलूं लागले, ' साहेब, तुम्ही माझ्या घरीं आला तेव्हां माझ्या डोळयांवर माझा विश्वास बसेना, पण अंतःकरण आनंदानें भरून आलं होतं. आतां जी गोष्ट तुम्ही बोललांत ती ऐकतांना माझ्या कानांवर माझा विश्वास बसत नाहीं, आणि अंतःकरणाचे तुकडे तुकडे होत आहेत. '

यांचं हें काय अपशकुनी बोलणं अशा अर्थानं श्रीरंग व मालती यांनीं एकमेकांकडे पाहिलं. जस्टिससाहेबांनीं अमृतरावांकडे रोखून पाहून विचारलं, ' म्हणजे, तुम्हीं असं काय बोलतां ? '

परंतु त्यांच्या त्या प्रश्नाकडे अमृतरावांचं लक्ष मुळीच नव्हतं. जबरदस्त प्रहारानं निश्चेष्ट झालेल्या माणसाप्रमाणं ते कांहीं वेळ बसले. मग भानावर आल्याप्रमाणें त्यांची चर्या झाली. त्यांच्यासमोर बसलेल्या त्या तिघांकडे त्यांनीं भ्रमिष्टासारखं पाहिलं, आणि कपाळावर हात मारून घेऊन ते पुटपुटले,

' पांडुरंग ! हें घडण्यापूर्वीं माझे डोळे कायमचे कां मिटले नाहींस ? '

जस्टिससाहेब म्हणाले, ' अमृतराव, हें काय ? '

' काय सांगूं कपाळ ! तुम्हीं श्रीरंगाला आपला जांवई करून घ्यायचं म्हणतां पण तें कालत्रयीं शक्य नाहीं. माझा प्राण घेतलात तरी या गोष्टीला मी संमति देणार नाहीं. '

जस्टिससाहेब म्हणाले, ' हा मोठा चमत्कार म्हणायचा. अमृतराव, या लग्नाला मीं प्रथम हरकत घेतली. परंतु लग्न केल्यानंच हीं दोन्हीं

मुलं सुखी होतील अशी आतां माझी खात्री झाली म्हणूनच मी तुमच्याकडे आलों. आतां मी मराठा आणि तुह्मी अस्पृश्य या जातिभेदाची अडचण मानायचं कारण उरलंच कुठें ? कांहीं झालं तरी श्रीरंग तुमचा मुलगा ना ? हिंदुच ना ? तुह्मीच आतां—

अमृतराव ह्मणाले, ‘ नाहीं साहेब. श्रीरंग माझा मुलगा नाहीं आणि श्रीरंग हिंदुहि नाहीं ! ’

तें ऐकतांच संपतराव, श्रीरंग आणि मालती तिघांच्याही तोंडून ‘ काय ? ’ असा उद्गार एकदम निघाला. श्रीरंग आपल्या जागेवरून एक-दम उठला आणि अमृतरावांच्या जवळ जाऊन त्यांना बिलगला.

त्याच्या मस्तकावरून हलकेच हात फिरवीत अमृतराव ह्मणाले, ‘ बाळ, तूं माझा मुलगा नाहींस. आणि तूं हिंदुही नाहींस. आज तीस वर्षे माझी मी जात मी लपविली. परंतु जणूं हें एक कपट पुरेसे नव्हतं ह्मणून याहूनहि अधिक विलक्षण असं दुसरं कपट मीं केलेलं आहे. श्रीरंग, तुझ्या जन्माचं रहस्य आजपर्यंत मीं लपविलं. पण आतां सत्य सांगायची वेळ आली. तूं माझा मुलगा नाहींस. तूं हिंदु नाहींस. ’

श्रीरंग त्यांना घट्ट धरून म्हणाला, ‘ काय म्हणता ? मी तुमचा मुलगा नाहीं ? छे छे, मी तुमचाच मुलगा आहे ! बाबा, सत्य निराळं असलं तरी तें सांगूं नका. तुमच्या अन्नावर मी लहानाचा मोठा झालो. तुम्ही मला सदाचार शिकविलात. धर्मतत्वाचं बाळकडू तुम्ही मला पाजलंत. तुमच्या प्रेमाच्या सावलींत वाढून मी शिकलोसवरलों, शहाणा झालों. माझ्या शहाणपणाचं तुम्ही कौतुक केलंत. तुमच्यासारख्या पित्याच्या पोटीं मी आलो याचा मीं सतत केवढा तरी अभिमान वाहिला आणि आतां म्हणतां मीं तुमचा मुलगा नाहीं ? बाबा, मी तुमचाच मुलगा आहे. या भावनेला धक्का देणारा एक शब्दहि मला ऐकवणार नाहीं. सत्य कांहींहि असलं तरी आजपर्यंत तें गुप्त ठेवलंत तसंच यापुढेंहि ठेवा. ’

अमृतराव म्हणाले, ' नाहीं ! श्रीरंग, सत्याला भिऊन तें दिसूं नये म्हणून डोळे झांकण्याचा हा क्षण नाहीं. तूं, मी, मालती, साहेब सर्वांनींच यावेळीं सत्याकडे निर्भय दृष्टीनं पाहिलं पाहिजे. तूं माझा पुत्र या भावनेचं जें सुख मीं आजपर्यंत अनुभविलं तें फार मोठं होतं. त्यावर पाणी सोड-तांना मला ज्या यातना होतात त्यांचं शब्दांनीं वर्णन करणं शक्य नाहीं. परंतु त्या मला सोसल्या पाहिजेत. आतां मला सत्य सांगून टाकलं पाहिजे. श्रीरंग, तूं माझा मुलगा नाहींस ! आणि तूं हिंदुही नाहींस ! साहेब माझ्या आयुष्यांतली एक विलक्षण घटना मी सांगतों ती ऐका. '

—o—

# ११

' सरहद्दीवरच्या एका फार मोठ्या लष्करी बांधकामाचं कॉन्ट्रॅक्ट मिळवून मी तिकडे गेलों तेव्हां ऐन जवानींत होतों. स्वदेश सोडून दूर जाण्याचं दुःख मला होत होतं. पण धंद्यांत मोका मिळाला आणि आतां पैसा खूप मिळवितां येईल या कल्पनेच्या आनंदांत तें मी सहज विसरूं शकलों. शिवाय ज्या मुलखांत रहायला गेलों तो परका असला तरी रमणीय होता. खायला प्यायला मुबलक, लोक जसे दांडगे तसे उमद्या अंतःकरणाचेहि, आणि निसर्गशोभा हवी तेवढी. ज्या छोट्याशा शहरात मी राहूं लागलो-शहर कसलं, कँपच म्हणानात—तें तर निसर्गाच्या सौंदर्यानं नुसतं फुललेलं होतं. खूप कष्ट करावे, खूप खावं प्यावं, पैसा खोऱ्यानं ओढावा, अशा आयुष्यक्रमांत मी सहज रंगून गेलों. रखमा मात्र माझ्यासारखी तिकडे रमेना. कामानिमित्त मला फार बाहेर रहावं लागे, आणि ती घरांत एकटी असे. त्या मुलखांत सुरक्षितपणा फार कमी. चोऱ्यामाऱ्या नेहमीं चालायच्या. कधीं कधीं मोठाले डाक पडायचे, चार अत्यंत विश्वासू नोकर मीं घरीं ठेवले होते. पण रखमा सदा भयभीत जीव मुठींत धरून राहिल्यासारखी असायची. जन्मभूमीच्या आठवणी तिला सारख्या व्हायच्या. ती मला म्हणे, ' तुम्हीं येवढे विठ्ठलाचे भक्त. तुमची पंढरी कुठें

राहिली आणि इकडे कुठें तुम्हीं येऊन बसलांत ? पैशाचा एवढा हव्यास कुठून आला तुम्हांला ? ' तिचं तें बोलणं मी फारसं मनावर घेत नसे. माझी जात बदलून मराठा म्हणून मी राहूं लागलों होतों. पांचपंचवीस वर्षे अशींच दूर काढून नंतर माझ्या जन्मभूमीकडे मी परत जाणार होतों. त्यासाठी खूर खूर श्रीमंत होण्याची माझी इच्छा होती. गरिबाना गुन्हे माफ नसतात, श्रीमंतांना ते माफ असतात. पैशाचा आवाज झाला कीं कोणी शंकाकुशंका काढीत नाहींत. समाज श्रीमंतीनं दिपून जातो. श्रीमंती ही एकच पैसेवाल्यांची जात आहे. नदीचं मूळ व ऋषीचं कूळ याप्रमाणेंच श्रीमंतांच्या पूर्वजीवनाची चौकशी समाज करीत नाहीं. जन्मभूमीकडे परत जाऊन उच्चवर्णीय हिंदू म्हणून राहण्याची माझी इच्छा मला पुरी करायची असेल तर पैसा खूप मिळविला पाहिजे असं मला वाटूं लागलं होतं. पांडुरंगाचं नामस्मरण काय कुठेंहि करतां येतं. पंढरी आपल्या घरांत आणतां येते. असे माझे विचार होते, परंतु ते रखमाला पटतील अशी मला खात्री वाटत नसे. म्हणून तिचं बोलणं मनांवर न घेतां मी हंसण्यावारी नेत असे. मनाला मात्र वाटे कीं, बिचारी कष्टी आहे, तिनं असमाधानांत असावं याचं आणखी एक कारण असं होतं कीं आम्हांला अजून मूल झालं नव्हतं. या साऱ्या गोष्टी मला समजत होत्या. माझ्याकडून शक्य तेवढा धीर मी नेहमीं देत असे. पैशाला तोटा नव्हता. श्रीमंती थाटानं मी घर सजविलं होतं. बायकोच्या सुखांत मी इतर कोणती उणीव अशी राहूं दिली नव्हती. ती अंतर्यामीं कष्टी असे. परंतु तेवढी गोष्ट सोडली तर ती आनंदांत असे. आमचे दिवस फार उत्तम रीतीनं चालले होते.

आमच्या या आनंदी जीवनक्रमांत एके दिवशीं मोठीच खळबळ उडाली. रात्रीं गांवावर हूर लोकांचा डाका पडला. त्या लोकांनीं लूटमार आणि जाळपोळ आरंभिली. सशस्त्र पोलीस आमच्या मदतीला आले. आमच्यापैकीं जो तो शस्त्र घेऊन गांवावरचं संकट परतविण्यासाठीं घरा

बाहेर पडला. मोठी चकमक उडाली. असा डाका कित्येक वर्षांत पडला नव्हता. हूरांच्या टोळीपैकीं बहुतेक लोक हातीं येईल तेवढी लूट घेऊन पळून गेले. परंतु कांहीं घरांघरांतून लपून बसले असतील अशा शंकेनं त्यांना शोधून काढण्याचं काम आम्हीं आरंभिलं. मी ज्या घरांत शिरलों तें एका धनाढ्य माणसाचं घर होतं. अरबस्थानांतून इकडे आलेला तो एक मोठा व्यापारी होता. घरांत पहातों तो सारे नोकर पळून गेले होते. तो व्यापारी मारला गेला होता. त्याच्या बायकोला प्राणांतिक जखम झाली होती. ती नुकतीच बाळंत झाली होती. तिनं आपलं तें नुकतंच जन्मलेलं बाळ माझ्या ओटींत घातलं. ती आपल्या भाषेंत कांहींसं बोलली. पण मला तें समजलं नाहीं. थोड्याच वेळांत तिनं प्राण सोडला. मी त्या मुलाला घेऊन घरीं आलों. आपलाच मुलगा म्हणून त्या मुलाला वाढविण्याचं मीं आणि माझ्या बायकोनं ठरविलं. कृष्णाष्टमीची मध्यरात्र होती ती. म्हणून आम्ही त्याचं नांव श्रीरंग असं ठेवलं. पुढें दोन वर्षांनीं पहिलं महायुद्ध संपलं. लष्करी कंत्राटाचं काम आतां राहिलं नव्हतं. म्हणून मी कराचीला गेलों आणि माझा धंदा सुरूं केला. तिथें हा श्रीरंग लहानाचा मोठा झाला. याच्या जन्माचं रहस्य हें असं आहे. हा जन्मानं हिंदु नाहीं. अरब आईबापांचा हा मुलगा आहे !'

ही हकीगत ऐकून सगळीच मंडळी पुतळ्याप्रमाणें स्तब्ध राहिली. काय बोलावं तें कोणालाच समजेना. अखेर ती शांतता मोडून अमृतरावच पुढें म्हणाले,

' हा श्रीरंग जसजसा मोठा होऊं लागला तसतशी माझ्या मनाची अवस्था मोठी विचित्र होऊं लागली. त्याचं असामान्य रूप आणि त्याचे गुण विकास पावतांना पाहून एकीकडे मनाला मोठा हर्ष होत असे, परंतु दुसरीकडे मनाची सारखी टोचणी चालत असे, कीं या मुलाचं जन्मरहस्य तूं लपवलंस ही मोठी चूक तर झाली नाहीं ? पुढें हा कॉलेजांत

गेला, गभीर विषयांचा अभ्यास करूं लागला, हिंदुधर्माचा प्रखर अभिमान याच्या ठिकाणीं वाढत चाललेला दिसूं लागला, तेव्हां तर मनाचा मोठा गोंधळ उडे. वाटे, सत्य लपविण्याचा मला अधिकार आहे काय ! आणि तें मला शेवटपर्यंत लपवितां येईल काय ? त्याच्या जन्माची खरी हकीगत त्याला एकदां सांगून टाकणं माझं खरं कर्तव्य नाहीं काय ? ' श्रीरंग, तूं माझा मुलगा नाहींस ' असे शब्द अनेकवेळां माझ्या अगदीं ओठापर्यंत येत. परंतु पुन्हां वाटे त्याच्या मर्मावर हा आघात केलाच पाहिजे, काय नको ! जाऊं देत आणखी कांहीं दिवस. कदाचित् त्याच्या जन्माचं रहस्य उघड करण्याची वेळ येण्याच्या आधींच माझा पांडुरंग मला आपल्या पायांपाशीं नेईल अशा प्रकारें दुबळेपणानं मी माझं कर्तव्य नेहमीं पुढें ढकलीत आलों. पण साहेब, आतां तुम्हीं या दोघांचं लग्न करून द्यायचं म्हणतां तेव्हां माझ्यानं गप्प बसविणं शक्य नाहीं. या लग्नाला मी कधींच संमति देणार नाहीं. या लग्नानं कुणाचंहि कल्याण होणार नाहीं ? धर्म मात्र भ्रष्ट होईल ! माझा, तुमचा, हिचा, याचा, सर्वांचा !'

आतां परिस्थितींत पुन्हा उलटापालट झाली. श्रीरंग अस्पृश्य कुळांतला आहे या विचाराचा धक्का आतांच्या धक्क्याहून निराळा होता तो धक्का असा होता कीं त्यांतून स्वतःला सांवरण्यासारखा विचार जस्टिससाहेबांना सुचणं शक्य होतं. श्रीरंग अंत्यज असला तरी हिंदुच आहे ही कल्पना मनावेगळी करतां येण्याजोगी नव्हती, व जस्टिससाहेबांचं शिक्षण आणि त्यांचं उदार मत यांच्या अनुकूलतेमुळें ती कल्पना उशीरा का होईना पण प्रभावी ठरणं अपरिहार्य होतं. आपला पहिला सारा विरोध टाकून देऊन मालतीच्या लग्नाला जस्टिससाहेबांनीं मोठ्या आनंदानं संमति दिली होती. विरोध संपला त्याबरोबर पोटच्या लेकीबद्दलचं प्रेम आणि अमृतरावासारख्या मित्राबद्दलची सहानुभूति एखाद्या थोपवून धर-

लेल्या परंतु आतां मोकळ्या झालेल्या लाटेप्रमाणें त्यांच्या अंतःकरणांत उचंबळून आली होती, व त्या भरांत ते मालतीला घेऊन अमृतरावांकडे गेले होते.

परंतु आतां त्यांच्या मनाला जोराचा उलट झोका मिळाला होता. श्रीरंग अरब आईबापांच्या पोटचा मुलगा आहे हें कळल्यामुळें त्यांना जो धक्का बसला तों इतका मोठा होता, कीं धरणीकंपानं घर हादरून नीट मांडून ठेवलेल्या साऱ्या वस्तू गडगडाव्या त्याप्रमाणें जस्टिससाहेबांचीं उदार मतं, शिक्षणानं त्यांच्या ठिकाणीं उत्पन्न झालेले व्यापक विचार, लेकीबद्दलचं प्रेम इत्यादि सगळ्या गोष्टी पार उलथ्यापालथ्या झाल्या. मनांतून नष्ट झालेला विरोध आतां दुप्पट जोर धरून पुन्हां प्रगट झाला. आपण ममतेच्या आहारीं जाऊन केवढी भलती गोष्ट करीत होतो, आपण चांगलेच फसत होतो, धर्मभ्रष्ट होत होतों, मुलीचा व आपल्या कुळाचा सत्यानाश करीत होतो, आपलं नशीब मोटं म्हणून तो धात टळला अशा विचारांनी त्यांना चीड आली. आता मालतीचं हें लग्न काहीं झालं तरी होऊं देतां कामा नयेच असा त्यांचा निश्चय झाला. मालतींला त्यानीं तसं स्पष्ट बजावलं.

अमृतरावही श्रीरंगाला याप्रमाणेंच बजावून सांगूं लागले, कीं त्यानं मालतीशी लग्न करावं या गोष्टीला त्यांची संमति मिळणं शक्यच नाहीं. हें लग्न सर्वस्वी निषेधार्ह होतं. धर्मभ्रष्ट करून केलेलं लग्न कुणाच्याहि दृष्टीनं सुखाच ठरण्यासारखं नव्हतं.

अमृतरावाचं तें बोलेणं ऐकून श्रीरंगाला प्रथम वाटलं, कांहीं बोलूंच नये. कारण बोलण्यांत, वाद करण्यांत काय अर्थ होता ?

त्या दिवशीं रात्रीं स्वतःच्या जन्माची खरी हकीगत अमृतरावांच्या तोंडून त्यानं ऐकली त्या वेळेस प्रथम त्याच्या मनांत एकदम जो विचार आला होता तो हा, कीं आतां मात्र माझ्याशीं

लग्न करण्याचा मालतीचा निश्चय टिकणं फार कठीण. तिच्या स्वभावांतला करार असामान्य होता, तिचं प्रेम अमर्याद होतं; परंतु असा करार अन् असं प्रेम लटपटावं अशीच भलत्याच कसोटीची वेळ तिच्यावर आली होती. त्या कसोटीला ती उतरेल कीं न उतरेल हा प्रश्न त्याच्या मनांत येण्याच्या आधीं त्याला वाटलं, अरेरे, दैव किती निष्ठुरपणानं हिचं सत्त्व पहात आहे. कोणत्या वाईट वेळेस हिची माझी आयुष्यांत भेट झाली... तिच्याविषयींच्या अनुकंपेनं त्याचं हृदय अगदीं कांठोकांठ भरून आलं. तो स्वतःशीं म्हणाला ‘ अरेरे, गरीब बिचारी ! ’ इतक्या कठीण कसोटीला ती उतरली नाहीं तर तिला दोष देणं शक्य होतं काय ? मुळींच नव्हतं. श्रीरंगाच्या मनांत आलं, तिची सत्त्वपरीक्षा होण्यापूर्वीं आपणच तिला स्वच्छ सांगितलं पाहिजे, कीं आतां माझा विचार बदलला आहे, मला तुझ्याशीं लग्न करायचं नाहीं. तुझ्या जन्माचा सोबती म्हणून तूं मला पत्करावंस अशी माझी योग्यता नाहीं. मी तुझ्याशीं लग्न करू शकत नाहीं. तूं माझ्यापासून दूर व्हावंस आणि मला विसरावंस हें चांगलं. तूं तसं केलं नाहींस तर मी करीन. माझ्या प्रेमाचा तुला मोह वाटूं नये यासाठीं मीच कुठ तरीं दूर निघून जाईन—नाहीसा होईन...

त्याच्या मनांत आलं, दुर्दैवाचा कसा दुहेरी खेळ पहा. गुलशनचं प्रेम त्याला कोणत्या कारणासाठीं दूर लोटावं लागलं होतं, तर ती मुसलमान होती आणि आपला बाप भगवद्भक्त आहे अशी त्याची समजूत होती म्हणून ! गुलशनशीं लग्न केल्यानं आपल्या बापाच्या अंतःकरणाला पराकाष्ठेच्या वेदना होतील, त्यांच्या तीस वर्षांच्या भक्तिमार्गी तपश्चर्येला व निष्ठायुक्त धर्माचरणाला आपल्या हातून कलंक लागेल, आपल्या कटुंबांत अत्यंत मोलाची गोष्ट म्हणून ज्या परंपरेचं दीर्घकाल रक्षण करण्यांत आलं तिची मोडतोड आपल्या हातून होईल हें त्याला स्पष्ट दिसलं. म्हणून अंतःकरण कठोर करून त्यानं गुलशनला खुशाल दूर लोटलं होतं, आणि तीहि

आतां या मर्त्य जगाच्या पलीकडे निघून गेली होती ! ती मुसलमान होती आणि तो अमृतरावासारख्या भागवतधर्मीय माणसाचा मुलगा होता म्हणून त्याचं व गुलशनचं लग्न अशक्य झालं होतं. तेव्हां तिचा धर्म प्रेमसाफल्याच्या आड आला होता ! आणि आता त्याचा धर्म आड आला होता ! पूर्वीं स्वतःच्या कुटुंबाच्या प्रखर हिंदु धर्मनिष्ठेला गुलशनचा बळी देणं त्याला भाग पडलं होतं; आतां यवनकुळांतला त्याचा जन्म त्याच्या प्रेमाचा बळी घेत होता ! एकदां तसा घात झाला होता, आतां असा घात होत होता ! दुर्दैवानं कसा दुहेरी डाव टाकला होता पहा...परंतु या दुर्दैवापुढें इलाज नव्हता. मालतीच्या प्रेमाची भलती कसोटी पाहिली जावी अशी त्याची इच्छा नव्हती. त्या कसोटींतून त्यानंच तिला आपण होऊन मुक्त करायला हवं होतं...

मनांतले हे विचार त्यानं जेव्हां मालतीजवळ बोलून दाखविले तेव्हां ती गंभीरपणानं म्हणाली, "झालं तुझं बोलणं ? ठीक. आतां माझं ऐक. कारण अमृतरावांच्या तोंडून तुझ्या जन्माची गोष्ट ऐकल्यानंतर मीसुद्धां माझ्या मनाशीं कांहीं कमी विचार केला नाहीं. माझं अंतःकरण मीं अगदीं कसून तपासून पाहिलं. तुझ्याशीं लग्न करण्याचा विचार मीं बदलावा अशा कल्पनेचा वास देखील मला आला नाहीं. तूं अस्पृश्य कुळांतला आहेस हें समजल्यावर माझ्या अंतःकरणांतलं प्रेम जसं दृढ राहिलं होतं, तसंच तें आताहि दृढ असलेलं मला दिसलं. मला तूं हवास अन् तूंच हवास–अशीच माझ्या हृदयाची साक्ष मिळाली. तुझा जन्मसिद्ध धर्म मी ज्या धर्मांत जन्मले त्याहून निराळा असला तरी त्या निराळेपणाशीं मला काय करायचं आहे ? साऱ्या प्रेमिकांचा एकच धर्म आहे ! प्रेम ! माझा धर्म हा आहे ! तुझाहि तोच आहे. लौकिक दृष्टीच्या, सामाजिक रोषाच्या गोष्टी तूं मला सांगूं नकोस. तुझं कुटुंब बहिष्कृत झालं म्हणून मीं गडबडलें काय ? माझ्या निश्चयापासून ढळलें काय ? तुलं

सुखी करणं, ज काहीं माझ्याजवळ आहे तें तुझ्या पायाशीं ठेवणं येवढाच माझा धर्म मला समजतो. त्या धर्मापासून मी विचलित झालें नाहीं. कदापि होणार नाहीं. वेडेपणा करून मला दूर लोटलींस तर मात्र माझे प्राण जातील हें लक्षांत ठेव ! '

तिचं तें बोलणं ऐकतां ऐकतां श्रीरंगाच्या मनात आलं, या मालतीच्या प्रेमाला कांहीं मर्यादा नाहींच काय? . . . अशा असामान्य वीराच्या मुलीला मी काय शिकविणार ? . . .

लग्नाच्या निश्चयापासून तिला परावृत्त करण्याचे विचार मग सोडून देणं त्याला भाग होतं तिच्या दृढतेची परीक्षा दैवानं घेतली होती तेवढी पुरे होती. तिच्या प्रेमाची वेल किती दृढमूल आहे तें पहाण्यासाठीं त्यानं ती गदगदा हालवावी हा भलताच जुलूम होणार होता. तिच्या प्रेमाचा असा छळ करण्याची दुष्ट कल्पना त्याला शोभण्यासारखी नव्हती. त्याला ती प्राणाहून प्रिय होती.

' तूं मालतीशीं लग्न करता कामा नये ' असं अमृतराव त्याला प्रथम म्हणाले तेव्हां त्यानं कांहीं उत्तर दिलं नव्हतं. कारण त्यांच्या हरकतीसाठीं नव्हे तर मालतीच्या हितासाठीं स्वयंस्फूर्तीनं लग्नाचा विचार सोडून देण्याचा बेत तो करीत होता. परंतु मालतीचा स्वतःचा निश्चय अढळ असल्याचं जेव्हां त्याला कळलं आणि त्यामुळें त्याचा स्वतःचाच विचार जेव्हां पालटला त्यानंतर मात्र अमृतरावांना आपल्या मनांतल्या गोष्टी सांगून टाकाव्या असं त्याला वाटूं लागलं. तो त्यांना म्हणाला,

' बाबा ! मी तुमचा पुत्र आहे ही माझी भावना कायम आहे म्हणून मी तुम्हाला पूर्वीसारखीच हांक मारणार. बाबा ! तुमचा शब्द मला पित्याच्या आज्ञेप्रमाणं अजूनहि वाटतो. तुम्ही पूर्वीसारखेच मला वंद्य आहांत. पण तुम्ही चुकत असाल तर तेंही मला स्पष्ट सांगितलं पाहिजे.

समजुतीच्या कोतेपणामुळें तुम्हीं अन्यायाची आज्ञा करीत असाल तर तसं मला सांगितलं पाहिजे. माझ्या आणखी मालतीच्या लग्नाला तुमची संमति मिळणार नाहीं असं तुम्ही कां म्हणतां ? '

अमृतराव म्हणाले, ' या लग्नामुळें धर्माचा घात होईल म्हणून. '

' कोणत्या धर्माचा ? '

' कोणत्या धर्माचा ? माझ्या हिंदुधर्माचा ! '

' बाबा, मला क्षमा करा. पण धर्माच्या खऱ्या स्वरूपाबद्दल तुम्हीं कधीं नीट विचार केला नाहीं. तसा विचार करण्याची वेळ परिस्थितीनं कधीं आणली नाहीं म्हणून तुम्ही केला नाहीं असं असेल. पण केला नाहीं येवढं खरं. बाबा, धर्म म्हणजे काय? तर ज्या परमतत्त्वाला आपण देव, परमेश्वर, विठ्ठल, पांडुरंग अशी नांव देतों त्याच्याशीं माणसानं कोणत्या प्रकारचा संबंध ठेवावा हें जो शिकवितो तो धर्म. चराचर सृष्टीशी मनुष्यानं कोणत्या प्रकारचे संबंध ठेवावे हें विज्ञानशास्त्र शिकविते. त्याप्रमाणें साऱ्या विश्वाचं जें आदितत्त्व त्याला ओळखायला आणि त्याच्याशीं योग्य असा संबंध जोडायला जें शास्त्र शिकवितं तें धर्मशास्त्र. व्यक्तीचं जीवन मर्यादित आहे. त्याहून मोठं कुटुंबाचं जीवन आहे. त्याहूनहि मोठं राष्ट्राचं जीवन आहे. त्याहूनहीं विस्तृत एकंदर मानव-समाजाचं जीवन आहे. एकाहून एक अधिक व्यापक आणि मोठी अशी जीं हीं जीवनं आहेत त्यापकीं प्रत्येकाशीं व्यक्तीचा संबंध जडायलाच पाहिजे असतो. आणि त्याच न्यायानं जें कांहीं अनादि अनंत असं आहे त्याच्याशीं देखील व्यक्तीचा संबंध जडलाच पाहिजे. त्याखेरीज व्यक्तीच्या जीवनाला पूर्णत्व येणार नाहीं. म्हणून त्या अनंता-कडे पोहोचण्यासाठीं प्रत्येक व्यक्ती तळमळत असते. कुणी जाणतेपणीं, कुणी अजाणतेपणीं, कुणी लवकर, कुणी उशीरा, कणी सतत, कुणी कधीं मधीं. परंतु ही ओढ प्रत्येकाच्या अंतःकरणांत आहे. त्या ओढीमुळें प्रत्येक-

जण वाट शोधीत असतो, आणि कुणी वाटाड्या मिळेल काय अशी चव-कशी करीत असतो. जे अधिकारी मार्गदर्शक होऊन गेले त्यांना आपण धर्मसंस्थापक अस म्हणतों. या थोर लोकांनीं दाखविलेल्या वाटा एकाच ठिकाणीं जाऊन पोहोचतात. त्यांचा प्रारंभ भिन्न भिन्न ठिकाणांहून झाला आहे इतकंच. जगांत भिन्न भिन्न धर्म आहेत याचा अर्थ येवढाच. परम-तत्त्वाकडे जाणारे वाटसरू कुणी आर्यभूमींतून निघाले, कुणी पॅलेस्टाइन-मधून वाट चालूं लागले, कुणी आणखी कुठून तरी. यांच्यात भिन्नता निर्माण झाली ती धर्मापेक्षां निराळ्या कारणांनीं. हजारो वारकरी पंढरीला जातात त्यांतले कुणी साताऱ्याहून निघालेले असतात, कुणी जुन्नरहून, कुणी खानदेशातून; आणि ते अभिमानानें सांगतातही कीं आम्हीं कोंकणचे, आम्हीं मावळचे, आम्हीं खानदेशांतले, आम्ही वऱ्हाडांतले. परंतु या स्थल-वाचक भेदांची कांहीं मातबरी असते काय ? नसते. आजचा मुसलमान, आजचा ख्रिस्ती, आजचा हिंदु, यांच्यांतले भेद असेच तत्वतः फक्त स्थलवाचक आहेत. बाबा, मी काय म्हणतों तें नीट ऐकताहात ना ? '

अमृतरावांनीं डोळे मिटले होते म्हणून श्रीरंगानं तो प्रश्न केला होता. डोळे तसेंच मिटलेले ठेवून ते म्हणाले,

' ऐकतों आहे. तूं फार सुंदर बोलतो आहेस. बोल, पुढें बोल. माझं लक्ष आहे.'

श्रीरंग म्हणाला, ' बाबा, एक व्यक्ति हिंदुस्थानांत हिंदू आईबापाच्या पोटीं जन्मली आणि दुसरी दूर देशांत अरब आईबापांच्या पोटीं जन्मली येवढ्या एकाच योगायोगामुळें त्यांच्या लग्नानं धर्मसंकर होईल असं कसं मानतां येईल ? आधीं मुळीं धर्मसंकर या शब्दाचा अर्थच मला कळत नाहीं. कारण मघांशीं जों सांगितला तेवढाच धर्माचा अर्थ आहे. सारे धर्म एकच म्हटल्यावर धर्मसंकर या शब्दाला कांहीं अर्थ उरला आहे काय ? माझ्या कुटुंबाच्या कित्येक पिढ्या महंमदानं दाखविलेल्या वाटेनं

गेल्या, आणि मालतीच्या कित्येक पूर्वजांनीं वैदिक धर्मानुसार वाटचाल केली, येवढ्या एकाच कारणानं माझा आणि मालतीचा विवाह भ्रष्टाकार कसा ठरतो ? आज आपल्या देशात अनेक राजकीय पक्ष आहेत. कुणी कॉंग्रेसचा कट्टा अभिमानी आहे , कुणी मवाळ पक्षांतला आहे. पूर्वी वैदिक कालांत ज्या ऋषीजवळ वेदाध्ययन केलं त्याचा अभिमान सतत धरण्याच्या बुद्धीनं लोक त्या ऋषीचं गोत्र सांगत असत. तो दाखला घेऊन आपल्याला असं म्हणतां येईल, कीं आज आपल्या देशांत कित्येकांचं गांधी गोत्र आहे. कित्येकांचं टिळक गोत्र आहे. कित्येकांचं गोखले गोत्र असेल. परंतु हे भेद काय अतिम महत्त्वाचे मानतां येतील ? दोन व्यक्तींचे प्रेम आणि लग्न याबद्दलचा विधिनिषेध या भेदावरून ठरविणं शहाणपणाचं म्हणतां येईल ? गोत्रांत आतां कांहीं अर्थ उरला नाहीं, सगोत्र विवाह झाले पाहिजेत असं जाणते लोक म्हणूं लागले आहेत. त्याप्रमाणेंच जाणत्या लोकांनीं आतां असंही म्हटलं पाहिजे कीं धर्माची भिन्नता हीं मूळ स्थलवाचक आहे. भिन्न भिन्न धर्मीयांचे विवाह व्हायला कोणताहि प्रत्यवाय नसावा. जाणते लोक असं म्हणत नाहींत ते समाजाच्या भीतीनं. पण बाबा, मला त्यांच्याशीं कांहीं करायचं नाहीं. मला शक्य तर तुमची खात्री पटवायची आहे. '

मिटलेले डोळे तसेच ठेवून अमृतराव म्हणाले, ' श्रीरंग, तू माझा मुलगा नाहींस हें सत्य मी त्या दिवशीं रात्रीं उघड केलं. पुत्रसुखाला मी आंचवून बसलों, मला मोठं दुःख झालं. पण त्या दुःखाचं मला आतां कांहींच वाटत नाहीं. तूं माझा पुत्र नाहींस. पण तूं माझा गुरु आहेस. बोल, आणखी बोल. '

श्रीरंग म्हणाला, ' बाबा, माझं बोलणं संपलं. फक्त एकच गोष्ट तुम्हाला विचारायची राहिली. '

' विचार. '

'जे तुम्ही आज भ्रष्टाकाराच्या भीतीनं घाबरलात त्या तुम्हीच मला माझ्या आईच्या हातून आपल्या ओटींत घेतांना मला आपलाच मुलगा समजण्याचं कसं मनांत आणलंत ? माझा भिन्न धर्म त्या वेळेस तुम्हांला स्पष्ट दिसत होता. तो दिसत असूनहि मला तुम्ही आपल्या घरीं घेऊन गेलांत. ती कृष्णाष्टमीची मध्यरात्र होती म्हणून माझं नांव श्रीरंग असं ठेवलंत. तें करतांना तुमच्या माझ्या धर्मांच्या भिन्नतेचा किंतु तुमच्या मनांत क्षणभर देखील आला नाहीं. मालतीनं पति म्हणून माझा हात धरण्यांत जर धर्माचा घात असेल तर तितकाच घात तुम्ही मला आपलं बालक म्हणून हातीं घेण्यांत होता; परंतु ती गोष्ट तुम्ही निःशंकपणानं केलीत. ती करतांना तुम्हाला आपण धर्माशीं द्रोह करीत आहांत असं वाटलं नाहीं. नंतरच्या काळांत अधून मधून वाटलं असेल, परंतु ज्या क्षणी मला तुम्ही आपला मुलगा म्हटलंत त्या क्षणी तुमचं मन नि;शंक होतं. वास्तविक मालतीनं आपला सहचर म्हणून माझा स्वीकार करणं हें जर पाप असेल तर स्वतःचं अपत्य म्हणून तुम्ही माझा स्वीकार करणं हेंसुद्धां तितकंच भयंकर पाप म्हणावं लागेल. परंतु तें करतांना तुमचा हात चळला नाहीं, तुमच मन बिचकलं नाहीं. अगदीं निःशंक मनानं तें तुम्हीं कसं करूं शकलांत सांगा ?

अमृतरावांनीं हलकेंच डोळे उघडून श्रीरंगाकडे पाहिल. मग ते म्हणाले, ' कसं केलं कोण जाणे. तूं जो प्रश्न आतां विचारीत आहेस तो गेल्या अठ्ठावीस वर्षांत अगणिक वेळा माझ्या मनानं मला विचारला असेल. तुझ्या जन्माचं रहस्य लपविण्याचं कपट निस्तरावं लागेल तेव्हां निस्तरायचं कसं अशा चिंतेनें माझं मन जेव्हां जेव्हां अस्वस्थ होत असे तेव्हां तेव्हां तें मला विचारी, हें कपट तूं केलेसच कसं ? तें करतांना धर्माचा विवेक तुला सुचला कसा नाहीं ? या प्रश्नांना प्रत्येक वेळेस एकच उत्तर मी देत आलों. तेंच तुला आतां सांगतों. तुझ्या आईच्या हातून

तुला घेतल्यावर आणि घरीं आणल्यावर तुला आपलाच मुलगा म्हणतांना धर्माच्या भिन्नतेचा विसर मला कसा पडला तें मला सांगतां येणार नाहीं. पण तो पडला होता, व माझं मन पूर्णपणें निःशंक आणि शुद्ध होतं हें सांगतों. त्यावर विश्वास ठेव !'

श्रीरंग म्हणाला, " बाबा, त्यावर माझा पूर्ण विश्वास आहे. तुम्ही जाणून बुजून धर्मद्रोह केलात असं मला मुळींच वाटत नाहीं. तसं सुचविण्यासाठीं मी तुम्हाला प्रश्न केला नाहीं. स्वतःचं अपत्य म्हणून माझा स्वीकार करतांना तुम्ही निःशंक कसे होता असं मी विचारतो, तें तुमच्या निःशंकपणाची शंका घेण्यासाठीं नव्हे, तर त्या घटकेला तो निःशंकपणा तुमच्या ठिकाणीं कोणत्या कारणांनीं उत्पन्न झाला होता तें तुम्ही ओळखावं यासाठीं. "

अमृतराव म्हणाले, " श्रीरंग त्या घटकेला मी इतका निःशंक कसा झालो याबद्दल मी कितींदा तरी विचार करून पाहिला आहे. पण माझ्या बुद्धीला त्याचं कारण सांपडत नाहीं. माझ्या हातून त्यावेळीं जी गोष्ट झाली ती कशी झाली असं आश्चर्य तेवढं वाटतं. कारण समजत नाहीं. "

" मीं सांगतों बाबा. "

" सांग. "

[ जन्म आणि मृत्यू या दोन गोष्टी अशा आहेत कीं त्यांच्या सान्निध्यांत साऱ्या ऐहिक गोष्टींचा, नात्यांचा, नात्याच्या अभावाचा, जवळपणाचा, दूरपणाचा, भेदाभेदाचा, माणसाला विसर पडतो. आपण खरीं माणसंच आहोंत ही एकच भावना शिल्लक राहते.] कृष्णाष्टमीच्या त्या मध्यरात्रीं माझ्या आईचा मृत्यु व माझा जन्म या दोन्ही घटना तुमच्या डोळ्यांसमोर घडलेल्या तुम्ही पहात होता. त्यांचा तुमच्या मनावर

परिणाम होऊन साऱ्या ऐहिक विचारांचं, नात्यागोत्याचं, भेदाभेदाचं किल्मिष तुमच्या मनांतून पार झडून गेलं होतं. फक्त मानवतेचा एकच धर्म तुमच्या हृदयांत उचंबळून आला होता ! त्या आत्यंतिक शुद्धतेमुळें तुम्ही माझा आपला मुलगा म्हणून स्वीकार केलांत. त्या शुद्धतेमुळें निःशंक-पणाचं सामर्थ्य तुमच्यामध्यें आलं होतं ! ”

अमृतराव त्याच्याकडे नुसते बघत राहिले. जणूं ज्या एका चमत्काराचं त्यांना आजपर्यंत फक्त आश्चर्य वाटलं होतं त्याचा उलगडा झाल्याप्रमाणें या क्षणीं प्रथमच त्यांना वाटत होतं. '

फार सात्त्विक आणि गंभीर हास्य श्रीरंगाच्या चर्येवर दिसूं लागलं. त्यानं अमृतरावांच्या पायांना हलकेंच स्पर्श केला व म्हटलं, ' बाबा, त्यावेळचं निःशंकपणाचं सामर्थ्य पुन्हां एकदां मनांत आणा म्हणजे माझ्या अन् मालतीच्या लग्नाला आशिर्वाद द्यावेत असं तुम्हांला वाटूं लागेल. '

अमृतरावांची खरी जात कळल्यावर ज्याप्रमाणें समाजांत खळबळ उडाली होती त्याप्रमाणेंच श्रीरंगाच्या जन्माची खरी हकीगत उघड झाल्यावर खळबळ उडाली. फरक बेवढाच कीं त्यावेळीं समाजाचा क्षोभ एकदम भडकला होता, आतां तो हळूहळू भडकत होता. श्रीरंग अमृतरावांचा मुलगा नव्हे आणि तो जन्मानं हिंदुहि नव्हे ही गोष्ट वास्तविक अमृतरावांनीं फक्त मालतीच्या बापाला सांगितली होती. परंतु असल्या गोष्टी षट्कर्णी व्हायला वेळ लागत नाहीं. प्रथम दहा पांच लोक, नंतर वीस पंचवीस लोक, आणि शेवटीं सारा समाज श्रीरंगाच्या जन्मरहस्याची कुजबुज करूं लागला. श्रीरंगाच्या जन्म-रहस्यांतून एक मोठा सामाजिक प्रश्न उत्पन्न होतो असं लोक म्हणूं लागले, व मग जोराच्या चर्चेला तोंड फुटलं. सामान्यतः व्यक्ति जगते कीं मरते याची चवकशीही न करणारा समाज अभिनंदन आणि निषेध करण्यास फार उत्सुक असतो. समाजपुरुषाला मनोरंजनासाठीं हा खेळ हवासा वाटतो.

आणि त्या खेळाला निमित्त पाहिजे म्हणून व्यक्तींच्या खाजगी गोष्टी चव्हाट्यावर आणून धुण्यासाठीं तो नेहमी टपलेला असतो. श्रीरंगाचं जन्मरहस्य जसजसं लोकांत पसरलं तसतशी चर्चा सुरू झाली. श्रीरंगाच्या हकीगतीला मोठ्या सामाजिक प्रश्नाचं स्वरूप झपाट्यानं आल. अमृतरावांनीं धर्मसंकराचं भयंकर पातक केल्याबद्दल त्यांना शासन केलं पाहिजे असा जोराचा प्रचार सुरु झाला. बहिष्कार घालण्यापलीकडे समाज कोणतं शासन करूं शकतो ? रूढी अगर धर्माज्ञा मोडणाऱ्या माणसाला कुणी तुरुंगवासाची शिक्षा देऊं शकत नाहीं. समाजाच्या हातांत फक्त धुसफुसणं अन् रागाचे फुत्कार टाकणं येवढंचअसतं. अगदीं कमालीची पायरी म्हणजे बहिष्कार. तो तर अमृतरावांवर आधींच घातला गेला होता. तेव्हां धर्मसंकराबद्दल आणखी नवीन अशीं कोणती शिक्षा अमृतरावांना देण्यासारखी होती ? कोणतीच नव्हती. चळवळ करणाऱ्यांना हें समजत होतं. आणि म्हणून अमृतरावांना अमुक शिक्षा दिली पाहिजे असं न म्हणता शिक्षा दिली पाहिजे, शासन केलं पाहिजे असं फक्त जोरजोरानं ओरडून ते स्वतःचं समाधान करून घेत होते. लोकविरुद्ध आचरण करणाऱ्या एखाद्या व्यक्तीवर जेव्हां समाज खवळतो तेव्हां समाजला माहीत असतं, कीं त्या व्यक्तीला प्रत्यक्ष शासन करण्याचा अधिकार आपल्याजवळ नाहीं. मग समाज—म्हणजे समाजाचं नांव घेऊन ओरडत उठणाऱ्या व्यक्ती–स्वतःची अशी भोळी समजूत करून घेतात, कीं शिक्षा ठोठावण्याचा आपला गलबला ऐकून त्या व्यक्तीला खूप मानसिक यातना होतील, व त्या यातना म्हणजे काय थोडी शिक्षा झाली ? टीकेच्या काहुरानं गडबडून जाणाऱ्या हलक्या स्वभावाचीं माणसं असतात, त्यांच्या बाबतीत हा हिशोब थोडाफार खरा ठरतो. परंतु स्वतःच्या वागण्याबद्दल ज्यांना आत्मविश्वास असतो त्यांना सामाजिक कोलाहलाची बाधा होऊं शकत नाहीं. श्रीरंगानं सांगितलेल्या गोष्टी ऐकल्यापासून अमृतरावांच्या मनांतले सारे विकल्प दूर

झाले होते. त्यांच्या अंतःकरणाला मोठी शांतता आली होती. धर्मसंकराचं पाप आपल्या हातून घडंल ही जाणीवच त्यांच्या अंतर्यामीं आतां शिल्लक राहिली नव्हती. स्वताःच्या शुद्धत्वाबद्दल मनुष्याला आत्मविश्वास वाटत असला, कीं त्या आत्मविश्वासाचे जबरदस्त कवच तयार होत असतं. प्रत्यक्ष देहदंड देखील त्या कवचापुढें भयप्रद वाटेनासा होतो. मग शासनाच्या कोरड्या धमकीची काय कथा ! त्यामुळें समाजाच्या प्रक्षोभाच्या लाटा गर्जत होत्या. अमृतराव आपल्या ठिकाणीं पूर्ण समाधानाचा अनुभव घेत शांत राहिले होते.

आतांपर्यंत श्रीरंग आणि मालती यांच्या विवाहाचा प्रश्न सामाजीक चर्चेपासून अलिप्त राहिला होता. परंतु आतां त्यालाहि चर्चेची झळ लागली. तो विवाह न होऊं देण्याचं सामर्थ्य अगर साधन समाजाजवळ नव्हतं. हें लग्न आह्मीं त्रिकालीं घडूं देणार नाहीं असं लिहिण्याची हौस कांहीं बोरूबहाद्दरांनीं भागवून घेतली. परंतु त्यांचे तेच मनांतून ओळखून होते, कीं आपण उगीच हवेंत वायबार काढीत आहोंत. मग त्यांच्यापैकीं जे विशेष उद्योगशील होते त्यांनीं श्रीरंगाला धमकावणी देणारीं निनांवीं पत्रं धाडण्याचं शूरत्व केलं. विरोधकांत जे समंजस व व्यवहारी होते त्यांनीं इतका उंच नेम धरला नाहीं. त्यांनीं असा बूट काढला, कीं एक मोठा शुद्धि-समारंभ करून श्रीरंगाला हिंदु करून घ्यावं आणि श्रीरंग अशाप्रकारें हिंदु झाल्यावर त्याच्या व मालतीच्या लग्नाला प्रत्यवाय नसावा. ही मंडळी जस्टिससाहेबांच्याकडे गेली. कारण ते तर शुद्धि-चळवळीचे मोठे पुरस्कर्ते होते. परंतु संपतराव आतां पूर्वींचे राहिले नव्हते. श्रीरंग व मालती यांचं लग्न अपरिहार्य आहे-श्रीरंग जन्मानं मुसलमान होता हें उघड झालं असतांनाहि अपरिहार्य आहे—हें त्यांनीं आता पुरतं ओळखलं होतं; आणि अमृतरावांच्या मनाप्रमाणेंच त्यांच्या मनाचीहि खळबळ आतां नाहींशी झाली होती. जात, वर्ण, धम इत्यादि गोष्टींविषयीं

हिरीरीनं विचार करायची त्यांची प्रवृत्तीच थंड झाली होती. या गोष्टी इतक्या महत्वाच्या आहेत, कीं त्यासाठीं आपल्या लाडक्या कन्येशीं झगडा केला पाहिजे, तिला जन्माची दुःखी करणं भाग पडलं तरी केली पाहिजे अशी तिडीकच त्यांना वाटेनाशी झाली होती. भिन्नधर्मीयांच्या लग्नानं समाजाचं स्थैर्य संपुष्टांत येईल इत्यादि भाषा त्यांना पोकळ वाटूं लागली होती. मालतीच्या आयुष्यावर तिची मालकी आहे, आपली नाहीं. तिचं लग्न हा सर्वस्वीं तिचा प्रश्न आहे, ही गोष्ट ते पुरतेपणीं उमजले होते. श्रीरंगाची शुद्धि झाली पाहिजे असं म्हणणारी मंडळी त्यांना भेटायला आली तेव्हां त्यांनीं शांतपणें या सर्व गोष्टी त्यांना सांगितल्या व अखेर ते म्हणाले,

‘ मालतीच्या लग्नाच्या बाबतींत मी तिचा बापच लक्ष घालूं इच्छित नाहीं. मग तुम्हीं त्रयस्थांनीं कां घालावं ? ’

त्या मंडळींतले एक गृहस्थ जरा जास्त शहाणे होते. ते म्हणाले, ‘ बापापेक्षांहि समाजाचा अधिकार जास्ती आहे. बाप वेडेपणा करून मुलीला मुसलमानाच्या गळ्यांत माळ घालूं देऊं लागला तर समाज उघड्या डोळ्यांनीं ती गोष्ट पाहील हें शक्य नाहीं. समाज प्रत्येक व्यक्तीचा प्रपितामह आहे. ’

जस्टिससाहेबांच्या मनांत आलं, या प्रपितामहांच्या एक चांगली श्रीमुखांत लगवावी. पण बोलून चालून पोरकटपणा होता सगळा. त्याला इतकं तरी महत्त्व देण्यांत काय अर्थ होता. ते शांतपणे हंसले व म्हणाले,

‘ बरोबर आहे तुमचं म्हणणं. तुम्हीं श्रीरंगाकडे जा आणि त्याला पटवून द्या. ’

मग ही मंडळी खरोखरच श्रीरंगाच्या भेटीसाठीं गेली, व त्याला शुद्ध करून घेण्याचा आपला मनोदय त्यांनीं त्याला सांगितला.

श्रीरंग त्यांना म्हणाला, ' तुम्हीं मला शुद्ध करून घ्यायला तयार असला तरी मीच त्या गोष्टीला तयार नाहीं. माझ्या ठिकाणीं कोणती अशुद्धता आहे म्हणून तुम्ही मला शुद्ध करून घेणार ? हिंदुधर्मात जन्मलेल्या तुमच्यापैकीं कुणाहि माणसाइतकाच मला हिंदुत्वाचा अभिमान आहे. एका कर्मठ आणि आचारशुद्ध हिंदूच्या अन्नावर मी वाढलों. हिंदूंचेच आचार मी पाळले. हिंदुदेवतांचीच मी पूजा केली. हिंदूंची भूमि तीच माझी मायभूमि असं मी समजतों. इतकं असूनहि मी हिंदु ठरत नाहीं होय ? माझा जन्म हिंदुकुळांत झाला नाहीं म्हणून माझी शुद्धि झाली पाहिजे असं तुम्ही म्हणतां. तुमचं हें म्हणणं ऐकलं कीं, मला हंसूं येतं. तुमच्या बुद्धीच्या दुबळेपणाची मला कींव येते. अठ्ठावीस वर्षांच्या हिंदुत्वाच्या प्रत्यक्ष आचारानंहि माझं जन्मसिद्ध अहिंदुत्व बदलूं शकत नाहीं असं समजणारे तुम्ही, तुमच्या तोंडचें चार मंत्र माझ्या कानीं पडल्याबरोबर आणि गोमूत्राचे चार थेंब माझ्या अंगावर टाकले गेल्याबरोबर माझी जन्माची अशुद्धि नाहींशी होईल असं मला सांगतां ? कुणाच्या बुद्धीला हें पटेल ? सनातन हिंदुधर्माचें कैवारी असं भलतं विशेषण तुम्ही स्वतःला लावून घेऊं नका. तुम्हाला धर्म काय कळला आहे तर तुम्ही त्याचा कैवार घ्यावा ? स्वतःच्या कोत्या बुद्धीला आणि अधिकारलालसेला तुम्हीं आपल्या सोयीसाठीं धर्म असं नांव दिलं आहे, आणि दुनिया झुकवीत आहांत. धर्माच्या गोष्टी तुम्ही काय मला शिकवाव्या ? माझा हिंदुधर्म मला कळतो. स्वामी विवेकानंदांनीं धर्माच्या ज्या 'दिव्य व्यापक स्वरूपाचा त्रिखंड प्रचार केला तोच खरा हिंदुधर्म होय ! आणि तोच महंमदी धर्म ! खिस्ती धर्म [ सदाचार, जनसेवा आणि प्रेम हाच सगळ्या मानवांचा धर्म असायला हवा. ] या धर्माऐवजीं आकुंचित पंथांच्या खोट्या अभिमानानं सारे लोक प्रेरित झालेले मला दिसतात. अशानं आपल्या राष्ट्राचा अभ्युदय होणार नाहीं.

मी जन्मानं मुसलमान आहे हें जेव्हां मला कळलं तेव्हांच मी हिंदु आहे म्हणजे काय तें माझ्या पूर्णत्वानं लक्षांत आलं. वयाच्या अठ्ठाविसाव्या वर्षी जन्मरहस्य कळवण्याची घटना मला फार उपकारक झाली आहे. कारण ती घडली नसती तर धर्माच्या खऱ्या स्वरूपाविषयी इतक्या एकाग्रतेनं मीं विचार केला नसता. पण आतां मी तो केला आहे. कीं जो खराखुरा मुसलमान आहे तोच खरा हिंदु आहे, आणि खरा ख्रिस्ती आहे. कारण सर्व धर्मांचं मुख्य उदात्त तत्त्व एकच असून हिंदु, मुसलमान, ख्रिस्ती हीं नांव देशवाचक किंवा स्थलवाचक आहेत. जो सगळ्या मानवकोटीचा धर्म होऊं शकत नाहीं तो कुणाचाच धर्म नाहीं. जो सगळ्यांचा धर्म होऊं शकतो तोच प्रत्येकाचा धर्म. तोच माझा धर्म ! तोच तुमचाहि ! '

श्रीरंगाचं हें बोलणं अमृतराव व मालतीहि दूर बसून ऐकत होती. मंडळी निघून गेली तेव्हां अमृतरावही हलकेच आपल्या खोलींत गेले. श्रीरंग मालतीजवळ गेला आणि तिला म्हणाला,

' मालती, माझं म्हणणं तुला योग्य वाटलं ना ? '

ती म्हणाली, ' श्रीरंग, तूं ज बोलशील आणि जें करशील तें मला योग्यच वाटेल. खरं म्हणशील तर धर्मनिर्णयासारखे मोठाले प्रश्न सोडविण्याची माझ्या बुद्धीची ताकद नाहीं. ते सोडविण्याची आवश्यकताही मला वाटत नाहीं. मला एकच गोष्ट कळते ती ही कीं, माझं तुझ्यावर अत्यंत प्रेम आहे, आणि तूं मला हवास. '

बोलतां बोलतां श्रीरंगाविषयींच्या अभिमानानं, प्रेमानं, आणि आतां तो व ती एकमेकांचीं होण्यांत कोणतीहि अडचण उरली नव्हती या कल्पनेच्या आनंदानं तिचा ऊर अगदीं भरून आला. तिनं एक हुंदका दिला आणि आपलं मस्तक तिच्या खऱ्या विसाव्याच्या जागीं—त्याच्या हृदयावर—टेकलं !

तितक्यांत एकतारीचा मंजुळ ध्वनि आणि चिपळ्यांचा आवाज त्या दोघांच्या कानीं आला.

हातांत हात घालून तीं दोघं उठलीं, अमृतरावांच्या खोलीकडे गेलीं व हलकेंच आंत प्रवेश करून बाजूला बसलीं.

अमृतरावांनीं भजन सुरू केलं होतं--

‘ मऊ मेणाहून आम्ही विष्णुदास ।
कठिण वज्रास भेदू ऐसे ॥
मेले जिते असो निजोनिया जागे ।
जो जो जें जें मागे तें तें देऊं ॥
मायबापांहुनि बहु मायावंत ।
करूं घातपात शत्रूहुनि ॥
अमृत तें काय गोड आम्हांपुढें ।
विष तें बापुडें कडू किती ॥
तुका म्हणे आम्ही अवघेची गोड ।
ज्याचें पुरे कोड त्याचे परी ॥

भजन करतां करतां अमृतराव तल्लीन झाले. हा अभंग श्रीरंगानं लहानपणींच पाठ केला होता. अमृतरावांच्या आवाजांत आवाज मिळवून तोहि म्हणूं लागला. मालतीला तो अभंग येत नव्हता, परंतु एकेक चरण एकदां ऐकला कीं तिला दुसऱ्या वेळेस तो म्हणतां येई. त्य दोघांच्या आवाजांत मिसळून तिनंही गायला आरंभ केला.

रखमाबाई तेथें आल्या, बसल्या आणि हातांनीं टाळ्या वाजवीत भजन म्हणूं लागल्या. श्रीरंग व मालती या दोघांकडे त्या अगदीं टक लावून पहात होत्या, आणि त्यांच्या डोळ्यांतून आंसवं गळत होतीं.

समाप्त

# प्रो. फडके यांच्या कादंबऱ्या

| | | |
|---|---|---|
| १ | अल्ला हो अकबर | ( आवृत्ति २ री ) |
| २ | कुलाब्याची दांडी | ( आवृत्ति २ री ) |
| ३ | जादूगार | ( आवृत्ति ४ थी ) |
| ४ | दौलत | ( आवृत्ति ४ थी ) |
| ५ | अटकेपार | ( आवृत्ति २ री ) |
| ६ | निरंजन | |
| ७ | कलंकशोभा | ( आवृत्ति ३ री ) |
| ८ | आशा | ( आवृत्ति ३ री ) |
| ९ | उद्धार | ( आवृत्ति ३ री ) |
| १० | काश्मिरी गुलाब | |
| ११ | प्रवासी | ( आवृत्ति ३ री ) |
| १२ | समरभूमि | ( आवृत्ति २ री ) |
| १३ | उन्माद | ( आवृत्ति २ री ) |
| १४ | गुप्त प्रायश्चित्त | ( आवृत्ति २ री ) |
| १५ | इंद्रधनुष्य | |
| १६ | प्रतिज्ञा | |
| १७ | वादळ | ( आवृत्ति ४ थी ) |
| १८ | शाकुंतल | ( आवृत्ति २ री ) |
| १९ | अखेरचं बंड | ( आवृत्ति २ री ) |
| २० | बस् नंबर बारा | |
| २१ | जीवन-संगीत | ( आवृत्ति २ री ) |
| २२ | माझा धर्म | ( आवृत्ति २ री ) |
| २३ | झंझावात | |

# प्रो. फडके यांचीं इतर पुस्तकें

## गोष्टी

१ प्रो. फडके यांच्या गोष्टी भाग १ ला
२ ,, ,, ,, ,, भाग २ रा
३ लोला आणि इतर गोष्टी
४ नमुनेदार गोष्टी
५ उल्हासकथा
६ वत्सला आणि इतर गोष्टी
७ चंद्रा आणि इतर गोष्टी
८ लाडकी लक्ष्मी आणि इतर गोष्टीं
९ माझा देश आणि इतर गोष्टी
१० जिवाचं मैतर

## नाट्यवाङ्मय

१ काळे–गोरें
२ युगांतर
३ संजीवन
४ तोतया नाटककार
५ जडावाची देवी ( नाटिका ) ( आवृत्ति २ री )
६ आगलावी ,,
७ क्षमेसाठीं अपराध ,,

## प्रबंध

१ मानसोपचार ( आवृत्ति २ री )

२ मानसोन्नति

३ सुखाचे संसार

४ संतति नियमन

५ आजचे तरुण स्त्रीपुरुष व त्यांजपुढील प्रश्न (आवृत्ति ३ री)

६ प्रतिभासाधन (आवृत्ति ४ थी)

७ वाङ्मयविहार (आवृत्ति २ री)

८ आधुनिक गीता (आवृत्ति २ री)

९ मानसमंदिर (आवृत्ति २ री)

१० साहित्य व संसार (आवृत्ति २ री)

११ आकाशवाणी (आवृत्ति २ री)

१२ वेंचलेले मोती

१३ टाकीचे घाव

१४ टांकाच्या फेकी

१५ माझ्या साहित्यसेवेंतील स्मृती भाग १ ला (आवृत्ति २ री)

१६ शेलापागोटें

## ललित निबंध

१ गुजगोष्टी (आवृत्ति २ री)

२ नव्या गुजगोष्टी (आवृत्ति ३ री)

३ धूम्रवलयें

## चरित्रें

१ दादाभाई नौरोजी (आवृत्ति ३ री)

२ टेरेन्स मॅक्स्विनी

३ डी व्हॅलेरा

४ तीन थोर देशभक्त

## व्याख्यानें

१ गाजलेलीं भाषणें

२ मित्रहो !

३ मंथन

## इंग्रजी

1 Sex Problem in India ( 2nd Ed. )

2 Psychology

3 Elements of Ethics

4 Manual of Logic ( 3rd Ed. )

5 Birth Control ( 2nd Ed. )

6 History of Philoscphy.

7 Leaves in the August Wind ( कादंबरी )